प्रभातकुमार मुखोपाध्याय

# रत्नदीप

अनुवादक
मामा वरेरकर



मूल्य अडीच रुपये

# प्रस्तावना

बंगाली साहित्यांत जुन्या काळांत जे कादंबरीकार होऊन गेले, त्यांत प्रभातकुमार मुखोपाध्याय यांनीं बरीच लोकप्रियता संपादन केली होती. लघुकथाकार या नात्यानें ते जास्त लोकप्रिय झाले होते. त्यांनीं लहानमोठ्या अशा चौदा कादंबऱ्या लिहिल्या असून त्यांचे लघुकथांचे बारा संग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

वंगसाहित्यांत प्रभातकुमार यांचें स्थान कोणतें आहे, याची चर्चा आज केली जात नाहीं. ज्या काळांत त्यांनीं आपले ग्रंथ लिहिले त्या काळांत ते सर्वसाधारण वाचकांत लोकप्रिय होते. त्या काळच्या परीक्षणकारांनीं त्यांच्या ग्रंथांची वाखाणणीच केली आहे.

शरच्चंद्र चट्टोपाध्याय हे वंगसाहित्याच्या क्षितिजावर उदय पावण्याच्या पूर्वीपासूनच प्रभातबाबूंनीं आपलें लेखनकार्य सुरू केलें होतें. आणि यापूर्वीच त्यांनीं लोकप्रियताही संपादन केली होती. शरद्बाबूंची असाधारण लोकप्रियता त्यांच्या साहित्य-निर्मितीच्या आड आली असल्याचें दिसून येत नाहीं.

प्रभातबाबूंच्या लेखनाचा आत्मा कादंबरीकारापेक्षां विशेषत्वानें कथाकाराचाच आहे. आकर्षक रीतीनें लिहिलेली कथा हाच त्यांचा गुणविशेष आहे. त्यांची लेखनशैलीही विशिष्ट प्रकारची असून ती त्या काळच्या इतर कोणत्याही कादंबरीकाराच्या शैलीशीं तुलना करतां येण्याजोगी नाहीं.

प्रस्तुत कादंबरीवर आधारून पहिल्यानें बंगाली चित्रपट घेण्यांत आला आणि तोही देवकी बोससारख्या एका नांवाजलेल्या दिग्दर्शकाच्या हस्तें, हेंच या कादंबरीच्या लोकप्रियतेचें गमक आहे. हा चित्रपट बंगाल देशांत लोकप्रिय झाल्यानें त्याची हिंदी आवृत्ती घेण्यांत आली आणि तीही तितकीच लोकप्रिय ठरली.

तोतयाच्या कथा बंगालप्रांतांत विशेषत्वानें दिसून येतात. महाराष्ट्रांत फक्त सदाशिवरावभाऊंचा तोतयाच तेवढा प्रसिद्ध आहे. बंगालमध्यें ही कादंबरी प्रसिद्ध होण्यापूर्वी बरद्वानच्या तोतयाची हकीकत गाजली होती. ही कादंबरी प्रसिद्ध झाल्यावर कित्येक वर्षांनीं — म्हणजे गेल्या दहापंधरा वर्षांच्या काळांत भवाळ संन्याशाचा खटला बराच गाजला होता. शेवटीं तो संन्यासी तोतया नव्हता असें ठरल्याचें आठवतें.

या सर्व तोतयांच्या प्रकरणांत त्यांच्या पत्नीचीच परिस्थिति त्या तोतयाला खरा अगर खोटा ठरविण्यास कारणीभूत झालेली आहे. प्रस्तुत कथेंतील तोतयाच्या चित्रांत त्याच्या स्वभावधर्माचें उदात्तीकरण केलें असल्याचें दिसून येतें, तसें इतर तोतयांच्या कथांत दिसून येत नाहीं. या दृष्टीनें ही कथा आदर्श झाली आहे असे म्हणतां येईल.

कित्येक वर्षांपूर्वी प्रभातबाबूंच्या कांहीं कादंबऱ्यांचीं रूपांतरें वि. सी. गुर्जर यांनीं केलीं होतीं. तीं आज उपलब्ध नाहींत, किंवा त्यांचें पुनर्मुद्रण होईल असाही संभव नाहीं. यापूर्वीच्या अनुवादांत थोडासा पाल्हाळ झालेला होता तो गाळून प्रस्तुत अनुवाद शक्य तितक्या सुटसुटीत स्वरूपांत करण्यांत आलेला असल्यामुळें, मोठ्या कादंबऱ्या वाचण्याचा कंटाळा करणाऱ्या आजच्या वाचकांना हा अनुवाद आवडेल अशी अपेक्षा आहे.

अनुवादक

# रत्नदीप

## ( प्रथम खंड )

: १ :

राखाल भट्टाचार्य हा खुश्रूपूर स्टेशनवरचा छोटाबाबू म्हणजे असिस्टंट स्टेशन मास्तर होता. वर्धमान जिल्ह्यांतील मैनामती गांवीं त्याचें घर होतें. वयानें तो सुमारें तीस वर्षांचा होता. प्रवेशिका परीक्षेंत नापास झाल्यामुळें रेल्वे खात्यांत शिरून गेलीं पांचसहा वर्षें तो नोकरी करीत होता. दरमहा पंचवीस रुपये पगार मिळत असला तरी मधून मधून रुपया सव्वा रुपयाची प्राप्ति त्याला होत असे.

खुश्रूपूर स्टेशनवर येऊन त्याला सुमारें एक वर्ष झालें होतें. राहाण्यासाठीं जी सरकारी जागा होती ती कोंबड्याच्या खुराड्यासारखी होती. स्टेशनवरचा पाणीवाला त्याला दोनवेळ जेवण करून वाढीत असे. तें केव्हां कच्चें तर केव्हां करपलेलें असे. त्याबद्दल मजुरी म्हणून पाणीवाल्याला तो दोन रुपये देत असे.

राखालची बायको त्यावेळीं एकोणीस वर्षें वयाची होती. ती घर सोडून परदेशांत यायला तयार नव्हती. पूर्वी एकदां तो तिला घेऊन आला होता खरा, पण ती पुरते पंधरा दिवससुद्धां तिथें राहिली नाहीं. सासऱ्याला तार करून बोलावून आणून तिला पाठवून देणें अवश्य झालें. ती आपल्या माहेरींच

राहात होती. राखलच्या घरीं त्याचा एक चुलत भाऊ सहपरिवार राहात होता तेवढाच. राखालला आई नव्हती, तेव्हां तिला आणणार होतें कोण? त्याच्या घरीं त्याचा एक चुलत भाऊ सहकुटुंब रहात होता, तेवढाच.

नवरा आणि बायको यांच्या प्रेमाच्या गोष्टी राखालला कथाकादंबऱ्यांतून आणि मित्रमंडळींच्या तोंडून ऐकायला मिळत होत्या, पण प्रत्यक्षांत त्याला तसा कांहीं रस अनुभवतां आला नव्हता. लग्न झाल्यानंतर राखाल ज्यावेळीं घरीं होता, त्यावेळीं लीलावती अगदींच पोरसवदा होती. त्या दोघांची भेट सुद्धां होणें शक्य नव्हतें. त्यानंतर त्यानें घर सोडलें, उमेदवारींत कांहीं काळ गेला आणि गेलीं पांचसहा वर्षें तो नोकरी करीत होता.

दरवर्षी रजा घेऊन किंवा आजारीपणाचें ढोंग करून तो ज्यावेळीं गांवीं येई त्यावेळीं त्याची आणि लीलावतीची भेट होई खरी, पण लग्न झाल्यावर नवराबायकोंत जो एकप्रकारचा आल्हादाचा दुवा असतो तो त्याला कधींच जाणवला नव्हता. तो जायला निघाला तर ती त्याला एकदोन दिवस राह्यचा आग्रह करीत नव्हती, कीं पुन्हां केव्हां याल म्हणून विचारीतही नव्हती.

लीलावतीला थोडेंबहुत लिहितांवाचतां येत असे, तो तिला पत्र लिही. पण अशीं दोन तीन पत्रें लिहिल्यावर तिच्याकडून जें उत्तर येई तेंही अगदीं संक्षिप्त असे. त्यामुळें त्याचें समाधान होत नसे.

या खेपेला राखालनें आपल्या बायकोला आणायचा निश्चय केला होता. मोठ्या कष्टानें त्याला रजा मिळाली होती. जरूर ती तयारी करून तो आपल्या गांवीं यायला निघाला. मैनामती गांवीं त्याचें घर होतें. नेमारी स्टेशनपासून त्याचें घर अडीच कोस दूर होतें. स्टेशनवर उतरल्यावर हमालाच्या माथ्यावर आपली बॅग देऊन तो ७ वाजण्यापूर्वी घरीं येऊन पोहोंचला.

अंगणांत पाऊल टाकल्यावर त्याला दिसून आलें, कीं घरच्या सर्व माणसांचे चेहरे गंभीर व उदासवाणे झाले होते. ते पाहून तो मनांतल्या मनांत चरकला. त्याची वहिनी गोठ्यांत दूध काढीत होती, पण राखालची हांक ऐकूं आली तरी तिनें मागें वळून पाहिलें नाहीं. त्याच्या दादाची म्हातारी सासू बागेंतील फुलें तोडीत होती, तीही एकदां त्याचेकडे नुसती नजर टाकून पुन्हां आपल्या कामास लागली. घरची मोलकरीण घडा घेऊन पाणी भरायला जात होती, पण तिनेंही मागें वळून त्याची विचारपूस केली नाहीं.

मात्र त्याच्या दहा वर्षांच्या स्वर्णलता नांवाच्या पुतणीनें येऊन त्याचा हात धरून म्हटलें, " छोटे काका ! "

त्यानें तिच्याजवळ सर्वांची विचारपूस केली आणि तो पडवी ओलांडून घरांत आला. जी समोर दिसावी अशी त्याची अपेक्षा होती ती त्याला कुठेंच दिसली नाहीं. त्याची वहिनी आंत आली. तिला त्यानें प्रणाम केला, पण ती कांहीं बोलली नाहीं. विचारल्या प्रश्नाला ती नुसती 'हो' किंवा 'ना' म्हणत होती तेवढेंच. त्यानें विचारलें, " दादा कुठं आहेत ? "

" कुठंतरी बाहेर गेले आहेत वाटतं ! " असें म्हणून ती घरांत जाऊं लागली. तेव्हां राखाल म्हणाला, " भारी तहान लागलीय् वहिनी. पाणी दे ना पेलाभर. "

" आधीं तुम्ही हातपाय धुवून या. तोंवर मी फराळाचं घेऊन येतें. " असें म्हणून ती आंत गेली.

हातपाय धुऊन राखाल पडवींतल्या तक्तपोशीवर येऊन बसला. त्याची नजर दाराकडे लागली होती. वहिनी लीलावतीबरोबर फराळाचें पाठवील असें त्याला वाटत होतें, पण ती स्वतःच थाळींत दोन रसगुल्ले आणि पाण्याचें भांडें घेऊन आली त्यावेळीं त्याची निराशा झाली.

फराळ उरकल्यावर तो वहिनीला म्हणाला, " दादा केव्हां येतील ? "

" कोण जाणे ! " ती म्हणाली.

" संध्याकाळीं चाराला मला इथून निघालं पाहिजे, तेव्हां एखादी बैलगाडी एव्हांपासून सांगून ठेवली पाहिजे. आजारी असल्याचा रिपोर्ट देऊन मी दोन दिवसांसाठीं कसाबसा आलोंय. इकडे सर्व ठीकठाक आहे ना ? "

राखालकडे न पाहातांच वहिनीनें मानेनेंच नकार दिला. तिच्या डोळ्यांतून पटकन् दोन आंसवें पडल्याचें पाहून राखालनें विचारलें, " काय झालंय वहिनी ! "

वहिनी कांहीं बोलेना. राखाल उठून तिच्याजवळ आला. त्यानें भीतभीत विचारलें, " घरात नाहीं का ती ? "

" एवढं कुठं भाग्य आहे आपलं ? " त्याच्याकडे न पहातांच वहिनी म्हणाली.

" असं काय झालंय, वहिनी ? "

"काय झालंय् कोण जाणे! पहांटेपासून तिचा पत्ता नाहीं."

तें ऐकून राखालला मोठा धक्का बसला. त्यानें विचारलें, "पत्ता नाहीं? म्हणजे काय? कुठं गेली ती?"

"देव जाणे! तुझे दादा तोच तपास करायला गेले आहेत."

राखालनें विचारलें, "कांहीं भांडणतंटा झाला होता का?"

"तसं कांहीं नाहीं. काल ती दिवटी हातीं घेऊन सैंपाकघरांत जात होती. त्यावेळीं तिच्या हातची दिवटी खालीं पडली. तेव्हां मीं म्हटलं, कीं असं तेल सांडलंस तर कसं होईल? आपला हा ओढघस्तीचा संसार–जरा सावधपणें चालावं–एवढंच मीं बोललें होतें. तेव्हांपासून ती फुरंगटून राहिली होती. रात्रीं नीटशी जेवलीसुद्धां नाहीं—"

राखालला वाटलें, वहिनी सांगत होती त्यापेक्षां कांहींतरी विशेष झालें असावें. त्यानें पुन्हा विचारलें तेव्हां त्याला कळून आलें, कीं रात्रीं ती छोट्या मुलीशेजारीं झोंपली होती. ती केव्हां उठून निघून गेली तें त्या मुलीला सांगतां येत नव्हतें. सकाळीं मागला दरवाजा उघडा असल्याचें दिसून आलें.

तें ऐकून कांहीं वेळ विचार करून राखाल म्हणाला, "मला वाटतं, तिनं मागल्या विहिरींत जीव दिला खास! मीं पाणबुड्याला घेऊन येतों—" असें म्हणून तो जायला निघाला तेव्हां वहिनी त्याला अडवून म्हणाली, "कशाला जातां भावजी? बुडालीच असली तर इतका वेळ कांहीं जिवंत सांपडायची नाहीं. आतां आपली अब्रु झांकली पाहिजे. काल रात्रीं माहेरचं बोलावणं आल्यामुळं ती निघून गेली असं सांगायला हवं."

वहिनीचें तें भाषण ऐकून राखालला फार वाईट वाटलें. तिला कोणती शंका आली असावी, याची कल्पना येऊन तो म्हणाला, "तुला वाटतं तसं नाहीं बरं वहिनी! एक तर तिनं रागारागानं जीव दिला असेल किंवा खरोखरच ती माहेरीं निघून गेली असेल. मीं एकदां विहिरीकडे पाहून येतों."

मागीलदारीं जाऊन त्यानें विहिरीपाशीं अंदाज घेतला, पण तसें कांहीं संशयात्मक चिन्ह त्याला दिसून आलें नाहीं. कदाचित् थोड्याच अंतरावर असलेल्या मोठ्या तळींत तिनें उडी घेतली असेल अशी कल्पना करून तो तिथवरही पाहून आला, पण कांहीं पत्ता लागला नाहीं.

जातांना कदाचित् बिछान्यापाशीं एकादी चिठ्ठी ठेवून ती गेली असेल अशा कल्पनेनें त्यानें सारा बिछाना झाडून पाहिला, पण कांहींच सांपडलें नाहीं. तो हताश होऊन बाहेर पडवींत येऊन बसला. छोट्या पुतणीनें गुडगुडी भरून आणून त्याचे हातीं दिली. विचूक मनःस्थितींत तो गुडगुडी ओढीत बसला असतां त्याचा दादा घरीं आला. त्याला पहातांच राखालनें उठून त्याला प्रणाम केला. तेव्हां त्यानें विचारलें. "सारं कळलं ना तुला ?"

"कळलं. कांहीं पत्ता लागला का ?"

"मुळींच नाहीं. मोठी अडचण झालीय् ती अशी, कीं कुणाला विचारायचं कसं ? मीं आपलं सर्वांना सांगून टाकलंय् कीं सुनबाईची आई एकदम आजारी झाल्यामुळं माहेराहून डाली आली होती तिकडे ती निघून गेली."

राखाल म्हणाला, "मला खरोखरच वाटतंय दादा, कीं ती माहेरींच गेली. माझ्या तिकडे यायला ती नाराज असते. मीं तिला घेऊन जायला येतोंय् असं कळल्यामुळंच ती माहेरीं पळून गेली खास."

वहिनी म्हणाली, "तुमचं भलतंच कांहीं तरी भावजी ! बायको माणूस, त्यांतून एकटी, अगदींच पोर, रात्रींच्या वेळीं तीन कोस रस्ता तुडवीत कशी जाईल वसंतपूरला ?"

राखाल म्हणाला, "ती मोठी एककल्ली आहे हें माहीत आहे ना तुला वहिनी ?"

वहिनी म्हणाली, "तें काय मला माहीत नाहीं ? या पंधरा दिवसांतच मला नकोसं केलं होतं तिनं ! आतां तुम्हींच सांगा हो, रात्रींच्या वेळीं ती एकटी कशी गेली असेल माहेरीं ?"

आपल्या बायकोच्या शब्दाला विरोध न करतां दादा म्हणाला, "अन् गेली असली तरी काय ? बरं का तें ? ऐकलं तर लोक काय म्हणतील ? गृहस्था-घरच्या सूनमाणसाची ही का रीत ?"

वहिनी म्हणाली, "मीं सांगतें, ती माहेरीं गेली नाहीं कीं बुडूनही मेली नाहीं — आम्हांलाच बुडवलंय मेलीनं !"

दादा गंभीर होऊन बसला होता. राखाल म्हणाला, "मी आतां जेवण झाल्यावर स्वतःच वसंतपूरला जाऊन पाहून येतों."

वहिनी फणकाऱ्यानें म्हणाली, "मग या तर पाहून. पण मी तुम्हांला सांगतें भावजी, कीं ती जर अशी गेली असेल तिकडं, तर तिला इकडे घेऊन येऊं नका. तिकडूनच परभारें घेऊन जा तिला आपल्या नोकरीच्या गांवीं. आम्हीं आपलीं गरीब गृहस्थ माणसं! अशा बद्‌चाल पोरीला नाहीं मी माझ्या घरांत घ्यायची."

राखाल तसाच कपाळावर हात घेऊन मुकाट्यानें बसून राहिला.

: २ :

राखाल तसाच किती तरी वेळ बसून राहिला होता. वहिनीनें आंघोळीला जायची घाई केली तेव्हां तेलाची वाटी व पंचा घेऊन तो तळ्यावर जायला निघाला. तोंच बशिरुद्दि शेख त्याच्या दादाला हांक मारीतच आला. तो गांवचा चौकीदार होता. राखालच्या दादानें त्याला विचारलें तेव्हां बशिरुद्दि म्हणाला, "काल तुम्हीं आपल्या धाकट्या सुनबाईला तिच्या बापाच्या घरीं पाठवली का दादा ठाकूर—?" दादानें होकार दिला तेव्हां तो म्हणाला, "तर मग खरं सांगितलं तर तिनं! काल एक प्रहर रात्र उरली होती. मी रोंद द्यायला निघालों होतों. गांवच्या सरहद्दीपर्यंत गेलों तो दोन बायका जातांना दिसल्या. एक होती म्हातारी अन् एक होती तरणी. तरणीनं तोंड झांकून घेतलं होतं तेव्हां ती कोण तें कळलं नाहीं. मीं त्यांना थांबवून हटकलं तेव्हां त्यांतली म्हातारी म्हणाली, कीं गाजनतोल्याला भटचाजजी घरीं जातों आहों आम्हीं. गाजनतोल्याला भटचाजजी आहेत कुठं असं मी म्हटलं, तेव्हां ती उगीच राहिली. मला संशय आला. मीं दरडावलं तेव्हां ती म्हातारी घाबरली आणि मला म्हणाली कीं, चौकीदार साहेब, मला मारूं नका. मीं वसंतपूरची सैरभीची आई. वसंतपूरला या पोरीचं माहेर. तिथला कृष्णदास घोषाल हिचा बाप—हिला माहेरीं घेऊन जातेंय. नी मग खोटं कां सांगितलंस असं मीं विचारलं तेव्हां ती म्हणाली, कीं मैनामतीच्या भटचाजजीच्या घरची ही धाकटी सून—तें ऐकून मीं तिला सोडून दिलं अन् मला संशय आला म्हणून मी खात्री करून घेण्यासाठीं तुमच्याकडे आलों."

" खरं सांगितलं तिनं. " दादा गंभीर होऊन म्हणाले. तो सलाम करून निघून गेला तेव्हां सर्वांनाच हायसें वाटलें. एकूण ती माहेरीं गेली तर! शंका आली होती त्याप्रमाणें ती कुणाचा हात धरून गेली नव्हती. सैरभीची आई पूर्वी बऱ्याच वेळां आली होती, त्यावरून ओळखीची झाली होती. अर्थात्, सूनबाई तिच्या बरोबर गेली तें एका अर्थी बरेंच झालें.

झालें तें लोकनिंदेला कारणीभूत होणार होतें—तरीपण एकंदरींत कलंक लागण्याजोगें त्यांत कांहीं नव्हतें. दादा रागारागानें म्हणाले, " आतां काय म्हणावं या पोरीला! माहेरीं जायचं तर जावं, पण जातांना कां सांगितलं नाहीं! कां आम्हां सर्वांना असं काळजींत लोटलं? आईला कांहीं तरी पत्र घातलं बेटीनं, अन् बोलावलं असेल घेऊन जायला कुणाला तरी! ही एक पोर, पण तिची आई तर पोर नव्हे. त्या म्हातारीला अक्कल नाहीं का? रात्रीच्या वेळीं पोरीला अशी पळवून नेली तर काय म्हणतील लोक? केवढा कलंक हा!"—दादाची बडबड सारखी सुरू होती असें पाहून राखाल स्नानासाठीं तळ्यावर गेला.

ही हकीकत ऐकून राखालही अस्वस्थ झाला होता. हीच का त्याची बायको? हेंच का तें प्रेम? नवऱ्याबरोबर परगांवीं जावें लागतें म्हणून पळावें का तिनें? असली ही बायको घेऊन संसार कसा होणार! मी येईपर्यंत एक दिवस तिनें वाट कां पाहूं नये? त्याला संताप आला होता.

यापुढें तिच्याशीं कसलाच संपर्क ठेवायचा नाहीं—पुन्हां लग्न करायचें!

पुन्हा त्यानें विचार केला. त्याला वाटलें एकदां तिच्या घरीं जावें अन् तिला स्पष्ट विचारावें.—चारचौघींसारखें रहायचें असलें तर चल माझ्याबरोबर. नसलं तर तसं स्पष्ट सांग, मी दुसरी बायको करीन आणि संसार थाटीन!—

दुपारीं जेवणखाण उरकल्यावर त्यानें घड्याळांत पाहिलें, दोन वाजले होते. तो उठून कपडे करून हातीं बॅग घेऊन निघाला. दरवाजाबाहेर पाऊल टाकतो तोंच स्वर्णलता धांवतच आली आणि 'कुठें जातां' म्हणून विचारूं लागली. 'वसंतपूरला जातों' असें त्यानें सांगितलें त्यावेळीं छोटी स्वर्ण म्हणाली, " काकीला कांहीं टाकून बोलूं नका हं, अन् तिला घेऊन लवकर या. उद्यां याल ना? "

तिची समजूत घालून तो वसंतपूरच्या रस्त्याला लागला.

कृष्णदास बाबू गांवच्या प्रतिष्ठित लोकांबरोबर 'बोअर युद्धा' च्या गोष्टी बोलत बसले असतांना वाटेच्या प्रवासानें थकलेला राखाल हातांत बॅग घेऊन येत असलेला पाहून चकित होऊन ते पुढें गेले आणि म्हणाले, "आलास बाबा राखाल! ये, ये, बैस! घरच्चीं सारीं खुशाल?"

हातांतील बॅग व छत्री खालीं ठेवून राखालनें सासऱ्याला प्रणाम केला तेव्हां त्यानें विचारलें, "केव्हां आलास खुश्रूपूरहून?" कुणा नोकराला उद्देशून तो म्हणाला, "अरे आंत कळव, जावई बाबू आले आहेत. पाय धुवायला पाणी दे म्हणावं. बरं का राखाल, आलास तें बरं झालं. लीलाला घेऊन आजच जाणार होतास ना खुश्रूपूरला?–"

"नाहीं. उद्यां जाईन म्हणतों."

"बरं, बरं, जायच्यापूर्वी भेटायला आलास होय? मग येतांना तिला कां आणलं नाहींस? जातांना भेटली असती आपल्या आईला—"

सासऱ्याचे ते शब्द ऐकतांच राखालवर वज्राघात झाला. त्याच्या हातापायांतून झिणझिण्या आल्या. त्याच्या डोळ्यांसमोर अंधेरी आली आणि मूर्च्छित होऊन तो एकदम खालीं पडला.

सारेच घाबरले. कुणीतरी आंत जाऊन बातमी दिली. कुणी पाणी घेऊन आले, कुणी पंखा घेऊन आले, कुणी त्याच्या कोटाचीं बटणें खोललीं, कुणीतरी त्याच्या तोंडावर पाण्याचा शिडकाव केला. तितक्यांत त्याची सासू येऊन दाराशीं उभी राहिली. त्याच्या सासूची बहीण लाजभीड बाजूला सारून बाहेर आली आणि तिनें त्याला सांवरून धरून ठेवलें. ती साऱ्या देवदेवतांना हांक मारीत होती.

तितक्यांत कुणीतरी डॉक्टरला घेऊन आले. त्यानें केलेल्या तात्पुरत्या उपायांनीं राखाल सावध झाला, तरीही उठून बसण्याइतकें त्राण त्याच्या अंगीं नव्हतें. त्याचे कपडे भिजले होते म्हणून त्याला सर्वत्रांनीं उचलून धरून आंत नेलें आणि त्याचे कपडे बदलले. औषध देऊन डॉक्टरही निघून गेले.

राखालला आंत नेऊन ठेवल्यावर कृष्णदासबाबू बाहेर येऊन बसले. गांवच्या जमीदाराचे कारभारी रामजीवन राय तितक्यांत त्यांना भेटायला आले. कृष्णदासबाबूंकडे त्यांनीं राखालची चौकशी केली त्यावेळीं ते म्हणाले, "त्याचं अंग जरा गरम होतंयसं वाटतं. बहुतेक ताप येईल असं दिसतं—"

इकडच्या तिकडच्या कांहीं गोष्टी झाल्यावर कृष्णदासबाबूनें विचारलें, "नवीनची कांहीं बातमी कळली का?" नवीन हा जमीनदाराचा धाकटा भाऊ होता. गेल्या रात्रीं तो एकाएकी कुठें नाहींसा झाला होता. चोहीकडे त्याचा तपास चालू होता.

रामजीवन म्हणाला, "अजून कांहीं पत्ता लागला नाहीं, तरीपण एक बातमी मिळाली आहे. गेल्या रात्रीं सैरभीची आई गाजनतोल्याच्या बाजारांत दिसली, तिच्याबरोबर नवीन होता. आज तिला बोलावून आणून आम्ही चौकशी केली, पण छोटेबाबूबरोबर आपण गेल्याचं ती कबूलच करीत नाहीं. करीमगंजच्या आपला एक नातेवाइक आजारी होता त्याला भेटायला आपण गेलें होतें ती आज सकाळीं आलें असें म्हणते. करीमगंजला जायचें म्हणजे गाजनतोल्यावरूनच जावं लागतं – कसं का असेना, चोंहीकडे माणसं पाठवलीं आहेत, आतां पत्ता लागतो कीं काय पाहूं. घरीं आईसाहेबांनीं रडून आकांत केला."

कृष्णदासबाबू म्हणाले, "आईच ती, बिचारी रडणारच. आम्हीसुद्धां सारखे हाय हाय करतों आहों. कुठं गेला हा छोकरा? बिचारा सुखरूप असला म्हणजे झालं."

थोड्या वेळानें रामजीवन गेल्यावर कृष्णदासबाबू घरांत आले, त्यावेळीं राखालचा ताप चांगलाच वाढून तो बेहोष झाला होता.

## : ३ :

सारा दिवस आकाशांत ढग आले होते. संध्याकाळच्या पूर्वीच पाऊस पडायला सुरवात झाली. राखाल खुश्रुपूरच्या त्या खुराड्यांत गालावर हात ठेवून बसला होता. खिडकीतून येणाऱ्या झडीमुळें त्याच्या मळक्या बिछान्याची एक बाजू भिजत होती पण त्याचें तिकडे लक्ष नव्हतें.

चोंहींबाजूनें तो गांजून गेला होता. सासुरवाडीला गेला तिथें पांच दिवस आजारी पडला. बरें वाटल्यावर त्याला तिकडली हकिकत कळली. गांवीं आल्यावर पाहतो तों तिथेंही आरडाओरड झाली होती. एकच दिवस घरीं

राहून तो पुन्हां खुश्रूपूरला आला. तितक्यांत इन्स्पेक्टर साहेब येऊन गेले होते, त्यांना कळून आलें कीं आजारी असल्याचें खोटें ढोंग करून तो रजेवर गेला. त्यानीं रिपोर्ट केला आणि एक महिन्याची नोटिस देऊन त्याला नोकरीवरून काढून टाकल्याचा हुकूम आला.

नोटिशीची मुदत संपायला दोनच दिवस राहिले होते. या मुदतींत तो इतका बदलून गेला होता कीं पूर्वी पाहिलेल्या माणसानें त्याला ओळखलें सुद्धां नसतें.

पाऊस पडत होता. तितक्यांत काळोख पडला. बाहेर वावटळ सुटली होती. तिकडे लक्ष न देतां तो आपल्या परिस्थितीचा विचार करीत होता. आतां दोन दिवसांनीं जायचें कोठें आणि खायचें काय ? असा प्रसंग आला तर लोक आपल्या गांवीं जातात, पण तोही मार्ग आतां बंद झाला होता. गांवांत सर्वत्र बदनामी झाली होती. घरांतून बाहेर पडतांना त्याच्या वहिनीनें यत्किंचितही सहानुभूति दाखवली नव्हती. सासुरवाडीहून आल्यावर तो एकच दिवस घरीं राहिला होता, तितक्यांत तिनें बोलून बोलून त्याला भंडावून सोडलें होतें. ती म्हणाली होती, “ती ब्याद आमच्या घरीं आणून तूं ठेवली नसतीस तर कशाला ही बदनामी झाली असती ? तूं आतां जाशील, आपल्या नोकरीवर चार पैसे कमावशील, पुन्हां लग्न करशील आणि सुखानें संसार करशील. इकडे आमच्या घराण्यावर जो हा कलंक लागलाय् त्याची फळं भोगावीं लागतील आम्हाला. उद्यां माझ्या मुलीचं लग्न होणं कठीण होईल. तुला काय त्याचं ?” तेव्हां घरीं जाऊन दादाच्या अन्नावर जगायचें आणि वहिनीच्या तोंडाच्या तोफेला तोंड द्यायचें त्याला कठिण गेलें. आपलें म्हणायला दुसरें त्याला कुणीच नव्हतें, मग दोन दिवसांनीं त्यानें जायचें कुठें ?

दुसरा मार्ग म्हणजे कलकत्त्याला जायचें आणि तिथें कुठेंतरी नोकरी पहायची. तो फारसा शिकलेला नव्हता, अर्थात् चटकन नोकरी मिळणें कठिण होतें. नोकरी मिळेपर्यंत चालायचें कसें ? पोस्टाच्या बँकेंत थोडेसे पैसे होते, पण इथलें देणें देण्यासाठींच ते संपणार होते. रेल्वेच्या प्रॉव्हिडंट फंडांतील पैसे तो डिसमिस झाल्यामुळें निम्मे कापले गेले असते. शिवाय ते पैसे मिळायलाही तीनचार महिने लागले असते—मग हे तीन चार महिने

काढायचे कसे ? उपाशीं मरायची पाळी समोर आलेली दिसत असल्यामुळें त्याच्या डोळ्यांसमोर काळोख दिसूं लागला.

खुश्रुरला आल्यापासून हेंच एक भूत त्याच्यासमोर उभें राहिलें होतें. निराशा अनावर होऊन संन्यास घेऊन कुठेंतरी जावें असें त्याला वाटूं लागलें होतें. काशीला दशाश्वमेध घाटावर जाऊन बसलें तर पोटभर अन्न मिळणें अशक्य नव्हतें.

सहाची घंटा स्टेशनवर वाजली त्यावेळीं पाऊस थोडासा थांबला होता. पाणीवाला भटजी आला आणि त्यानें केरोसीनचा दिवा लावून खिडकी बंद केली. रात्रींच्या जेवणासाठीं तो शिधा मागूं लागला तेव्हां राखाल म्हणाला, " आज मला भूक नाहीं. तसंच वाटलं तर स्टेशनवरच्या चार पैशाच्या पुऱ्या घेऊन खाईन. "

जेवणाचा आग्रह करायला त्याला आई नव्हती कीं बहिणही नव्हती. वादळाच्या रात्रीं जेवण करायचा त्रास चुकला म्हणून पाणीवाला भटजी खूष होऊन निघून गेला.

संध्याकाळीं सहापासून राखालची ड्यूटी होती. तारा घेणें, तिकिट विक्री करणें, गाडी पास करणें वगैरे सारीं कामें त्याला एकट्यालाच करावीं लागणार होतीं. रात्रीं बारा वाजल्यावर पॅसेंजर गाडी येऊन गेली म्हणजे त्याला झोंप काढतां आली असती.

तो पोशाख करून आपल्या कामावर रुजू झाला. पूर्वी त्यानें एकदां काशीला जाण्यासाठीं रेल्वेचा पास मागितला होता तो त्या दिवशीं आला होता. स्टेशनमास्तरनीं तो पास त्याच्या हातीं देऊन विचारलें, " आतां यापुढं काशीलाच जाणार आहेस का ? किती दिवस रहाणार आहेस तिथं ? "

" अजून कांहीं नक्की केलं नाहीं." असें म्हणून राखाल आपल्या कामाला लागला.

बाराची पॅसेंजर यायची वेळ झालेली होती. सिग्नलमन घंटा वाजवून पुकारीत होता. " चलो, पुरबके जानावाला मुसाफिर टिकस् लो. "

तिकीटाची खिडकी उघडून राखालनें कांहीं तिकिटें विकलीं. वादळी रात्र असल्यामुळें फारसे उतारू नव्हते. टोपी चढवून हातीं कंदिल घेऊन राखाल गाडी पास करण्यासाठीं ऑफिसच्या बाहेर आला. अजूनही आकाश ढगांनीं

झांकळलें होतें. मधून मधून वीज चमकत होती. प्लॅटफॉर्मवरच्या मिणमिणत्या दिव्यावरून तिथला काळोख अधिकच वाढलेला दिसत होता.

तितक्यांत गाडी आली. इंटरच्या डब्याजवळ कसला तरी आरडाओरडा सुरू झाला होता. त्या डब्यांतले लोक गार्डसाहेबाला हांका मारीत होते. कंदिल हातीं घेऊन राखाल डब्यापाशीं आला तेव्हां आंतले उतारू म्हणाले, " आंत एक उतारू मेला आहे बाबूजी. "

राखालनें खिडकींतून डोकावून पाहिलें. गाडींतल्या बांकाखालीं एक संन्यासी मरून पडला होता. त्याला आंत जाण्याचें धैर्य झालें नाहीं. बाकीच्या डब्यांतले बरेचसे लोक उतरून या डब्यापाशीं गर्दी करूं लागले.

राखालनें विचारलें त्यावेळीं एक उतारू म्हणाला, " फतुआ स्टेशनपर्यंत बुवाजी अगदीं चांगले होते. आमच्याबरोबर गप्पागोष्टी करीत होते. फतुआ स्टेशन सोडलं तेव्हां गांजा भरण्यासाटीं त्यानीं चिलीम बाहेर काढली. बटव्यांतला गांजा काढतां काढतांच त्यांचे हात थरथरूं लागले. हळूहळूं सर्वांगाला कंप सुटला. थोड्याच वेळांत ते हातपाय झाडूं लागले. आम्हीं सांवरायचा प्रयत्न केला पण आमचं कांहीं चालेना. त्यांच्या तोंडातून फेस येऊं लागला आणि लगेच सारं कांहीं थंडगार झालं. श्वास नाहीं. नाडी नाहीं. दहा मिनिटांतच सारा कारभार आटोपला. "

इतक्यांत गार्डसाहेब आले आणि त्यांनीं मुडदा खालीं घ्यायला राखालला सांगितलें. राखाल म्हणाला, " इथं मुडदा कशाला उतरायचा ? इथं डॉक्टर नाहीं कीं पोलिस नाहीं. "

गार्ड म्हणाला, " तें चालायचं नाहीं. गाडींत मुडदा ठेवतां येत नाहीं. डॉक्टरला ॲक्सिडेंट मेसेज दिला कीं तो येईल इथं. "

अर्थात् राखालला मुडदा उतरून घेणें भाग पडलें.

गाडींत त्या उतारूचा एक कमंडलू आणि एक घोंगडी होती, ते जिन्नस उतरून घेऊन गार्डनें पंचनामा केला. हे सर्व विधी होईपर्यंत पंधरा मिनिटें गेलीं. त्या इंटरच्या डब्यांतले सारे उतारू उतरून दुसऱ्या डब्यांत जाऊन बसले होते.

गाडी सुटल्यावर राखालनें पुढल्या स्टेशनला तार दिली. त्यांनीं सिग्नलमनला विचारलें, " हा मुडदा आतां कुठं ठेवायचा ? प्लॅटफॉर्मवर ठेवला

पार्सल-गुदामांत ठेवण्याबद्दल सिम्नलमननें सल्ला दिला तेव्हां तो मुडदा आणि त्याचें सामान नेऊन तिथें ठेवण्यांत आलें.

गुदाम बंद करून ॲक्सिडेंट मेसेज देण्यासाठीं तो परत ऑफिसांत आला तेव्हां स्टेशनवरचे कुली म्हणाले, " मढ्याला शिवलों हो बाबू. घरीं जाऊन स्नान केलं पाहिजे. "

राखालनें त्यांना जायला सांगितलें त्यावेळीं सिम्नलमन म्हणाला, " आतां कुठली मालगाडी यायचा संभव नाहीं. तुम्हीं परवानगी दिली तर एकदां घरीं जाऊन येतों. माझी बायको बीमार आहे. दोन वाजतां मी येतों. "

त्याला जायची परवानगी देऊन राखाल ऑफीसांत आला. ॲक्सिडेंटचा मेसेज दिल्यावर तारेच्या यंत्राला घंटा जोडून तो बिछान्यावर आडवा झाला. बाहेर मेघांचा गडगडाट सुरू होता. त्याला झोंप लागत नव्हती. स्वतःची काळजी होतीच, त्यांतून या मेलेल्या संन्याशाची हालत त्याच्या नजरेसमोर उभी राहिली. त्याला वाटलें, कोण हा संन्यासी ? बंगाली कीं हिन्दुस्तानी ? दिसत होता हिन्दुस्तान्यासारखा. कुठें जात होता कोण जाणें! उद्यां सकाळच्या गाडीनें मोकामेहून पोलीस येतील, तपास करूं लागतील, त्यावेळीं त्याचें तिकीट पाहिल्यावर तो कुठून आला तें आपोआप कळेल.

त्याला स्वतःचा विचार पडला होता. काशीला जायचा पास मिळाला आहे, इथें बसून करायचें आहे काय ? बैरागी व्हायचें ? आतां हाच कुणीतरी संन्यासी बैरागी गाडींत मेला, त्याच्यासाठीं रडणारें कोण आहे ? माझ्यासाठीं रडणारें तरी कोण आहे ! मी संन्यासी नसूनही संन्यासी ! एक महिनाभर बसून खायला मला जागा नाहीं ! काशीलाच जावें झालें ! आई अन्नपूर्णा तिथें अन्न देईल.

इतक्यांत त्याच्या मनांत एक कल्पना आली. बाहेर मेघांचा गडगडाट होत होता तो ऐकून तो शहारला. तरीही तीच कल्पना त्याच्या मनांत येत होती. त्याला वाटलें, या संन्याशाच्या ट्रंकेंत बराचसा पैसा अडका असेल — नावारस माणूस म्हणून कदाचित् तो पैसा पोलीस लांबवतील किंवा सरकारच्या तिजोरींत जाईल. मग तो मीच कां घेऊं नये ? त्याचा मालक हयात नाहीं, तेव्हां कुणाला लुबाडलें असें होत नाहीं. डोंगरावर फिरायला गेल्या वेळीं तिथें हिरा पडलेला दिसला तर तो आपण उचलून घेतोंच ना ? उत्तम योग आला आहे.

यावेळीं स्टेशनांत कुणीच नाहीं. गुदाम उघडून एकदां पहावें असें त्याला वाटलें.

कंदील हातीं घेऊन तो ऑफिसच्या बाहेर पडला. बाहेर कुणीच दिसत नव्हतें. जिकडे तिकडे काळोख होता. पाऊस कोसळत होता. गुदाम उघडून तो आंत शिरला.

दोन वाजायला वीस मिनिटें होतीं. घाई केली पाहिजे होती. दोन वाजतां सिग्नलमन येणार होता.

आंत बरेंचसें सामानसुमान पडलें होतें. मध्यभागीं भगव्या कफनींतला तो मुडदा होता. आवाज होऊं नये म्हणून पायांतले बूट काढून त्यानें कंदिलाच्या प्रकाशांत मुडद्याचा चेहरा पाहून घेतला. दिसायला तो देखणा होता. दाढीमिशी वाढलेली, जटा वाढलेल्या, त्याला असा पहातांच राखालच्या उरांत धडकी भरली. जिवाचा धडा करून त्यानें मुडदा चाचपून पाहिला. मुडद्याच्या कमरेला एक बटवा होता. त्यात दोन किल्ल्या एक तिकिट आणि कांहीं पैसे होते. चावी घेऊन त्यानें ट्रंक उघडली. त्या ट्रंकेंत भगवीं रेशमीं वस्त्रें, एक मच्छरदाणी, एक वाटोळा आरसा, सोन्याच्या सांखळीसकट सोनेरी घड्याळ, एक मेणबत्ती, दोन काड्याच्या पेट्या, एक पाणी प्यायचा लोटा, एक हिंदी भागवत, एक रामायण आणि शेवटीं एक थैली सांपडली. शिवाय भगव्या कपड्यांत गुंडाळलेलें एक दप्तर मिळालें.

राखालनें थैली आणि दप्तर काढून घेऊन बाकीचे जिन्नस तसेच ठेवले. थैली जड होती. आंत रुपये होते कीं मोहरा होत्या? इतरांत नुसते कागद होते कीं नोटा होत्या?

ट्रंक बंद करून त्यानें किल्ल्या पुन्हां बटव्यांत ठेवून दिल्या. तिकीट शिगथुहून हावऱ्याला जायचें होतें. तेंही त्यानें बटव्यांत ठेवून दिलें आणि बटवा होता तसा ठेवून दिला.

थैली आणि दप्तर घेऊन तो धांवतच आपल्या खोलींत आला. दोन्ही वस्तु एका पेटींत लपवून ठेवून सुरईतील पाणी ओतून घेऊन तो घटाघटा प्याला. त्याच्या सर्वांगाला घाम सुटला होता.

आफिसच्या खोलींत देखील हवा गरम वाटल्यामुळें तो बाहेर आला. बाहेर मिट्ट काळोख होता.

इतक्यांत पलीकडे कुणाचीं तरी पावलें वाजलीं. तो सिग्नलमन होता. दोन वाजेपर्यंत येण्याची त्यानें कबुली दिली होती त्याप्रमाणें तो आला आणि ऑफिसांत चटई टाकून झोंपी गेला.

थोड्याच वेळांत सिग्नलमन घोरूं लागला, पण राखलला झोंप येत नव्हती. ज्या फडताळांत त्यानें थैली व दप्तर ठेवलें होतें त्याला कुलूप नव्हतें. कदाचित् कुणी उघडलें तर? थैलींत आणि दप्तरांत काय असावें याची तो कल्पना करीत होता. इतक्यांत मालगाडी आली. तिच्या जाण्याची व्यवस्था करून तो आंत आला. सिग्नल देण्यासाठीं सिग्नलमन निघून गेला होता. तो निघून जाताच थैली आणि दप्तर चादरींत गुंडाळून घेऊन तो आपल्या राहायच्या खोलींत गेला आणि त्यानें दार लावून घेतलें.

मोठ्या कष्टानें त्यानें थैली उघडली. त्यांत मोहरा नव्हत्या. नुसते रुपये होते. त्यानें दप्तर सोडलें. त्यांत नुसते लिहिलेले कागद होते. कांहीं वर्तमानपत्रांचीं कात्रणें होतीं. दोन मोठ्याशा चोपड्या होत्या. त्या बंगालींत लिहिलेल्या होत्या. एका पाकिटावर पत्ता होता तो असा — श्री महन्त भजनानंदगिरी, तीनतारिया मठ, महादेवपूर पोस्ट, व्हाया शिराथु, इ. आय्. आर्.

हा माणूस बंगाली असावा असें त्याला वाटलें. आणि लेखकही असावा. लिहिलेलें पुस्तक छापायला देण्यासाठीं का तो कलकत्त्याला जात होता? एका चोपडीवर लिहिलें होतें.–'आत्मजीवनचरित–प्रथमखंड–कौटुंबिक जीवन' दुसऱ्या चोपडीवर लिहिलें होतें–'द्वितीय खंड–संन्यासजीवन.'

इतक्यांत स्टेशनवर घंटा वाजली. हिरवा दिवा देण्याची वेळ आली होती. घाईघाईनें थैली बंद करून आणि दप्तर गुंडाळून ट्रंकेंत टाकून खोलीला बाहेरून कुलूप लावून तो स्टेशनवर गेला.

*   *   *   *

पहांट झाली होती. बख्त्यारपूरहून पॅसेंजर सुटली होती. याच गाडीनें पोलीस येणार होते. राखालनें हमालाला पाठवून स्टेशनमास्तरला बोलावून घेतलें.

रात्रीं गाडींतून मुडदा आला आहे हें गांवांत कळल्यामुळें स्टेशनवर प्रेक्षकांची गर्दी झाली होती. गाडी सुटून जातांच सारे लोक स्टेशनांत घुसले. गुदाम खोलून मुडदा बाहेर आणण्यांत आला होता. प्लॅटफार्मवर खुर्चीवर

दरोगा, डॉक्टर व इतर अधिकारी बसले होते. डॉक्टरनें मुडदा तपासून मृत्यु स्वाभाविक असल्याचें सर्टिफिकिट दिलें.

पोलिसांनीं मुडद्याच्या कमरेचा बटवा काढून तिकिटावरचा त्याचा पत्ता पाहिला, पण त्याच्या नांवागांवाचा कांहीं सुगावा लागला नाहीं. बटव्यांत दहा रुपये आणि कांहीं आणे होते. दरोगासाहेब म्हणाले, "चला, मुडदा जाळायचा खर्च निघाला. आतां हा भार तरी सरकारवर नको. कुठल्या देशचा माणूस असावा हा?"

राखाल चटकन् "बंगाली" म्हणून बोलून गेला.

दरोगासाहेबांनीं विचारलें, "हा बंगाली आहे हें तुम्हांला कसं कळलं?"

राखाल घाबरून म्हणाला, "कोण जाणे! पण चेहऱ्यावरूनच बंगाली असावा असं मला वाटलं—एवढंच?"

आजूबाजूचे लोक मुडद्याच्या चेहऱ्याकडे न्याहाळून पहात होते. त्यांतला एकजण म्हणाला, "अरे हा संन्यासी तर थेट आमच्या छोट्याबाबूसारखा दिसतो."

सारेजण एकदां राखालच्या व एकदा त्या मुडद्याच्या चेहऱ्याकडे पाहून ताडूं लागले. एकजण म्हणाला, "अगदीं बरोबर. एवढी जटादाढी काढून टाकली तर थेट आमचे छोटेबाबू!"

स्टेशनमास्तर म्हणाले, "खरंच, वयानंही तेवढाच, वर्णही तसाच— एकंदरींत साम्य आहे खरं!"

डॉक्टर बाबूंनीं देखील तसेंच मत दिलें, तेव्हां दरोगाबाबू हंसून म्हणाले, "अहो छोटेबाबू, हा संन्यासी जर तुमचा भाऊ असेल तर याची उत्तरक्रिया तुम्हीच करा कीं! आतां दुसऱ्या कुठं कुणाला शोधायला जायचं!"

सारे लोक हसत सुटले. 'नाहीं नाहीं' म्हणत राखाल ओशाळून चालता झाला.

## : ४ :

त्या दिवशीं दुपारीं पाणीवाला भटजी आणि नोकर निघून गेल्यावर राखालनें आपल्या खोलीचा दरवाजा बंद करून घेऊन ट्रंक उघडून संन्याशाची थैली बाहेर काढली. मुळींच आवाज होऊं न देतां बिछान्यावर बसून तो पैसे मोजूं लागला. वीस रुपयांच्या कागदांत बांधलेल्या २५ बिट्टया होत्या–म्हणजे पांचशें रुपये.

आज राखाल खुषींत होता. हे पांचशें रुपये, बँकेंतले पैसे आणि प्रॉव्हिडंट फंडाचे पैसे मिळून ३।४ वर्षें सहज जाण्याइतकी पुंजी झाली होती. आतां कांहीं बैरागी बनून घाटावर भीक मागायला नको. या पैशांतून दुकान उघडतां येईल, तुपाचा किंवा कोळशाचा व्यापार करतां येईल, लहानसें कापडाचें दुकानही काढतां येईल, आतां कांहीं नोकरी करायला नको, या व्यापारांतून भरपूर नफा मिळवून श्रीमंत झाल्याची दृश्यें–दिवा स्वप्नें–त्याला दिसत होतीं. त्यांतच तो मशगुल झाला होता.

थोड्या वेळानें तो भानावर आला. थैली ट्रंकेंत ठेवून त्यानें दप्तर बाहेर काढलें. आंत जे लिफाफे होते. त्यांतील सर्व पत्रें हिंदी असल्यामुळें त्याला वाचतां आलीं नाहींत. एक बंगाली वर्तमानपत्राचें कात्रण होतें तें घेऊन तो वाचूं लागला :—

'नादीया–बासुलीपाडा येथील प्रख्यात जमीदार नगेंद्रनाथ चट्टोपाध्याय यांचा आद्य श्राद्ध समारंभ काल रोजीं मोठ्या थाटानें उरकण्यांत आला. चट्टोपाध्याय महाशयांचा सर्वांत वडील मुलगा गेलीं कित्येक वर्षे परागंदा झालेला असल्यामुळें त्यांचा धाकटा मुलगा देवेंद्रनाथ यानें श्राद्धक्रिया केली. त्यावेळीं दानधर्म सढळ हातानें करण्यांत आला. वगैरे वगैरे.'

हें कात्रण दोन वर्षांपूर्वीचें होतें. दुसरें कात्रण मिळलें. तें असें :—

### शंभर रुपये बक्षिस

गेल्या गुरुवारीं माझा वडील मुलगा भवेंद्रनाथ चट्टोपाध्याय घर सोडून नापत्ता झाला आहे. वय वर्षें १४. सांवळा वर्ण. माथ्यावरचे लांब केस, वगैरे वगैरे. पत्ता लावून देणारास वरील बक्षिस देण्यांत येईल. खालीं, नगेंद्रनाथ चट्टोपाध्याय, जमीदार बासुलीपाडा यांची सही होती.

हें कात्रण १६ वर्षांपूर्वींच्या 'बंगवासी' पत्रांतील होतें.

राखालला वाटलें, हा संन्यासी लहानपणींच पळून जाऊन संन्यासी झाला असावा. जमीदाराचा मुलगा, मग असा घर सोडून गेला कां? याचें जीवनचरित्र वाचलें पाहिजे.

त्या चोपड्या फार मोठ्या होत्या. त्या तारीखवार लिहिल्या असल्या तरी मधून मधून तारखा गाळल्या होत्या. द्वितीय खंडाच्या शेवटीं एक महिन्या-पूर्वींच्या तारखेखालीं असें लिहिलें होतें:—

'हा संन्यास टाकून पुन्हां गृहस्थाश्रम पत्करावा असें आज ठरलें, पण आधीं नीट तपास केला पाहिजे. माझी पत्नी हयात आहे कीं नाहीं? असल्यास तीं कोणत्या परिस्थितींत आहे? मी घर सोडून निघालों तेव्हां ती आठ वर्षांची होती. आतां ती चोवीस वर्षांची झाली असेल! अजून ती पवित्र राहिली असेल का? म्हणूनच ठरलें कीं गांवीं जावें. अशाच छद्म-वेषांत गांवभर हिंडून सर्व वृतांत मिळवावा. मठाची काय व्यवस्था करावी हेंही ठरलें पाहिजे—"

राखालनें कांहीं पानें उलटून पाहिलीं, त्यांत एका पानावर असें लिहिलें होतें:-

"माझे गृहस्थाश्रमांतील पिताजी स्वर्गवासी झाल्याचें आज 'बंगवासी' त वाचलें. तें वाचून मला फार धक्का बसला. पूर्वींच्या सान्या गोष्टी आठवल्या. गृहस्थाश्रम सोडून मीं आलों तें बरें केलें का? आध्यात्मिक जीवनाची परिणति आज माझ्या अपेक्षेप्रमाणें झालेली नाहीं. गुरुजींच्या मठाचा हा संसारच थाटून मी बसलों आहें ना? स्वतःचें चरित्रही निष्कलंक ठेवायला मी समर्थ झालों नाहीं. कसला मी महंत? लोक मला 'भजनानंद' न म्हणतां 'भोजनानंद' म्हणून माझी थट्टा करतात, तेंही कांहीं खोटें नाहीं. कोर्टांत मीं खोट्या साक्षी दिल्या. मठाचा दावा जिंकण्यासाठीं खोटे दस्तैवज केले. कुठलं पाप करायचं मीं ठेवलंय?"

दुसऱ्या एका पानावर लिहिलें होतें, "आजचा 'बंगवासी' वाचला. त्यांत माझा धाकटा भाऊ देवेंद्र याच्या मृत्यूची बातमी आहे. मीं घर सोडलें तेव्हां तो एक वर्षाचा होता. मीं नाहीं पण तो आहे, तो जमीदारी राखील असें मीं म्हणत होतों. आतां माझ्या म्हाताऱ्या आईचें समाधान कोण करील? जमीदारी कोण राखील? आज सारा दिवस विचार करीत होतों. घरीं परत जावें काय? अजून कांहीं ठरवतां आलें नाहीं."

हा मजकूर दोन महिन्यांपूर्वी लिहिला होता.

चोपडी बंद करून तो बिछान्यावरून उठला अन् त्या छोट्याशा खोलींत येरझारा घालूं लागला. तो खिडकींतून बाहेर पहात होता पण त्याला बाहेरचें कांहीं दिसत नव्हतें. त्याच्या चेहऱ्यावरचे विकार सारखे बदलत होते. केव्हां तो खिन्न झालेला दिसे, केव्हां साशंक दिसे, तर केव्हां केव्हां त्याचा चेहरा प्रफुल्ल होई, तर केव्हां तो विकट हास्य करूं लागे.

अशा रीतीनें एक तास गेला. राखाल पुन्हां येऊन आपल्या बिछान्यावर बसला. दोन्ही हातांनीं मस्तक दाबून धरून तो आपल्याशींच बोलत होता, "झाला निश्चय! मी जाणार! हा मोह आवरणं मला कठीण जातंय! वार्षिक लाख रुपये उत्पन्नाची जमीदारी, तरुण स्त्री, एक खोटा शब्द उच्चारतांच मला मिळतेय. आतांच त्याचा मुडदा भाजला. त्याचं वय, त्याचा वर्ण, त्याचा चेहरा सारं कांहीं माझ्यासारखं आहे. सोळा वर्षा-नंतर कुणाला कसं हें उमगणार? त्याचं जीवनचरित माझ्या हातीं आहे. त्यांत त्याच्या लहानपणाच्या वेळेपासून बारीकसारीक साऱ्या गोष्टी लिहून ठेवलेल्या आहेत. त्या साऱ्या तोंडपाठ करून पचवल्या कीं कुणाची शहामत आहे माझा संशय घ्यायची? राखाल, तूं आतां मर! तूं मर आणि भवेंद्र होऊन पुन्हां जन्माला ये."

# रत्नदीप

## ( द्वितीय खंड )

### : १ :

चैत्र महिन्याचा पहिला आठवडा होता तरीही उकाडा फार होत होता. दहा वाजायच्या सुमाराला कलकत्त्यांतल्या उत्तरेकडल्या एका सदर रस्त्यानें रेशमी छत्री माथ्यावर घेऊन एक तरुण धीरे धीरे चालला होता. तो मोठा देखणा होता. त्याचा पोशाखही जरासा थाटाचाच होता. त्याचें वय सुमारें बत्तीस किंवा तेहतीस असावें.

या तरुणाचें नांव खगेन्द्रनाथ बन्द्योपाध्याय. त्याचा बाप फार श्रीमंत होता. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या अपार संपत्तीचा अधिकारी जरी खगेन्द्र हाच झाला होता, तरी आतां मात्र तो अगदीं खंक होता. एक लाख रुपये खर्च करून त्यानें एक नाटक कंपनी काढली होती. पण तिचें दिवाळें वाजलें.

आपल्या ऐन अमदानींत खगेन्द्र एका दिवसांत नुसत्या भोजनसमारंभाला पांचशें रुपये खर्चीत होता. आतां तें सारें स्वप्न झालें होतें. विपन्नावस्था आल्यामुळें त्यानें जरी आपल्या खर्चाला आळा घातला होता, तरीही पैसे मिळवण्याची हांव त्याच्या हृदयांत रावणाच्या चितेसारखी धगधगत होती.

खगेन्द्र घराचा नंबर शोधीत शोधीत एका गल्लींत शिरला. त्या घरांतून बाजाच्या पेटीचा आवाज येत होता. त्यानें दारावर थाप मारली. दार

उघडणाऱ्या बाईला त्यानें "कनक आंत आहे काय ?" असें विचारलें तेव्हां तिनें नीटसें उत्तर दिलें नाहीं. तो एकदम आंत घुसला. ती बाई त्याला अडवीत होती पण तिचें न ऐकतां तो जिना चढून सरळ वर गेला.

घरची मालकीण कनकलता नुकतीच स्नान करून आली होती. पाठीवर मोकळे केस सोडून ती पेटी वाजवीत बसली असतांना खगेन्द्र आल्याचें पाहून तिनें उठून त्याचें स्वागत केलें.

खगेन्द्र तिला म्हणाला, "या असल्या गलिच्छ वस्तींत केव्हांपासून राह्यला आली आहेस, कनक ?"

ती म्हणाली, "झालं सुमारें एक वर्ष. त्या घरांत शेजारपाजारचीं माणसं फार त्रास देत. मी नटी असलें तरी मला एकांत आवडतो. म्हणून आलें आहें इथं. बरं हुक्का भरून आणूं का ?"

"नको, नको." खगेन्द्र म्हणाला, "माझ्यापाशीं सिगरेट आहे. आजकाल काय करतेस तूं ?"

"बेकार बसलें आहें. एक महिना झाला. नाटकमंडळींतली नोकरी सोडून दिली. मॅनेजरबरोबर भांडण झालं माझं."

"कां ? कसली भानगड होती ती ?"

"तें असं झालं, शहाजहान नाटकाची तालीम चालू होती. त्यांत असं वाक्य होतं—जहान आरेचं, 'हा पहा स्फटिकनिर्मित दीर्घ निश्वास—हा ताजमहाल पहा.' मॅनेजर म्हणूं लागले, 'स्फटिकनिर्मित' पर्यंत थांब आणि एक मोठा दीर्घ निश्वास सोड आणि मग म्हण कीं हा ताजमहाल पहा' ही त्या मॅनेजरची अक्कल. मी म्हटलं, 'या काय माकडचेष्टा !' झालं ! त्यांची माझी जुंपली. शेवटीं चाकरीवर लाथ मारून निघून आलें. ते सारखे बोलावणीं पाठवीत होते. पण मी अगदीं ढळलें नाहीं. हिमालयासारखी घट्ट बसून राहिलें." असें म्हणून कनक कांहीं वेळ गंभीर मुद्रा करून बसली. लगेच ती खुदखुदुन हंसूं लागली, तसा खगेन्द्रही हंसूं लागला. हंसणें थांबल्यावर ती म्हणाली, "आज कोणत्या उद्देशानं येणं झालंय आपलं ? दोन वर्षे आपली गांठ पडली नव्हती—नाहीं का ?"

"तसंच काम आहे म्हणून आलों. एक उत्तम नटी हवी आहे मला."

"पुन्हां नाटकमंडळी काढणार वाटतं ?"

"काढली तर येणार आहेस का?"

"हा काय प्रश्न झाला? अभिनयाचीं मुळाक्षरं मी पहिल्यांदा आपल्याच कंपनींत घेतलीं नाहींत का? त्यापूर्वी मला कोण ओळखत होतं? केव्हां सुरू करणार नाटक कंपनी?"

"यावेळीं नाटक कंपनी नाहीं." खगेन्द्र हंसून म्हणाला, "तूं बेकार बसून राहिली आहेस असं कळलं म्हणून तुझ्याकडे आलों. माझं काम चालू राहीपर्यंत मी तुला दरमहा दोनशें रुपये पगार देईन. अन् माझं काम पुरं करून दिलंस तर तुला चांगलंच भरपूर बक्षीस देईन."

"कसलं आहे हें काम?"

"तसं विशेष कांहीं नाहीं. एका आडगांवांत एका बड्या माणसाच्या सुनेची सोबतीण म्हणून राहिलं पाहिजे तुला —" असें म्हणून त्यानें एक वर्तमानपत्र काढून त्यांतील एक जाहिरात दाखविली. ती जाहिरात अशी होती :—

"आमच्या इस्टेटीची श्री. मुक्तेश्वरी वधुराणी महोदया हिच्यासाठीं एक कुलीन सहचरी पाहिजे. तिला बंगालीं लिहितां वाचतां यावें आणि जरूर पडेल त्यावेळीं तिनें मालकिणीची करमणूक करण्यासाटीं गाणें बजावणें करावें. रहाणें, जेवणखाण आणि लत्ताकपडा यांचा सर्व खर्च इस्टेटींतून होईल आणि वर तिला दरमहा पंचवीस रुपयेप्रमाणें मानधन दिलें जाईल. अर्जदार महिलेनें दोघां प्रतिष्ठित गृहस्थांच्या शिफारशीसह अर्ज करावा."

श्री. रघुनाथ मुझुमदार
मॅनेजर, बाशुलीपाडा इस्टेट.

जाहिरात वाचून झाल्यावर तो म्हणाला, "या जागेसाटीं अर्ज करायचा आणि तिथं कांहीं महिने राह्यचं."

कपाळाला आंठ्या घालून कनक म्हणाली, "काय आहे उद्देश आपला? ही वधुराणी आपली नातेवाईक आहे का?"

"अजून नाहीं. पण तेंच काम करायला हवं तूं. ती विधवा आहे. तिच्याबरोबर माझा पुनर्विवाह व्हावा असं जर कांहीं जमवून देशील —"

"अगबाई! म्हणतां काय?" गालावर हात ठेवून कनक म्हणाली, "पहिलं लग्न झाल्याशिवाय का पुनर्विवाह करणार आहां? ही दुर्बुद्धि कां आठवली तुम्हाला खगेन्द्रबाबू? फार देखणी आहे वाटतं ती बाई?"

"अजून तिला मी पाहिलीसुद्धां नाहीं."

"समजा — ती काळी आणि कुरूप असली तर?"

"असेना का कुरूप! काळ्या कुरूप मुलींचीं काय लग्नं होत नाहींत?"

डोळे मिचकावीत कनकलता म्हणाली, "भलं मोठं घबाड आहे वाटतं? डल्ला मारायचा आहे होय?"

"वेडी आहेस! मी तसला का माणूस आहें! नुसता पुनर्विवाह करून समाजाला धडा घालून द्यायचा आहे मला."

"थापा कशाला मारतां?" कनक म्हणाली, "समाजाला धडा घालून द्यायला खूप आहेत दुसरे लोक. ही वधुराणी त्या इस्टेटीची मालकीण आहे वाटतं? किती उत्पन्न आहे तिचं?"

"दरसाल एक लाख रुपये."

कनक तोंडभर हंसली आणि म्हणाली, "असं सरळ सांगा. आतां सारं कांहीं नीट कळलं मला. पण असं पहा, हिंदु घरांतली विधवा, अशी चटकन् पुनर्विवाह करायला तयार होईल असं कसं वाटलं तुम्हांला?"

"चटकन् तयार होईल असं वाटलं असतं तर तुझ्या घरीं कां आलों असतों? तेंच काम करायचं आहे तुला. तिची मैत्री संपादन करायची, हळूहळू तिला आपल्या विश्वासांत घ्यायचं, विधवा-विवाहावरचीं पुस्तकं, नाटकं, कादंबऱ्या तिच्या हातीं द्यायच्या — रमेश दत्ताचं 'संसार' आहे ना, तसलीं कांहीं पुस्तकं! मिशनरीसारखं काम करून घ्यायचं. तें काम कठिण आहे यांत शंकाच नाहीं, पण त्यासाठीं तुझ्यासारखी First class Artist हवी म्हणूनच ना मी तुझ्या दाराशीं धांवत आलों?"

त्याचें भाषण ऐकून खूष होऊन कनक म्हणाली, "ठीक आहे! माझ्याकडून प्रयत्न करून पाहीन. पण यामुळं मला कांहीं पेंचांत पडायला व्हायचं नाहीं ना खगेन्द्रबाबू?"

"पेंच कसला? इथं कांहीं चोरी करायची नाहीं, लांडीलबाडी करायची नाही, कीं खून करायचा नाहीं, नुसती शिष्टाई करायची. फार तर काय होईल, तुझ्यावर ती नाराज झाली तर तुला घालवून देईल, एवढंच ना?"

कनक विचार करीत बसली. खगेन्द्रनेंहीं दुसरी सिगरेट पेटवली. दोन तीन मिनिटें तीं दोघेंही स्वस्थ बसलीं होतीं. नंतर कनक म्हणाली, "बरं, किती वय आहे तिचं?"

" मला कळलंय – तेवीस – चोवीस. "

" केव्हां विधवा झाली ? "

" तसं म्हटलं तर ती आजन्म विधवा आहे. ती आठ वर्षांची होती तेव्हां तिचं लग्न झालं. लग्नानंतर दोन महिन्यांनीं तिचा नवरा पळून गेला. त्यानंतर चौदा वर्षे ती सवाष्ण वेषांतच रहात होती. दोन वर्षांपूर्वी तिचा सासरा वारला, त्यावेळीं श्राद्धाची अडचण आली. चौदा वर्षेपर्यंत जिचा नवरा नापत्ता ती विधवाच समजायची, असा शास्त्री पंडितांनीं निर्णय घेतला. दर्भाचा नवरा करून त्याचा दहनविधि केला. तेव्हांपासून गेलीं दोन वर्षे ती विधवेसारखी राहते. घरांत वडील माणूस म्हणायला एक म्हातारी सासू आहे. एक दीर होता, तोही मरून गेला. दुसरं कुणीच नाहीं. एकटं रहावत नाहीं म्हणून तिनं ही जाहिरात दिलीय वाटतं. "

कनकलतेनं ती जाहिरात पुन्हां वाचली आणि म्हटलें, " ठीक आहे — समजा, मी एक कर्मठ हिन्दु विधवा म्हणून अर्ज केला तर मला नोकरी देतील कशावरून ? त्याची खात्री काय ? "

" खात्री नाहीं खरी, पण संभव आहे. ब्राम्ह किंवा ख्रिस्ती मुलगी हवी असं म्हटलं असतं तर ती सहज मिळाली असती. पण गाणं-बजावणं करणारी कर्मठ हिन्दु बाई मिळणं तेवढं सोपं नाहीं. म्हणूनच मला आशा आहे. आतां दोन प्रतिष्ठित गृहस्थांची शिफारस पत्रं हवींत, त्याची व्यवस्था मी करतों. मी मसुदा तयार करून आणला आहे – हा पहा – " असें म्हणून त्यानें खिशांतले कागद काढून तिच्या हातीं दिले.

तो मसुदा वाचतांना कनक मधून मधून हंसत होती. वाचून झाल्यावर ती म्हणाली, " तुम्हांला बऱ्या नवलकथा लिहितां येतात खगेन्द्रबाबू. "

" आहे कबूल ? बोल ! " खगेन्द्र म्हणाला.

कनक म्हणाली, " आजचा दिवस मला वेळ द्या. मी एकदां नीट विचार करून पहातें आणि संध्याकाळीं काय तें उत्तर देतें. बरं, हें काम मीं बजावलं तर मला काय द्याल ? "

खगेन्द्र म्हणाला, " तूंच सांग ना. "

आलेलें हंसू आंवरीत कनक म्हणाली, " रोख वीस हजार – अन् कलकत्त्याला एक दुमजली घर. "

खगेन्द्र म्हणाला, "तथास्तु."

संध्याकाळीं ठरल्याप्रमाणें खगेन्द्र आला त्यावेळीं कनकनें मसुद्याप्रमाणें अर्ज लिहून ठेवला होता. तो वाचून पाहून खगेन्द्र म्हणाला, "तो माझा मसुदा दे ना."

"कशाला हवा तुम्हांला? मी ठेवून देतें तो तुमची आठवण म्हणून."

खगेन्द्र उगीच थोडासा हंसला आणि म्हणाला, "मी बेइमान झालों तर माझ्याविरुद्ध पुरावा म्हणून ठेवला आहेस वाटतं?"

"छे, छे, मुळींच नाहीं." कनक हंसून म्हणाली, "आपल्या हातची एक खूण म्हणून ठेवून देतें."

"बरं बरं. दे ठेवून." खगेन्द्र म्हणाला, "कांहीं भिऊं नकोस. मी तुला दगा देणार नाहीं. चोरांत देखील एक नीति असते. तशी नसती तर चोरीचा व्यवसायच चालला नसता."

कनकचा अर्ज घेऊन खगेन्द्र निघून गेला.

: २ :

बाशुलीपाड्याच्या जमीनदाराचा वाडा गंगेच्या कांठावर होता. वाड्याच्या मागच्या बाजूला बायकांना फिरण्यासाठीं कठडा केलेली बाग होती. त्या बागेंत देशी आणि विलायती नाना प्रकारचीं झाडें होतीं. फुलझाडें होतीं, तशीच फळझाडेंही होतीं. बसण्यासाठीं मधून मधून संगमरवरी बांकें होतीं. ही बाग गंगेच्या किनाऱ्यापर्यंत जाऊन पोंचली होती.

पहांटेच्या वेळीं एक विधवा अन्तःपुराचं दार उघडून बाहेर आली. ती शुभ्र वस्त्र नेसली होती. तिच्या उजव्या हातांत फुलांची परडी होती. दिसायला ती अत्यंत सुंदर होती. बाशुलीपाड्याच्या जमीदारीची एकटी एक मालकीण असलेली हीच इन्दुमती देवी.

तिच्या मागोमाग एक म्हातारी बाई हातांत वस्त्र घेऊन येत होती. बागेंतली वाट ओलांडून ती गंगेच्या घाटापाशीं आली. एक दोन पायऱ्या उतरून ती खालीं आली त्यावेळीं झुंजुमुंजु दिसूं लागलें होतें. त्या अस्पष्ट प्रकाशांत

दोन तीन पायऱ्या खालीं कांहींतरी पडलेलें होतें. तें माणूस होतें कीं लांकडाचें ओंडके होतें तें न कळल्यामुळें वधुराणीनें मोलकरणीला हांक मारून पाहयला सांगितलें. बिचारी मोलकरीण घाबरली. तिला वाटलें कीं तें जनावर असावें. ती जात नाहीं असें पाहून वधूराणीच पायऱ्या उतरून खालीं गेली.

पाण्यांतून वहात आलेली ती एक स्त्री होती. मोलकरणीला वाटलें कीं तें वाहून आलेलें प्रेत असावें. राणीनें पाहिलें, तों तिच्या काळजांत धुगधुगी होती. तिनें नीट चांचपून पाहिलें. तिची नाडी चालत होती.

त्या दोघींनीं धरून तिला उचलून वर आणलें. आपल्यापरीनें त्या तिला सावध करण्याचा उपाय करूं लागल्या. तितक्यांत उजाडलें. राणीनें पाहिलें तों त्या स्त्रीच्या मानेवर सभोंवती डाग पडला होता आणि मधून मधून झालेल्या जखमेंतून रक्त आलें होतें. राणीनें माणसांना बोलावून घेऊन डोली आणून तिला वाड्यांत नेलें.

बरेचसे उपाय केल्यानंतर ती सावध झाली.

त्यानंतर एक आठवडा उलटून गेला. तिसऱ्या प्रहरीं वाड्यामागच्या बागेंत एका चबुतऱ्यावर ती बाई बसली होती. आतां ती साफ बरी झाली होती. तिचें वय सुमारें वीस वर्षांचें असावें. तिची मुद्रा सदोदित उदासवाणी असे. केव्हांही पाहिलें तरी तिची नजर खालीं असे. सहसा ती वर नजर करून कुणाला पहात नसे.

ती सर्व प्रकारचीं सौभाग्यचिन्हें धारण करीत असे, पण तिनें आपल्याबद्दल कुणालाही कांहींही सांगितलें नव्हतें.

एक दासी दूध घेऊन आली. राणीनें तें तिच्यासाठीं मुद्दाम पाठवून दिलें होतें. बरोबर आणलेली सतरंजी आणि छोटा बिछाना त्या चबुतऱ्यावर अंथरून ती दासी म्हणाली, "तुमचं गांव कुठं आहे हो?"

तिला असले कांहीं प्रश्न करावयाचे नाहींत असें मालकिणीनें सांगितलें होतें. तो हुकूम मोडून तिनें पुन्हा एकदां विचारलें, "तुमचं घर कुठं, दिदी?"

"मसणांत!" सुरबाला म्हणाली. ती शुद्धीवर आली त्यावेळीं आपलें नांव सुरबाला आहे असें तिनें सांगितलें होतें.

"छे छे, असं कसं म्हणतां?" दासी म्हणाली, "तुमची सावली पडते. भुताची सांवली पडत नाहीं म्हणतात."

" मी भूत नाहीं. मी तुझ्यासारखीच माणूस आहें."

समोरून राणी येत होती असें पाहून चबुतऱ्यावर आडवी झालेली सुरबाला उठून बसूं लागली. त्यावेळीं राणी म्हणाली, " नको, नको. उठूं नको, तशीच पडून रहा. मी इथंच बसतें तुझ्याशेजारीं. बसून राहिलीस तर तुला त्रास होईल."

" आपण इथं बसल्या असतांना मी पडून राहीन कशी ?"

" त्यांत काय झालं ? तूं आहेस आजारी माणूस. मी चांगली धडधाकट आहें. आणखी असं पाहा, मी तुला 'तूं' म्हणते आणि तूं मला 'आपण' कां म्हणतेस ?"

राणीचें तें भाषण ऐकून सुरबालेच्या डोळ्यांत आसवें आलीं. दाटलेल्या गळ्यानें ती म्हणाली, " आपण राजेलोक. आपली दासी व्हायचीही माझी लायकी नाहीं, असं असतांनासुद्धां माझ्या प्राणावर बेतली असतां आपण मला जगवलं. माझ्यासाठीं आपण जें जें कांहीं केलं तें आईबहिणीनं सुद्धां केलं नसतं – तरीपण तुम्हीं मला जगवलंत हें कांहीं बरं केलं नाहींत."

" जगवलं हें बरं केलं नाहीं ?" राणीनें आश्चर्यचकित होऊन विचारलें. अजून राणीला सुरबालेचा इतिहास कळला नव्हता. ती पुरती बरी झालेली नसल्यामुळें तसले कांहीं प्रश्न विचारायचें आजवर तिनें टाळलें होतें. स्वस्थपणें बसून बोलण्याचा योग याचवेळीं आला होता.

सुरबाला म्हणाली, " माझ्यासारख्या हतभागी स्त्रीला मृत्यु आलेलाच बरा."

" छे छे ! असं कांहीं बोलूं नये." राणी म्हणाली, " देवानं दिलंय हें जीवन — मोठं दान आहे हें देवाघरचं. या जीवनाची उपेक्षा करणं म्हणजे देवाचा अपमान करण्यासारखं आहे."

सुरबाला म्हणाली, " देवानं जीवन दिलं खरं, पण त्या जीवनाबरोबर एवढा दुःखाचा बोजा कां लादला माझ्या माथीं ?"

" त्याला जें योग्य वाटलं तें त्यानं केलं. देवाच्या करणीला नांवं ठेवूं नयेत. देवानं दुःख पदरीं बांधलं तरी मुकाट्यानं तें ओटींत घेतलं पाहिजे."

सुरबाला दुसरीकडेसच पहात उगी बसली होती. तेव्हां राणी पुन्हां म्हणाली, " तुझं काय दुःख आहे तें सांगशील का मला ?"

सुरबालेनें उत्तर दिलें नाहीं. मनावरचा ताबा सुटून तिच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा लागल्या होत्या. तें पाहून राणी म्हणाली, " जाऊं दे. राहूं

दे. तूं रडूं नकोस. तुला एवढं वाईट वाटत असेल तर या बाबतींत मी पुन्हां कांहीं विचारणार नाहीं. फक्त एकच विचारतें, तुझे कुणी जवळचे नातेवाईक आहेत कीं नाहींत? आम्हांला कांहीं माहित नाहीं अन् तूंही कांहीं बोलली नाहींस. तसं कुणी काळजींत असलं तर त्यांना कळवायला हवं का?"

सुरबाला हळूहळू उठून बसली. ती म्हणाली, "माझी खबर मिळाली नाहीं तर काळजींत पडेल असं कुणीसुद्धां नाहीं. माझ्या दुर्भाग्याला सीमा नाहीं. मी माझी कुठलीच ओळख तुम्हांला दिली नाहीं. जें कांहीं सांगितलं तें सुद्धां अगदीं काल्पनिक. तुम्हीं मला नवा जन्म दिलात, आतां तुमच्यापाशीं माझी एकच प्रार्थना आहे —" असें म्हणून सुरबालेनें राणीचे पाय धरले, 'हें काय, हें काय' असें म्हणत राणीनें तिचे हात दूर केले तेव्हां सुरबाला काकुळतीला येऊन म्हणाली, "माझी एवढीच प्रार्थना — आपला हा संसार म्हणजे राजाचा संसार. देवाच्या दयेनं आपल्याला कसलीच उणीव नाहीं. कितीतरी दासदासींचा आपण प्रतिपाळ करतांहां तसाच माझाही करा. या कुडींत प्राण असेपर्यंत मला आपल्या आश्रयाला ठेवा."

तिचें तें काकुळतवाणें भाषण ऐकून राणी गहिंवरली. आपल्या पदरानें तिचे डोळे पुसून ती म्हणाली, "एवढंच ना? एवढ्यासाठीं इतकं काकुळतीला कशाला यायला हवं? मी कुटं तुला जा म्हटलं होतं? तूं इथंच रहा — आनंदानं रहा. आतां हे डोळे पुसून रडं थांबव पाहूं."

संध्याकाळ झाल्यामुळें त्या दोघी उठून आंत जायला निघाल्या. आंत जाऊन बसल्यावर राणी म्हणाली, "असं पहा, मी इथं एकटी असतें. माझ्या जोडीला कुणी नाहीं. तेव्हां मला फार कठीण जातं. कुणीतरी सोबतीण पाहिजे म्हणून जाहिरात द्यायला मी दिवाणजींना सांगितलं होतं. बाहेरची कुणीतरी बाई येण्यापेक्षां तूंच मला सोबत कर म्हणजे झालं. मी काकांना सांगून टाकतें — कसं?"

सुरबालेचा गळा दाटून आला. ती म्हणाली, "आपले हे उपकार मी केव्हांही विसरणार नाहीं."

## : ३ :

दुसऱ्या दिवशीं सकाळीं राणी दिवाणजींना बोलवायला पाठवीत होती तो ते स्वतःच आले. रघुनाथ मजुमदार हे या जमीनदारीचे वडिलोपार्जित दिवाण होते. त्यांची साठी उलटून गेली होती, तरीही ते अजून थकले नव्हते. राणीच्या स्वर्गवासी सासऱ्याचा त्यांच्यावर फार विश्वास होता. या वाड्यांत ते कुटुंबांतल्या एखाद्या माणसाप्रमाणेंच वावरत असत. राणी त्यांना 'काका' म्हणत असे.

काकांना योग्य तें उत्थापन देऊन राणी म्हणाली "मी आत्तांच तुम्हांला बोलावणार होतं. पण तुम्हीं आलांत तेंच बरं झालं. काय काम होतं ?"

"परवां गंगाघाटावर जी बाई तुम्हांला मिळाली, तिची कांहीं खबर कळली का ? कोण ती ? कुठून आली ? मला वाटतं, पोलिसनां कळवावं—"

"पोलिसांना कशाला कळवायला हवं, काका ? बिचारी गरीब बाई, होडींतून जातांना पडली, वहात वहात घाटाला लागली, मला सांपडली तेव्हां मी तिला आश्रय दिला, त्यांत पोलिसांना काय कळवायचं ? पोलिस लोक उगीच भलभलते प्रश्न विचारून तिला त्रास देतील मात्र."

दिवाणजी म्हणाले, "त्यासाठीं नव्हे, पण तिच्या गळ्यावर म्हणे दोरीचा डाग होता—तेव्हां कुणी तिला फांस लावला होता कीं तीच फांस लावीत होती, तें कळलं नाहीं म्हणून मी म्हणत होतों. अजून आहे का तो डाग ?"

"बहुतेक गेल्यासारखाच आहे तो."

"मग कांहीं हरकत नाहीं. आज मी आलों होतों तों त्यासाठीं नव्हे. हीं जाहिरातीचीं उत्तरं आलीं आहेत. पांचजणींचे अर्ज आले आहेत—"

सुरबालेला आपली सोबतीण म्हणून ठरवल्याचें सांगायचें तिच्या तोंडावर आलें होतें, पण संकोचानें ती बोलली नाहीं. आधीं काय अर्ज आले आहेत तें पहावे आणि मग तसें सांगावें असें तिनें आपल्या मनाशीं ठरवलें.

दिवाणजींनीं पहिले चार अर्ज वाचून दाखविले. ते फारसे समाधानकारक नव्हते. पांचवा अर्ज आला होता त्यांतील सुरवातीचा निवेदनाचा भाग सोडून असें लिहिलें होतें:—

"माझे पिताजी हयात नाहींत. त्यांचें नांव योगजीवन बंद्योपाध्याय. रहाणार

बहरमपूर. मी बंगाली साहित्याचा चांगला अभ्यास केला आहे. रामायण महा-भारतापासून सुरवात करून आजचे कवि, नाटककार आणि कादंबरीकार यांचे सर्व ग्रंथ वाचले आहेत. मी संगीताचाही थोडाबहुत अभ्यास केला आहे. मला गातां येतें त्याचप्रमाणें हार्मोनियम, सारंगी आणि व्हायोलीन मला वाजवतां येतें. पण अलिकडे हीं हत्यारें हाताशीं नसल्यामुळें आणि जुन्या काळच्या घराण्यांत माझें लग्न झाल्यामुळें मला तो अभ्यास सोडावा लागला होता. माझें लग्न थोडें उशीराच झालें. कारण माझे पिताजी थोडेसे नव्या मताचे होते. त्यांच्या मृत्यूमुळें मला माझ्या चुलत्याच्या घरीं जाऊन रहावें लागलें आणि मी वाढलेली असल्यामुळें त्यांनीं एका प्रौढ वराशीं माझें लग्न लावून दिलें. तिथेंही माझें दुर्दैव उभें राहिलें. तीन वर्षांपूर्वी कॉलऱ्यानें माझ्या पतीचा मृत्यु झाल्यामुळें माझ्या सीमंतावरचा सिंदूर पुसला गेला. माझें सासर गरिबीचें, त्यामुळें अन्नवस्त्राच्या अभावीं मला कलकत्त्याला माझ्या भावा-कडे यावें लागलें. माझा भाऊ चाळीस रुपये पगारावर मास्तरची नोकरी करून कायद्याचा अभ्यास करीत असतो. याच वर्षी तो कायद्याची परीक्षा पास झाला. कुठेंतरी पश्चिमेकडे जाऊन वकिली करावी अशी त्याची इच्छा असली तरी माझ्यामुळें तो गुंतून पडला आहे. त्याच्या प्रगतीच्या मार्गांत मी आड येऊन बसलें आहें. पण ही जाहिरात पाहिल्यामुळें मला आशा उत्पन्न झाली. वधुराणीची सेवा करण्यासाठीं मी माझ्या जिवाचें रान करीन. मला आपण ही नोकरी दिली तर एका अनाथ विधवा ब्राह्मणकन्येला जगवल्याचें श्रेय आपणांला मिळेल वगैरे वगैरे."

खालीं 'कनकलतादेवी' अशी सही होती. तें पत्र वाचून दाखवल्यावर दिवाणजी म्हणाले, "मला वाटतं, हिचीच नेमणूक करावी. तुम्हांला काय वाटतं?"

त्या बाईची करुण कहाणी ऐकून राणीलाही तिची दया आली होती. तिला वाटलें, हीही राहील आणि सुरबालाही राहील. देवाच्या दयेनें आपल्याला कांहीं कमी नाहीं. ती उघड म्हणाली, "ठीक. जें तुम्हांला पसंत, तेंच मलाही पसंत आहे, काका. तिला नेमणुकीचें पत्र लिहा. कांहीं खर्चाला आगाऊ पाठवलं पाहिजे ना तिला?"

"नोकरीवर पहिल्यांदा रुजू होणाऱ्या माणसाला असं कांहीं आगाऊ पाठविण्याचा शिरस्ता नाहीं."

राणी म्हणाली, "पण ही स्त्री आहे—त्यांतून तिची परिस्थिति देखील—"

दिवाणजी हंसले आणि म्हणाले, "बरं बरं. तुम्ही म्हणतांच आहां, त्याअर्थी हिशेब करून पैसे पाठवितों—"

राणी म्हणाली, "गरिबींतली रहाणारी ती, इथं यायचं म्हणजे जरा नीटनेटका कपडालत्ता पाहिजे, त्याच्यासाठीं कांहींतरी नको का पाठवायला? मला वाटतं, येण्याच्या खर्चासाठीं जें पाठवायचें त्याशिवाय आणखी पन्नास रुपये पाठवा तिला."

"ठीक आहे." दिवाणजी म्हणाले, "भारीच दयाळू अंतःकरण आहे तुमचं."

दिवाणजींनीं कनकलतेच्या नांवें नेमणुकीचा हुकूम आणि खर्चाची मनी-ऑर्डर पाठवली. थोड्या दिवसानीं 'दादा' ला बरोबर घेऊन कनक हजर झाली. दादा म्हणजे दुसरा कुणी नव्हे—खगेन्द्रनाथ.

गाडींतून उतरतांच खगेन्द्र बैठकखान्यांत आला आणि कनकलता अन्तःपुरांत गेली. खगेन्द्रासारखा अत्यंत देखणा माणूस आलेला पाहून सारेजण त्याच्याकडे टकमक पहातच राहिले.

चहाफराळ वगैरे झाल्यावर दिवाणजींनीं खगेन्द्राला आपल्या कचेरीच्या खोलींत बोलावून घेतलें. प्रवासाची वगैरे चौकशी झाल्यावर पश्चिमेला कोणत्या गांवीं वकिली करणार असें दिवाणजींनीं विचारलें तेव्हां खगेन्द्र म्हणाला, "समजा, पश्चिमेला न जातां इथें मी कृष्णनगरचीच सनद घेतली, तर आपल्या इस्टेटीचं कोर्टांतलं काम मला मिळेल का?"

दिवाणजी म्हणाले, "आमच्या इस्टेटीची व्यवस्था अशी आहे, कीं आम्हांला कोर्टांत जायची पाळीच येत नाहीं. आम्हीं आमच्या कुळांचे तंटे आपसांतच मिटवतों. तशीच कांहीं महत्त्वाची बाहेरची दावादरखास्त असली तर सदरला आमचे वकील आहेत तेच तीं कामं पहातात."

पाहुण्यांच्या स्नानभोजनाची व्यवस्था करण्याचा दिवाणजींनीं हुकूम सोडला, तेव्हां खगेन्द्रही उठून गेला.

कनकलतेबरोबर खलबत करून खगेन्द्र ज्यावेळीं बाशुलीपाड्याला आला त्यावेळीं वधूराणीची कोणत्या ना कोणत्या प्रकारें भेट घडवून आणायची त्याची

इच्छा होती, पण बरेच दिवस राहूनही तसा योग आला नाहीं. कनक अन्तःपुरांत गेली. तिला बाहेर येतां येत नव्हतें आणि खगेन्द्र बैठकखान्यांत होता त्याला अन्तःपुरांत जातां येत नव्हतें. बंगालच्या जुन्या घराण्याच्या पद्धतीप्रमाणें अन्तःपुर एक मोठ्या भिंतीआड होतें. गच्चीलादेखील चारी बाजूंनीं भिंतवजा कठडे होते. त्या कठड्यांना छिद्रें असल्यामुळें गच्चीवरच्या माणसाला बाहेरचीं माणसें दिसत, बाहेरच्या माणसाला गच्चीवरचीं माणसें दिसणें अशक्य होतें.

या जागीं आल्यानंतर कनकनें कुठवर मजल मारली होती हें कळण्यासाठीं चार दिवस गेल्यावर खगेन्द्रानें आपल्या 'बहिणी' ची भेट घेण्याची इच्छा दिवाणजींपाशीं प्रदर्शित केली. राणीजींची संमति मिळाली म्हणजे भेट घेतां येईल असें दिवाणजींनीं सांगितलें, तेव्हां खगेन्द्र मोठ्या पेंचांत पडला.

शेवटीं संमति मिळाली. शक्य तितका नीटनेटका पोषाख करून खगेन्द्र एका दासीबरोबर अन्तःपुरांत जायला निघाला. दोन तीन दालनें आणि एक मोठें माजघर ओलांडून त्याला एका खोलींत नेऊन बसवण्यांत आलें. ती खोली म्हणजे राणीची कचेरीची जागा होती.

थोड्या वेळानें कनक आली त्यावेळीं दोघांनींही बहीण-भावाच्या नात्यानें एकमेकांची चौकशी केली. नंतर दोघेंही खालच्या आवाजांत बोलूं लागलीं खगेन्द्रानें विचारलें, "कशी काय आहे तुझी वधुराणी?"

"म्हणजे रूपानं का? तशी कांहीं अगदीं पद्मिनी नाहीं कीं हिडिंबाही नाहीं."

"रूपानं नव्हे. मी म्हणतों, भोळी आहे कीं चलाख आहे?"

"तशी कांहीं भोळी नाहीं. मला वाटलं होतं, या खेडवळ बाया म्हणजे अगदींच गुरांसारख्या — पण ही मात्र अगदीं हुषार आहे — मोठी चतुर आहे. वागणुकीला बरी आहे. मला अगदीं बरोबरीच्या नात्यानं वागवते. तशी आहे अगदीं जुन्या रीतीभातीची. सजवलेली स्वतःची खोलीसुद्धां नाहीं तिची. झोंपते सुद्धां सासूच्या खोलींत. तिची स्वतंत्र अशी खोलीच नाहीं मुळीं. मला तिनं माझी खोली माझ्या मर्जीप्रमाणें सजवायची मुभा दिली आहे. मला जरूर ते जिन्नस दिवाणजींच्या करवीं तिनं आणून देववले. तशी कांहीं ती गाणारी नाहीं — पण बायकी आवाजांत गुणगुणते. मला तिनें एकदां गायला

सांगितलं, तेव्हां मी ब्राह्म लोकांच्या प्रार्थनासंगीतांतलं एक गाणं म्हटलं. नाटकांतलीं पदं येतात का म्हणून तिनं विचारलं, तेव्हां मीही चारदोन येतात म्हणून म्हटलं. एक जरासं शृंगारिकच पद म्हणायला सुरवात केली, तेव्हां तिनं मला थांबवलं आणि विचारलं, कीं मी हें गाणं कुठं शिकलें म्हणून. मीं म्हटलं, नाटकांतच ऐकलं होतं — तेव्हां ती म्हणाली, नाटकांतलीं गाणीं अशींच असलीं तर नाटकांतलीं पदं म्हणूं नकोस. दुसरं कांहींतरी चांगलंसं म्हणून दाखव. मी रविबाबूंचं एक गाणं म्हटलं तेव्हां तें तिला फार आवडलं. ”

खगेन्द्र खिशांतलं घड्याळ काढून म्हणाला, “ तें जाऊं दे. माझ्या कामाचं काय झालं ? तुझ्या राणीची ओळख होणं तर दूरच, पण ती अजून नुसती दिसलीसुद्धां नाहीं मला. मी खूप खूप इकडे तिकडे हिंडून पाहिलं, पण तुमचं इथलं अन्तःपुर म्हणजे मुर्तिमंत तुरुंग. ”

“ तें खरंच ! ” कनक म्हणाली, “ गच्चीवर जाऊनही ती कांहीं तुम्हांला दिसायची नाहीं. थांबा, मी एक युक्ति करतें. उद्यां याच वेळीं मला एकदम फीट येईल. सारीजणं माझ्यावर मग पाणी मारतील, वारा घालतील तेव्हां अर्धवट डोळे उघडून ‘ माझ्या दादाला घेऊन या हो ’ म्हणून काकुळतीला येऊन सांगेन. मग ते तुम्हांला घेऊन येतील. असं एक दोन दिवस सोडून करीत जाईन. नंतर तुमची जायची वेळ येईल. तेव्हां कुणाला तरी दासीला बोलावून म्हणा, ‘ मी आतां जातोंय. माझी बहीण इथं आहे. आपलं घर सोडून ती दुसरीकडे कुठें राहिली नव्हती, तेव्हां जायच्यापूर्वी राणीजींची भेट घेईन म्हणतों. चिकाच्या पडद्याआडून मी त्यांच्याशीं बोलेन.’ असं सांगितलंत म्हणजे तुम्हांला परवानगी मिळेल. नंतर कसं बोलायचं तें तुमचं तुम्हीं पहा. बोलण्यांत तिच्यावर अगदीं छाप टाका. तेवढं झालं, म्हणजे पुढं काय करायचं तें मी पहातें. ”

खगेन्द्र हंसला आणि म्हणाला, “ ही तुझी युक्ति छान आहे. आतां तसंच करतों. फार वेळ झाला. लोक म्हणतील या भाऊबहिणींच्या गोष्टी संपतां संपत नाहींत. ”

तो जायला निघाला तेव्हां कनक म्हणाली, “ आणखी एक गोष्ट — तुम्हीं गेलांत म्हणजे आपला एक छानसा फोटो पाठवून द्या. राणीजींसाठीं जी खोली

शृंगारायला मला सांगितलंय, तिथं बाकीच्या चित्रांबरोबर हा तुमचा फोटोही मी लटकावून ठेवीन. त्याचा कांहीं उपयोग झाला तर पाहूं."

खगेन्द्रनें तें कबूल केलें आणि कनकनें दासीला बोलावून खगेन्द्रला अन्तःपुरांतून त्याच्या बैठकखान्यांत पोंचवायला सांगितलें.

## : ४ :

यानंतर एक महिन्याची गोष्ट. राणीच्या इच्छेप्रमाणें कनकलतेनें तिची खोली सजविली होती. भिंतीवर विलायतेंत छापलेलीं निसर्गचित्रें आणि कांहीं वाराणशीप्रभृति तीर्थस्थानांचीं चित्रें टांगलेलीं होतीं. या चित्रांत कनकनें आपल्या दादाचा फोटो लावलेला पाहून राणी म्हणाली, "तो आपल्या खोलींत नेवून लाव." यावेळीं कनकनें आपलें अभिनयकौशल्य दाखवून डोळयांत पाणी आणून म्हटलें, "मीं आपल्याबरोबर सारा दिवस याच खोलींत असणार. रात्रीं कधीं मी आपल्या खोलींत जाणार. मला आई नाहीं बाप नाहीं, दादाखेरीज या जगांत कोण आहे मला! इथं फोटो लावला तर तो माझ्या नजरेसमोर राहील दिवसभर!" तिच्या त्या ढोंगाला बळी पडून राणीनें तो फोटो त्यांच खोलींत लावायची परवानगी दिली.

त्या दिवशीं राणी एक स्वच्छ पांढरी साडी नेसून बसली होती. गंगास्नान करून आल्यामुळें तिनें केस मोकळे सोडले होते. रोज तिचा हाच वेष असे. कनकलताही तसाच पोषाख करी पण केसांची वेणी घाली.

खिडकींतून झुळझुळ वारा येत होता. राणी म्हणाली, "कुणाला तरी सांगून खालीं जाऊन पंखा बंद करायला सांग."

कनक म्हणाली, "ओढीना का पंखा! दरमहा पगार घेतेय, तिनं मेहनत नको करायला?"

"पंखा ओढतां ओढतां बिचारीचे हात दुखत असतील. चांगला वारा येतोय्, मग उगीच कशाला त्रास तिला. जा सांगून ये."

दोन दिवसांपूर्वी कनकलतेनें आपल्या 'दादा' कडे राणीचें जें वर्णन केलें होतें तें किती चुकीचें होतें, त्याची तिला कल्पना आली. तिला श्रीमंतीच्या

अभिमान नव्हता खरा, पण एरवीं ती मोठी दृढनिश्चयी होती. तिनें एकादी गोष्ट एकदां ठरवली म्हणजे त्यांत बदल होणें केव्हांही शक्य नव्हतें.

शुक्ल पक्षांतील दशमीचा चंद्र आकाशांत तळपत होता. पूर्वेच्या खिडकीं-तून पिठासारखें चांदणें आंत येत होतें. राणी कनकला म्हणाली, "एक गाणं म्हण पाहूं. रविबाबूंचं एकादं गाणं म्हण."

"दिवा मालवूं का?" कनक म्हणाली, "या चांदण्यापुढं दिव्याचा उजेड म्हणजे थट्टाच."

राणीनें दिवा मालवायला सांगितलें तेव्हां तसें करून कनक बाजाची पेटी घेऊन गाऊं लागली.

गाणें संपलें त्यावेळीं कनकला दिसून आलें कीं डाव्या हातावर गाल ठेवून राणी खिडकीच्या बाहेर पाहात राहिली आहे, तिच्याजवळ जाऊन कनक म्हणाली, "कसला विचार करतां आहां?"

राणी म्हणाली, "असं वाटलं मला, हें गाणं आम्हांला काय होय? आमची सोन्याची तरणी कुठं कांठाला लागणार आहे? माझी नाहीं—तुझी नाहीं—"

कनक एक सुस्कारा सोडून म्हणाली, "कोण जाणे!"

तिचा तो उद्‌गार ऐकून राणीला आश्चर्य वाटलें.

"मी मोठी दुर्दैवी आहें." दाटलेल्या गळ्यानें कनक म्हणाली.

"काय झालंय्?" राणीनें विचारलें.

कनक कांहीं बोलली नाहीं. राणी सारखी विचारीत होती तरीही कनक बोलत नाहीं असें पाहून राणी म्हणाली, "आज तुझं कलकत्त्याचं पत्र आल्या-पासून तूं उदास झालेली दिसते आहेस. तुझा दादा खुशाल आहे ना? तसंच कांहीं विशेष असलं तर मन मोकळं करून सांग. माझ्याकडून त्याचं निवारण होण्याजोगं असलं तर मी अवश्य करीन."

कनक म्हणाली, "आज दादाचं पत्र आलंय, तें वाचल्यापासून मीं मोठ्या घोटाळ्यांत पडलेंय्—"

"काय आहे तें मला सांग ना! कांहीं हरकत आहे का?"

"तशी कांहीं हरकत नाहीं. उलट दादानं तुमचा सल्लाच घ्यायला सांगितलंय मला." असें म्हणून ती उठून आपल्या खोलींत गेली आणि तें पत्र तिनें राणीच्या हातीं दिलें.

क्षणभर विचार करून राणी तें पत्र घेऊन वाचूं लागली. सुरवातीला राणीची बरीचशी स्तुति केलेली होती. त्यानंतर त्यानें लिहिलें होतें :—

"तूं लहान असल्यापासूनच मी तुझी किती माया करीत होतों तें तूं जाणतेस. तुझ्या सातव्या वर्षी तुझी आई गेली. बाबांनीं मरतांना तुला माझ्या हवालीं केलें. मोठ्या कल्पना मनांत बाळगून मीं तुझें लग्न लावून दिलें, पण दुर्दैवानें तूं तीनच वर्षांत विधवा झालीस. विधवेच्या वेषांत तूं घरीं आलीस त्यावेळीं माझ्या हृदयांत आग पेटली. अजून ती आग तशीच धगधगते आहे. म्हणूनच मी अजून लग्नाच्या भानगडींत पडलों नाहीं. माझी आवडती बहीण वैधव्याच्या खाईंत पिचत असतांना काय मीं लग्न करून संसार थाटूं?

"अल्पवयांत विधवा झालेल्या स्त्रीनें जन्मभर त्याच आगींत जळतपिचत राह्यची प्रथा या आपल्या बंगालखेरीज कोणत्याही सभ्य देशांत नाहीं. हिंदु-शास्त्रांत देखील विधवेच्या विवाहाला संमति आहे हें विद्यासागरप्रभृति पंडितांनीं सप्रमाण सिद्ध केलें आहे. विरोध आहे काय तो रुढीचा. आतां तोही विरोध हळूहळू कमी होऊं लागला आहे. तूं सुशिक्षित आहेस तशीच बुद्धिमती आहेस. सोबत मी दोन पुस्तकें पाठवीत आहें, ती अवश्य वाचून पहा. त्यांत तुला विधवाविवाहाच्या समर्थनाचे सर्व शास्त्रोक्त आधार सांपडतील.–

"आपल्या गांवचे सुशीलबाबू तूं ओळखतेस. त्याच्यासारखा सुशील, सात्त्विक आणि थोर मनाचा तरुण क्वचितच सांपडेल. तो तुझ्याशीं विवाह करायला तयार आहे. इतकेंच नव्हे, तर लग्न करीन तर तुझ्याशींच, नाहींतर आजन्म अविवाहित राहीन अशी त्यानें प्रतिज्ञा केली आहे. तुझें वय तें काय? सारें आयुष्य तुझ्यापुढें आहे. तें निष्कारण कां नष्ट करतेस? मला वाटतें, या प्रस्तावाला तूं संमति द्यावीस. हवातर तूं या बाबतींत तुझ्या वधुराणी महो-दयेचा सल्ला घे. मी तुझ्या पत्रोत्तराची वाट पहात आहें —"

राणी तें पत्र वाचीत असतां कनक मधून मधून तिच्या चेहऱ्याकडे नजर टाकीत होती. पत्राच्या शेवटीं शेवटीं राणीच्या चेहऱ्यावर नाराजीची छटा दिसली तेव्हां कनक घाबरली. कनकनें तीं दोन्हीं पुस्तकें तिच्यासमोर केलीं, तेव्हां राणीनें तीं उचलून खिडकीबाहेर फेंकून दिलीं.

राणी तिथून उठून निघून जाते आहे असें पाहून कनक घाबरून म्हणाली, "कुठं चाललां?"

चिडल्यासारखें करून राणी म्हणाली, "गंगाजलानं हात धुवायला जातेंय्. विटाळले आहेत ना हे हात?"

राणी निघून गेली. कनक हताश झाली.

राणीचें शेजघर याच खोलीच्या शेजारीं होतें. तिथें दोन पलंग होते. एक राणीसाठीं आणि दुसरा तिच्या सासूबाईसाठीं. सासूबाई झोपीं गेल्या होत्या. शेजघराच्या तिन्ही खिडक्या उघड्या होत्या. त्यांतून बाहेरचा वारा झुळझुळ येत होता. तसेंच चांदणेंही आंत येऊन खोली उजळत होती.

त्यावेळीं अकरा वाजले होते तरी राणीच्या डोळ्याला झोंप शिवत नव्हती. कनकच्या दादाचें पत्र वाचल्यामुळें तिचें मस्तक भडकून गेलें होतें. थोडा वेळ विचार करतांना तिला वाटलें, "जगांत मतमतांतरं हीं असणारच. ज्याच्या त्याच्या शिक्षणाप्रमाणें आणि आदर्शाप्रमाणें जो तो आपलीं मतं बनवीत असतो. हीं मतं आपल्या मताशीं जुळलीं नाहींत म्हणून काय त्याच्या माथ्यावर फटका मारायचा?"

ती पुन्हां विचार करूं लागली. गेले कांहीं दिवस कनकलतेवरचें तिचें मन उडत होतें. तसें त्याला कांहीं विशेष कारण नव्हतें. मृतपतीबद्दल कनकच्या मनांत फारशी निष्ठा असल्याचें दिसत नव्हतें. चौदाव्या वर्षी कनकचें लग्न झालें. तीन वर्षें जी नवऱ्याच्या सहवासांत होती तिला आपल्या मृतपतीबद्दल कांहींच कसें वाटूं नये? तिच्या एकंदर राहाणींतही बंगाली विधवेच्या कठोर व्रतनियमांचें पालन होत असल्याचें दिसत नव्हतें आणि आतां तिचा 'दादा' तिला हा असा उपदेश करतो आहे!

ती आपल्या स्थितीचा विचार करूं लागली. लग्न होऊन ती या घरीं आली, त्यावेळीं आठ वर्षांची होती. तिचा नवरा तेव्हां चौदा वर्षांचा होता. एक आठवडाभरच ती सासरीं होती, पण तेवढ्या वेळांत तिनें आपल्या नवऱ्याचा चेहरासुद्धां पाहिला नव्हता. त्यानंतर दोनच महिन्यांनीं तिचा नवरा परागंदा झाला. हळूहळू ती सज्ञान होऊं लागली. जगाचे व्यवहार कळूं लागले तसतशी तिला आपली परिस्थिति जाणवूं लागली. आज ना उद्यां आपला नवरा परत येऊन भेटेल अशी आशा ती बाळगून होती. वर्षांवर वर्षें लोटलीं तसतशी ती निराश होऊं लागली. ती पतीच्या अस्तित्वाबद्दल निराश झाली. तो स्वर्गस्थ झाला असावा अशी कल्पना करून ती ईश्वरस्वरूपांत त्याची पूजा आणि

आराधना करीत होती. आतां आपली दोघांची भेट स्वर्गात होईलच असेंच तिला वाटे.

यावेळीं तीच कल्पना हृदयांत जागून ती तन्मय झाली होती. कनकलतेची कथा आतां तिच्या जाणिवेंतून पुसून गेली होती. त्या काल्पनिक आनंदाच्या तंद्रींत ती झोंपी गेली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती जागी झाली तेव्हां तिला रोजच्यापेक्षां उशीर झाला होता. तिची सासू त्या दिवशीं एकादशी असल्यामुळें लवकर उठून गंगेवर स्नान करण्यास गेली होती. राणीनें दासीला विचारलें तेव्हां ती म्हणाली, " तुम्हीं झोंपलेल्या पाहून त्यांनीं तुम्हांला उठूं दिलं नाहीं. सैंपाकीणबाई आणि कनकदिदीला घेऊन त्या गंगेवर गेल्या."

कनकचें नांव कानीं पडतांच राणी अस्वस्थ झाली. रोज ती कनकबरोबरच स्नानाला जात असे. आज तिला वाटलें, कनक गेली तें बरें झालें.

इतक्यांत स्नानाचे कपडे हातीं घेऊन सुरबाला जात होती. तिला हांक मारून राणीनें म्हटलें, " गंगेवर जाते आहेस का ? चल तर, आपण बरोबर जाऊं." राणीबरोबर गंगास्नानाला जायचा सुरबालेला हा पहिलाच योग होता. दोघीही बागेंत आल्या. तिथें कनकलता होती. ती म्हणाली, " आज आपल्याला उठायला उशीर झाला वाटतं ? थोरल्या बाईसाहेब निघाल्या होत्या म्हणून मीहीं त्यांच्याबरोबर बाहेर पडलें."

" ठीक केलंस ! " असें म्हणून राणी हंसली. रात्रींच्या वेळचा राग आतां आपल्या मनांत राहिलेला नाहीं असें सूचित करण्यासाठींच ती हंसली होती.

त्या दोघीही पाण्यांत उतरल्या. बराच वेळ त्या पाण्यांत डुंबत होत्या. सुरबालेबरोबर राणी सारखी बोलत होती. मध्येंच तिनें विचारलें, " तुला पोहतां येतं का ग ? "

सुरबाला म्हणाली, " पोहतां येत नसतं तर तुमची भेट कशी झाली असती ? "

" तूं पोहतच आली होतीस का या घाटावर ? "

तिनें होकार दिला तेव्हां राणीला वाटलें, कीं आपण हा प्रश्न केला तें बरें केलें नाहीं. विषयांतर करण्याच्या उद्देशानें राणीनें विचारलें, " बरं, सुरबाला, तुला कधीं स्वप्नं पडतात का ग ? "

"हो, पडतात – मधूनमधून पडतात."

"हीं स्वप्नं कधीं खरीं होतात का ग?"

सुरबाला म्हणाली, "पहांटेचीं स्वप्नं खरीं होतात असं कुणीकुणी म्हणतात. मला तो अनुभव आलाय्. मी माहेरीं होतें तेव्हां मला स्वप्न पडलं. शिपायानं मला पत्र आणून दिलं – माझ्या पतिराजांचं पत्र! अन् खरोखरच त्या दिवशीं मला त्यांचं पत्र मिळालं – तुम्हांलाही पडतात का स्वप्नं?"

"अशींच मधूनमधून!" राणी म्हणाली, "आज पहांटे मला एक स्वप्न पडलं, पण आतां नको. दुपारीं सांगेन तें. माझी हकीकत आहे ना तुला माहीत?"

"माहीत आहे तर!" सुरबाला एक सुस्कारा सोडून म्हणाली, "देवानं तुम्हांला बुद्धि दिलीय्, ऐश्वर्य दिलंय्, पण एवढं दुःख कां दिलंय् हेंच कळत नाहीं मला. मला दुःख दिलं देवानं त्याला कारण तरी होतं, पण तुम्हांला –"

राणी तिला थांबवून म्हणाली, "नाहीं ग, देव जें जें करतो तें प्रत्येकाच्या बऱ्याकरतांच करतो. त्याचा कार्यकारणभाव आम्हांला कळत नाहीं. त्याचा उलगडा होतो तो अनुभवानं! आज मला जे जे क्लेश सहन करावे लागताहेत, त्यांचं फळ शेवटीं चांगलंच मिळणार असा माझा विश्वास आहे."

सुरबाला थक्क होऊन तिच्या तोंडाकडे पहात राहिली होती. शेवटीं ती म्हणाली, "अशी ही श्रद्धा जर माझ्याठायीं असती तर मला खरोखरच समाधान लाभलं असतं!"

राणीच्या मनांत सुरबालेविषयी करुणा उत्पन्न झाली होती. तिला विचारावें असें तिला वाटत होतें. या अभागिनीच्या हृदयावरचा भार हलका करावा, यासाठीं राणी तळमळत असली तरी तिला कांहीं विचारण्याचें धैर्य तिला झालें नाहीं.

## : ५ :

आज दुपारपासून कनकलतेचें डोकें दुखत होतें. प्रत्येक एकादशीच्या दिवशीं तिला ही व्यथा होत असे आणि त्यासाठीं ती राणीकडून सुटी घेऊन आपल्या खोलींत काळोख करून दोन तास झोंपत असे.

आज कनक तशीच खिडक्या बंद करून बिछान्यावर पडली होती. तिला झोंप येत नव्हती. एक वाजून गेला होता. वाड्यांतल्या सर्व लोकांचीं जेवणीं अजून उरकलीं नव्हतीं. बाहेर माणसांची वर्दळ सुरू होती.

थोड्या वेळानें सर्वत्र सामसूम झालें त्यावेळीं कनक काळोखांतच उठली. ट्रंक उघडल्याचा आवाज ऐकूं आला. कुठंतरी खडखड झाली. कुठंतरी मचमच असा आवाज ऐकूं येऊं लागला. कुणी कांहीं खात होतें का ? इतक्यांत कळशींतलं पाणी ओतल्याचाही आवाज ऐकूं आला. ती कनकच कांहीं खात होती का ?

बंगालची विधवा एकादशीचा उपास अगदीं कडकपणानें पाळते. कनकनें विधवेचें सोंग आणलें होतें. ती बतावणी पुरी करण्यासाठीं तिला असें चोरून खावें लागत होतें. चोरून आणलेले संदेश व रसगुल्ले खाऊन पाणी पिऊन ती झोंपी गेली.

चार वाजतां ती जागी झाली. तिनें खिडक्या उघडल्या. डोळे चोळीत चोळीत ती बाहेर आली. समोरून हाबूची आई जात होती तिला तिनें विचारलें, “ राणीसाहेब कुठं आहेत ? ”

ती म्हणाली, “ बागेंतल्या झाडाखालीं बिछाना टाकून त्या महाभारत ऐकताहेत. सुरूदिदी वाचून दाखवते आहे. ”

“ आणखी कुणी आहे का तिथं ? ”

“ दुसरं कुणीच नाहीं तिथं. मींच होतें पण मला राणीजींनीं जा म्हणून सांगितलं त्याला एक तास झाला. तुमचं डोकं थांबलं का ? ”

हातानें डोकें चोळीत कनक म्हणाली, “ तसं आतां बरंच बरं वाटतंय्, पण अजून दुखतंय् थोडंसं. ”

दासी आपल्या कामाला निघून गेली तेव्हां कनक पुन्हां आपल्या खोलींत आली आणि कागदलेखणी घेऊन ‘ दादा ’ ला पत्र लिहायला बसली. याचवेळीं तिकडे राणी सुरबालेशीं बोलत बसली होती. हाबूची आई निघून गेल्यावर सुरबालेनें राणीला विचारलें, “ स्वप्नाची गोष्ट तेवढीच राहिली. काय दिसलं स्वप्नांत ? ”

“ स्वप्न माझ्या पतिराजासंबंधाचं होतं. ” असें म्हणून ती तक्क्याला टेकून क्षणभर स्वस्थ बसली. नंतर म्हणाली, “ गेल्या रात्रीं माझं मन अस्वस्थ झालं

होतं. सासुबाई झोंपीं गेल्या तरी मला झोप येत नव्हती. दोन वाजेपर्यंत बिछान्यावर तळमळत पडलें होतें. त्यानंतर माझा डोळा लागला अन् त्यानंतरच मला स्वप्न पडलं. — अंगभर दागिने घालून मी पैठणी नेसून बसलें होतें जणुं. लग्नाच्या वेळीं भरतात तसा चंदनाचा मळवट कपाळावर भरला होता. बऱ्याच बायका जमल्या होत्या. त्या हंसत खिदळत होत्या. नुकताच दिवा लावला होता. इतक्यांत सर्वांचाच आरडाओरडा सुरू झाला, 'वर आला! वर आला!' जिकडे तिकडे शंख वाजूं लागले — " असें म्हणून ती क्षणभर स्तब्ध राहिली.

सुरबालेनें विचारलें, "बरं, मग पुढं?"

"त्यानंतर मी जागी झालें. खिडकींतून पाहिलं तर पूर्वेकडे शुक्राची चांदणी झगझगत होती."

सुरबाला खिन्नपणें हंसली. "मोठं गोड स्वप्न होतं नाहीं?" असें म्हणून तिनें राणीच्या चेहऱ्याकडे पाहिलें. राणीची दृष्टि आकाशाकडे लागली होती आणि तिचे डोळे पाण्यानें भरून आले होते.

तशीच वर पहात राणी म्हणाली, "स्वप्न गोड तर खरंच; पण सर्वांत मला गोड वाटला, तो त्या शंखांचा आवाज. रोज पूजेच्या वेळीं सकाळ संध्याकाळ शंखाचा आवाज माझ्या कानीं येतो, पण हा जो स्वप्नांतला शंखाचा आवाज ऐकला तो अगदीं अजब होता. जणुं कांहीं कानांत अमृत ओतीत होता."

सुरबाला नजर खालीं करून पहात होती. एक सुस्कारा सोडून ती म्हणाली, "कधीं खरं होईल का हें स्वप्न?"

"कां व्हायचं नाहीं?" राणी म्हणाली, "पण तें या जन्मीं नव्हे — या लोकीं नव्हे, स्वर्गलोकीं! तिथं माझे पति माझी वाट पहात आहेत. मी तिथं गेलें कीं स्वर्गांत शंख वाजतील!" असें म्हणून ती समाधि लागल्यासारखी तंद्रेंत मग्न होऊन बसली होती.

सुरबाला म्हणाली, "ईश्वर करो आणि तुमची भेट होवो. अन् हेंच सौभाग्य मला लाभो असा मला आशीर्वाद द्या! —" असें म्हणून तिनें राणीची पायधूळ घेतली.

पायाला हात लागल्यामुळें राणीची समाधि भंग पावली. ती अस्वस्थ होऊन म्हणाली, "हें काय? माझ्या पायाला कां हात लावलात?"

सुरबाला म्हणाली, “ एकदां माझी कुळकथा मी तुम्हांला सांगणार आहें. तुमच्या पायधुळीचीसुद्धां लायकी नाहीं माझी.”

राणी म्हणाली, “ शेवटीं महाभारत राहिलंच. तें वनपर्व काढ पाहूं. अन् दमयन्तीची कथा वाच.”

सुरबाला वाचूं लागली.

सूर्य मावळूं लागला होता त्यावेळीं पहिला अध्याय वाचून पुरा झाला. एकदम अन्तःपुरांत मोठी गडबड उडाल्याचें त्यांच्या कानीं आलें. थोड्याच वेळांत वाड्यांत चोंहीकडून शंख वाजूं लागले. दोघीही चकित होऊन एकदम उभ्या राहिल्या. राणी तशीच आंत जायला निघाली, सुरबालाही तिच्या मागोमाग निघाली, तोंच अंगणांतून हाबूची आई धांवतच आली. ती अगदीं हुरळून बोलत होती.

“ तरी मी सांगत होतें — बरं का ! हाबूच्या आईला सारं कांहीं कळतं. दरिद्री माणसाचे शब्द ऐकतो कोण ? दरिद्री माणसाचे बोल बासे झाले कीं गोड लागतात. मीं सांगितलं नव्हतं का ? बोलणारे खुशाल बोलोत ! आतां काय बक्षिस देतां मला, बोला. तेव्हां कुणी ऐकलं नाहीं माझं — नाहीं बरं ऐकलं ! कुणब्यामाळ्याची कोण कदर करतो — ”

इतक्यांत एक गांवची बाई हातीं कुंकवाचा करंडा घेऊन धांवतच आली. धांपा टाकत ती म्हणाली, “ बडे बाबू हयात आहेत. पत्र आलंय — ” असं म्हणत म्हणत तिनें कापऱ्या हातानें वधुराणीच्या भांगांत सिंदूर भरला.

वादळांत सांपडलेल्या वेलीप्रमाणें राणी थरथर कांपत होती. सुरबालेनें तिला सावरलें नसतें, तर ती खालीं पडलीच असती. मूर्च्छित झालेल्या वधूराणीला दोघींनींही सांवरून आंत नेलें. हाबूच्या आईचें तिकडे लक्षच नव्हतें. ती कांच्या कसून सारखे हात नाचवीत बोलत होती, “ सांगितलं नव्हतं का मीं ? हजार वेळ सांगितलं कीं हिचं कुंकु वाढवूं नका. पण त्यावेळीं कुणी ऐकलं का माझं ? दरिद्री माणसाचे बोल कोण मनावर घेतो ? — कुणी नाहीं ग बाई कुणी नाहीं — ”

# रत्नदीप

## ( तृतीय खंड )

: १ :

तो राखालचा खुश्रुपुरच्या नोकरीचा शेवटचा दिवस होता. ज्या ज्या कुणाचें देणें होतें तें तें देऊन टाकून लहानमोठ्या सर्वत्रांचे निरोप घेऊन राखाल पश्चिमेकडच्या गाडींत बसला. त्याला निरोप देतांना स्टेशनमास्तर गद्दिवरून म्हणाले, " गांवीं जायच्या वेळीं याच वाटेनं जा बरं. एक दिवस इथं उतरून आमचा पाहुणचार घेऊन जा. "

" जगलों वांचलों तर येईनही. " असें राखाल म्हणतो आहे तोंच गाडी सुटली.

खिडकीपाशीं बसून राखाल विचार करीत होता, ' जगलों वाचलों तर! राखाल भट्टाचार्यांच्या आयुष्याचे आतां कितीसे क्षण राहिले आहेत? आतां या राखालची ओळख पटायची आहे मोगलसराई स्टेशनपर्यंत ! मोगलसराई पार पडली कीं माझा पुनर्जन्म — मग मी राखाल भट्टाचार्य नव्हे — मी भवेन्द्रनाथ चट्टोपाध्याय — नदिया जिल्ह्यांतल्या बाशुलीपाडा गांवचा वर्षाला लाख रुपये उत्पन्न असलेला बडा जमीदार — '

ती पॅसेंजर गाडी असल्यामुळें प्रत्येक स्टेशनला थांबत होती. प्रत्येक स्टेशनवर राखालच्या ओळखीचे लोक भेटत होते. त्याची नोकरी गेल्याबद्दल

दुःख प्रदर्शित करत होते. रेल्वेची नोकरी म्हणजे अळवावरचें पाणी, असेंही कुणी कुणी म्हणत होते.

पहिल्यानें त्यानें काशीला जायचें असें ठरवलें होतें. पण शेवटीं विचार करून त्यानें अलाहाबादला जायचें ठरवलें. मोगलसराई स्टेशनवर काशीचा पास टाकून त्यानें अलाहाबादचें तिकीट काढलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो अलाहाबादला येऊन पोंचला. स्टेशनवर पांडे लोकांची गर्दी झाली होती. प्रत्येकजण त्याला आपल्याकडे ओढीत होता. शेवटीं एका पांड्यानें त्याला गांठलेंच. तो स्वतःला म्हणवीत होता एकवचनी ठाकूर. त्याच्याबरोबर राखाल निघाला.

त्या पांड्याच्या घरीं सामानसुमान टाकून तो वेणीघांटावर गेला. पांडे बरोबर होताच. तिथें त्याने सक्षौर प्रायश्चित्त घेतलें. आतां अशा रीतीनें मुंडन झाल्यावर आपल्याला कुणी ओळखणार नाहीं असें वाटून त्यानें भगवीं वस्त्रें धारण करण्याचें ठरवलें.

दुपारीं जेवण उरकून त्यानें थोडा वेळ वामकुक्षी केली. तिसऱ्या प्रहरीं उठून तो बाजारांत गेला. कांहीं कपडे खरेदी करून त्यानें शिंप्याकडे शिवायला दिले. अंगरखा तयार झाल्यावर तो आणि पटका गेरूंत भिजवून त्यानें भगवा केला.

अलाहाबादेंत दोन दिवस थांबून भगवीं वस्त्रें चढवून राखाल काशीला जायला निघाला. जुने कपडे आणि बिछाना प्रयागावरच्या गरीबगुरीबांना देऊन टाकून त्यानें संसारी जीवनाला रामराम ठोकला. तो काशींत उतरला त्यावेळीं अंगावर भगवे कपडे असल्यामुळें त्याला पांड्यांचा त्रास झाला नाहीं. सर्वजण त्याला प्रणाम करीत होते. भाड्याची गाडी करून तो दशाश्वमेघ घाटावर आला. तिथें एक भाड्याची जागा घेऊन त्यानें मुक्काम ठोकला.

'मी सोळा वर्षें संन्यासी होतों' असें म्हटल्यानें कांहीं संन्यास पचत नाहीं. गोसावी बैराग्यांच्या जीवनाची पुरेपूर माहिती मिळविली पाहिजे होती. तशा माहितीच्या अभावीं क्वचित् फजितीचा प्रसंग आला असता. म्हणूनच हा सर्व अनुभव घेण्यासाठीं त्यानें काशीवास पत्करला होता. घरकाम पहाण्यासाठीं त्यानें एक ब्राह्मण नोकर मिळवला आणि अशा रीतीनें संन्याशाचा संसार थाटला.

आतां त्याचा एकच नियम होता, पहांटे उठायचें, सकाळपासून अकरा वाजेपर्यंत आणि तिसऱ्या प्रहरापासून प्रहर रात्रीपर्यंत दशाश्वमेघ घांटावर

संन्याशांच्या अड्ड्यांत बसून राह्यचें, मधून मधून या संन्याशांना घरीं बोलावून जेवायला घालायचें.

या संन्याशांतही प्रकार आहेत — गिरी, पुरी आणि भारती. तो शक्य तेवढें करून गिरी संन्याशांत बैठक ठेवीत असे. नांव विचारलें तर सांगे — भवेन्द्रनाथ चट्टोपाध्याय. आपला पूर्वेतिहास सांगण्याचें तो कटाक्षानें टाळीत असे. गिरी संन्याशांत मिसळायचें, त्यांच्या सांप्रदायाचें विशेष विवरण मिळवायचें, त्यांच्या पाठांतील पुस्तकें घेऊन त्यांचा अभ्यास करायचा, असा त्याचा नित्य नियम होता. रात्रीं भोजन उरकल्यावर भवेन्द्रानें लिहिलेलें आपलें आत्मचरित्र तो लक्षपूर्वक वाचीत असे. पुन्हां पुन्हां वाचवाचून तें सर्व चरित्र त्याला मुखोद्गत झालें होतें.

अशा रीतीनें एक महिना गेला. त्याच्या मुंडन केलेल्या मस्तकावर केंस वाढले. दाढीमिशाही वाढल्या. राखालला वाटलें, आतां पुढल्या कामाला लागलें पाहिजे. बाशुलीपाड्याला जायचें, तिथले रस्ते घाट ओळखून घ्यायचे, विशेष लोकांचीं नांवें आणि घरें ओळखून ठेवायचीं, आजूबाजूच्या गांवांतल्या स्थळांची आणि माणसांची शक्य तेवढी माहिती काढायची — असें कांहीं केलें नसतें तर एकादे वेळीं त्याचें सोंग उघडकीस येण्याचा संभव होता.

आतां गेल्याखेरीज गत्यंतर नाहीं असें ठरवून तो जायला निघाला. पण पहिला प्रश्न हा होता, कीं कोणत्या वेषांत जायचें ? संन्याशाच्या वेषांत जातां आलें नसतें. कारण भवेन्द्र म्हणून जायचें त्यावेळीं संन्याशाच्या वेषांत जाणें अवश्य होतें. बरें, गृहस्थवेषांतही जाणें शक्य नव्हतें, कारण तें शहर नव्हतें, खेडेगांव होतें, प्रत्येकजण प्रत्येकाला ओळखीत होता. गांवांत एक माणूस अचानक आला तर सारा गांव चौकशी करीत सुटला असता.

वाटेनें एक मुसलमान फकीर भिक्षा मागत जात होता त्याला पाहतांच राखालला वाटलें, गांवीं जायला हाच वेष उत्तम. त्यानें एका फकिराकडून त्याचा वेष विकत घेतला. फकिराचा वेष करून तो बाहेर पडला, त्यावेळीं त्यानें नोकरीला ठेवलेला ब्राह्मण आणि गडी थक्क होऊन पाहूं लागले. ते म्हणाले, “ हा संन्यासी नव्हे कीं फकीरही नव्हे. कलकत्त्याचा खुफिया पोलिस ( Detective ) आहे. कुठल्या तरी खुनी किंवा सरकारविरोधी माणसाच्या तपासासाठीं आला आहे. ”

काशीचें बिऱ्हाड मोडून तो बाशुलीपाड्याला जायला निघाला. काशींत असतांना फकिराचे सर्व सवाल त्यानें शिकून घेतले होते. बाशुलीपाड्यांत आल्यावर दारोदार भीक मागत फिरतांना तो जरूर ती सर्व माहिती मिळवीत होता. भवेन्द्राच्या चरित्रांत ज्या ज्या व्यक्तींचा उल्लेख होता ते ते, म्हणजे दिवाणजी, जुने नोकर, कारकून या सर्वांची ओळख पटवून घेत होता. एक आठवडाभर अशा रीतीनें माहिती मिळवून झाल्यावर तो पुन्हां काशीला आला. फकिराचा वेष त्यानें फकिराला देऊन टाकला आणि तो पुढल्या तयारीला लागला.

आतां कशा रीतीनें गांवीं जावें याचा तो विचार करीत होता. एकदम जावें कीं आधीं पत्र लिहावें ? पत्र लिहिलें असतें तर त्यांनीं कदाचित् संशय घेतला असता. त्याला वाटलें, पत्र न लिहितां एकदम जावें हेंच बरें. त्याच्या मनाचा निश्चय होत नव्हता.

अशा प्रकारें पांच सात दिवस नुसते विचार करण्यांत गेले. शेवटीं पूर्ण विचाराअन्तीं त्यानें ठरवलें, कीं आधीं पत्र लिहून जाणें हेंच बरें. पत्र लिहावें आणि एक दोन दिवसांत लगेच आपण जाऊन हजर व्हावें. नाहींतर वेळ लावल्यास तिकडला कुणीही माणूस तपास करण्याकरतां काशीला आला असता.

एक पत्र लिहावें, तें वाचून पहावें, समाधान झालें नाहीं म्हणजे तें फाडून टाकावें, अशीं बरींच पत्रें त्यानें लिहिलीं. दोन दिवस सारखे परिश्रम करून त्यानें शेवटीं पत्र तयार केलें तें असें :—

परमपूजनीय श्री. पिता ठाकूर महाशय,

श्रीचरणकमलेषु,

प्रणाम शतकोटि निवेदनं येतत्

बाबा,

आज एवढ्या वर्षांनीं आपला अधम पुत्र साऱ्या आयुष्यांत केलेल्या अपराधाचें आणि दुष्कृत्याचें प्रायश्चित्त घेण्यासाठीं अनुतप्त होऊन आपल्या पायापाशीं येत आहे. मीं गृहत्याग केला त्याला सोळा वर्षे झालीं. या सोळा वर्षांत मीं आपल्याला कोणतीच खबर कळवली नाहीं. मी हयात नसेन असाच आतां आपला समज झाला असेल. माझ्यासारखा अधम प्राणि

या उभ्या भारतांत मिळणार नाहीं. मी पहिल्यानें घराबाहेर पडलों. त्यानंतर अलाहाबादेंत असतांना बंगवासींत आपण दिलेली जाहिरात वाचली. तिथला कुणीतरी बंगाली मला पाहून ओळखील म्हणून मी त्याच दिवशीं तिथून पलायन केलें. जिथें कुणी बंगाली भेटणार नाहीं, अशा जागीं जावें असें ठरवून मी कनखलला गेलों. तिथें तीनतारियामठाचे महंत बेलपत गिरी महाराज यांची माझ्यावर कृपादृष्टि झाली. त्यांनीं मला यथाविधि दीक्षा दिली. ते स्वर्गवासी झाल्यावर त्यांच्या गादीचा मी अधिकारी झालों तेव्हां पासून मी इथें महंत म्हणून रहात आहें.

"पण आतां या जीवनाचा मला तिटकारा येऊं लागला आहे. गेलीं दोन वर्षें घरीं जावें जावें असें म्हणत होतों, पण जाणें घडलें नाहीं. दोन महिन्यां-पूर्वीं एके दिवशीं रात्रीं आपण मला स्वप्नांत दिसलांत. मी घर सोडून निघण्याच्या पूर्वीं आपले डोळे आले होते त्यावेळीं आपण जो काळा चष्मा वापरीत होतां तसा चष्मा लावून हळदीचा पिवळा रुमाल हातीं घेऊन आपण माझ्यासमोर येऊन उभे राहिलांत अन् आपण काकुळतीला येऊन मला म्हटलें, 'पटला, आतां चल घरीं!'—जागा झालों तेव्हां आपली मूर्ति आठवून मला रडूं कोसळलें. दुसऱ्याच दिवशीं मठ सोडून निघालों. नाना तीर्थें भ्रमण करीत काशीला आलों. पुरी आणि सेतुबंध रामेश्वराचें दर्शन घेऊन मग परत यावें अशी इच्छा होती, पण घरची ओढ अनावर झाली. केलेला बेत रहित करून येत्या द्वादशीला निघून त्रयोदशीला बाशुलीपाडा गांवीं येऊन पोंचेन.

"माता ठाकुराणीला माझे शतकोटि प्रणाम सांगावे. देवेन्द्रभाईला माझे आशीर्वाद सांगावे. इतरांना यथायोग्य प्रणाम आणि आशीर्वाद सांगावे.

आपला अधमसंतान

भवेन्द्रनाथ चटोपाध्याय.

लिहिलेला मसुदा पुन्हां पुन्हां वाचून पाहून त्यांतल्या किरकोळ चुका दुरुस्त केल्यावर त्यानें चांगल्या कागदावर त्याची नकल केली आणि खालीं एक ताजा कलम जोडला—

ता. क.—काशीला आल्यावर आमचे पांडे काशिनाथ मिश्र ठाकूर यांची भेट घ्यायचा प्रयत्न केला. तपासाअंतीं ते दोन वर्षांपूर्वीं कैलासवासी झाल्याचें कळलें.

सेवक,

श्री. भवेन्द्र.

पत्र बंद करून राखालनें तें स्वतः नेऊन टपालांत टाकलें.

जें पत्र आल्यामुळें बाशुलीपाड्याच्या वाड्यांत खळबळ उडाली होती तें पत्र हेंच.

: २ :

तिसऱ्या प्रहरची वेळ होती. कचेरीच्या खोलींत टेबलावर कागदाची रास आणि वह्या पडल्या होत्या. दिवाण रघुनाथ मुजुमदार हिशेबाच्या वह्या तपाशीत होते. गांवची कांहीं मंडळी आजूबाजूला बसून गप्पागोष्टी करीत होती. इतक्यांत पोस्टमन आला आणि दिवाणजींच्या समोर येऊन म्हणाला, "मालकांच्या नांवचं एक रजिस्टर पत्र आलंय —"

"मालकांच्या नांवचं?" दिवाणजी म्हणाले, "म्हणजे स्वर्गवासी मालकांच्या नांवचं?"

पोस्टमननें होकार दिला आणि एक सीलमोहोर केलेला लखोटा दिवाणजींच्या टेबलावर ठेवून दिला. तो लखोटा उलटूनपालटून पहात दिवाणजी म्हणाला, "कुणी लिहिलं हें पत्र? मालक स्वर्गवासी झाले त्याला दोन वर्षं झालीं. इतक्या दिवसांनीं त्यांच्या नांवें पत्र लिहिणारा हा कोण?"

कुणीतरी म्हटलें, "छाप पहा ना. कुठून आलंय तें?"

दिवाणजींनीं तिकिटावरचा छाप निरखून पाहिला आणि म्हटलं, "हूं, बनारस सिटी! कळलं, काशीला आमचे पांडे आहेत, त्यांचं हें पत्र आहे वाटतं! पूर्वी असंच त्यांचं मधूनमधून पत्र येत असे. कांहींतरी मागणी असेल त्यांची. बरं बरं, मी सही करून घेतों हें पत्र!" असें म्हणून पिवळ्या रिसीटवर दिवाणजींनीं सही करून दिल्यावर पोस्टमन गेला.

बाकीचीं पत्रें उघडून पाहिल्यावर दिवाणजींनीं तीं शेरे मारून बाजूला ठेवलीं. शेवटीं तें रजिस्टर पत्र त्यांनीं उघडून पाहिलें.

पहिल्या एकदोन ओळी वाचल्यानंतर दिवाणजींनीं पानें उलटून शेवटीं लेखकाचें नांव पाहिलें. तें पाहतांच 'हे काय?' म्हणून ते ओरडले. त्यांचा चेहरा पांढराफटक झाला. त्यांचे हातपाय कांपूं लागले.

शेजारीं बसलेल्या गांवकऱ्यांनीं विचारलें, " काय झालंय ? कांहीं बरीवाईट खबर तर नाहीं ना ? "

दिवाणजी इतक्यांत बरेचसे सावरले होते. गांवकऱ्यांच्या प्रश्नाला उत्तर न देतां ते मनांतल्या मनांत पत्र वाचीत होते. ते पत्र वाचीत असतांना त्यांच्या मुद्रेवरून वेगवेगळ्या विकारांच्या छटा उमटून जात होत्या. पत्र एकदां वाचून झाल्यावर त्यांनीं तें पुन्हां एकदां पहिल्यापासून शेवटपर्यंत वाचायला सुरवात केली. यावेळीं तें पत्र वाचायला त्यांना तितकासा वेळ लागला नाहीं.

पत्र वाचून झाल्यावर त्यांनीं तें टेबलाच्या खणांत ठेवून त्याला किल्ली लावली. एक मोठा सुस्कारा सोडून ते बाहेरच्या फाटकाकडे विचित्रपणानें पहात बसले होते.

शेजारीं बसलेल्या गांवकऱ्यांनीं विचारलें " पांड्याचंच पत्र का तें ? "

" नाहीं. " असें म्हणून दिवाणजी उठून उभे राहिले तेव्हां गांवकऱ्यांनीं विचारलें, " कुठं निघालां ? "

दिवाणजी पुटपुटले, " काम आहे जरुरीचं. आज एकादशी ना ? "

हुक्क्याचे दोनतीन दम मारून गांवकरी म्हणाला, " बरोबर ! आम्हीं ही आतां जातों तर. "

गांवकरी निघून गेले आणि दिवाणजी अंतःपुराच्या बाजूकडे जाण्यासाठीं उठले.

कांहीं वेळ ते तसेच उभे राहिले होते. पुन्हां ते खालीं बसले. माथ्यावर हात ठेवून ते बराच वेळ विचार करीत होते, " आतां काय करायचं ? ही बातमी आंत सांगावी कीं सांगू नये ? हा माणूस खरोखरच भवेन्द्र आहे कीं कुणी तोतया आहे, तें कसं ठरवायचं ? आतां ही बातमी सांगितली तर सारीं आनंदानं बेहोष होतील. अन् उद्यां तो माणूस इथं आला अन् तोतया आहे म्हणून ठरलं तर केवढा बिकट प्रसंग येईल ? त्यापेक्षां सध्यां कांहीं बोलूं नये हेंच बरं. येऊं दे तो. एकदां पाहून घेऊं. सोळा वर्षं झालीं आहेत, तोच हा हें नुसतं चेहरा पाहून ठरवणं कठीण जाईल. इकडले तिकडले चार प्रश्न विचारल्यावर त्याचं स्वरूप निश्चित उघडकीला येईल. मग काय करायचं तर ! — पण खरोखरच तो भवेन्द्र असला तर ! मग आनंदाला पार नाहीं म्हणायचा ! पण हें शक्य आहे का ? "

दिवाणजींनीं टेबलाचा खण उघडून तें पत्र बाहेर काढलें. पुन्हां नीट मन लावून तें वाचून पाहिलें. तें वाचून झाल्यावर ते विचार करूं लागले, " खरोखरच हें बनावट असेल का ? इतक्या वर्षांनंतर इतक्या बारीकसारीक गोष्टी भलत्या माणसाला कशा कळतील ? खरोखरच हा भवेन्द्र असेल !—"

घड्याळांत त्यावेळीं ५॥। वाजले होते. दिवाणजींनीं तें पत्र पुन्हां खणांत ठेवून दिलें. ते उठून उभे राहिले. खोलींतल्या खोलींत येरझारा घालूं लागले. त्यांच्या मनाची निश्चिती होत नव्हती.

अशा रीतीनें सहा वाजेपर्यंत वेळ गेला. दिवाणजींच्या मनांतलें विचारचक्र सारखें फिरत होतें, " परवां तो आला आणि खरोखरच तो भन्वेद्र आहे असं ठरलं, तर काय वाटेल सर्वांना ? मी कांहींतरी डाव करण्यासाठीं ही बातमी दोन दिवस दाबून टाकली असा आरोप नाहीं का यायचा माझ्यावर ? आज मी या जहागीरदारीचा एकुलता एक कारभारी आहे, उद्यां तो आला तर माझे सारे अधिकार जातील म्हणून मीं ही बातमी दाबली असं म्हणतील कुणीतरी. खात्री झाल्याशिवाय ही बातमी उक्त करूं नये असें जें आतां मला वाटतंय, त्यावर कोण विश्वास ठेवील ? मोठा पेंच आला आहे हा ! काय करावं ? आज आहे एकादशी, दोघीही उपाशीं आहेत, दुबळ्या झाल्या आहेत, हर्षवायु नाहीं ना व्हायचा ? सध्यां राहूं दे. उद्यां उपासाचं पारणं फिटल्यावर सांगून टाकावं ! "

सूर्यास्ताला आतां फारसा विलंब नव्हता. दिवाणजी अजूनही अस्वस्थपणें येरझारा घालीत विचार करीत होते, " छे छे ! हें बरं नव्हे. एवढी महत्त्वाची बातमी एक रात्रभर दडपून ठेवायचा अधिकार मला नाहीं. थोरल्या राणीसाहेबांना सागितलंच पाहिजे—त्याचवेळीं त्यांना सावधही केलं पाहिजे. एवढ्या मोठ्या इस्टेटीच्या लोभानें कुणी लबाड माणूस तोतया म्हणून यायचा. आज तरी तो तोतया आहे असं धरून चाला, असंच त्यांना सांगावं हें बरं. "

दिवाणजींनीं जाऊन थोरल्या राणीसाहेबांना पत्र वाचून दाखवलें तेव्हां त्या आनंदानें बेहोष झाल्या. दिवाणजी त्यांना संशयमूलक चार–दोन गोष्टी सांगण्याचा प्रयत्न करीत होते, पण त्या त्याच्या कानीं गेल्या नाहींत. आनंदाच्या पराकाष्ठेच्या त्या वादळांत संशयाच्या चार–दोन काड्या टिकून रहाणें शक्यच नव्हतें.

सारें अन्तःपुर हर्षाच्या लहरीनें भरून गेलें. कुणीतरी देवघरांत जाऊन शंख वाजवायला सुरवात केली. वधुराणीच्या कानीं शंखाचा जो आवाज गेला होता तो हाच.

त्या दिवशीं रात्रीं दिवाणजींना नीटशीं झोंप लागली नाहीं. या घटनेचा परिणाम काय होईल याचा विचार करतांना ते भांबावून गेले होते. ती बातमी गांवभर पसरल्यामुळें गांवचे लोक भल्या पहांटे त्यांच्या घरीं येऊन विचारूं लागले — बातमी खरी कीं खोटी ?

दिवाणजींनीं गंभीर होऊन उत्तर दिलें, "खरी कीं खोटी याचा निवाडा आपोआप दोन दिवसांत होईल."

शेवटीं येणाऱ्या लोकांच्या प्रश्नापुढें ते इतके सतावून गेले, कीं कुणीही आला तरी आतां आपली भेट होणार नाहीं, असें सांगायचा त्यांनीं हुकूम सोडला.

आठ वाजायच्या सुमाराला दिवाणजी कचेरींत आले. त्यांनी चौकशी केली, त्यावेळीं त्यांना कळून आलें, कीं थोरल्या राणीसाहेब पूजा-आन्हिक आटोपून पारणें फेडायला बसल्या आहेत. थोडा वेळ वाट पाहून ते अन्तःपुरांत आले. थोरल्या राणीसाहेब आंत आल्या त्यावेळीं दिवाणजी चकित झाले. कालची आनंदाची छटा त्यांच्या चेहऱ्यावर दिसत नव्हती; उलट त्यांचा चेहरा थोडा उदासवाणा दिसत होता.

थोरल्या राणीसाहेब बोलायला सुरवात करतील असें वाटून दिवाणजींनीं थोडा वेळ वाट पाहून विचारलें, "वधुराणीची प्रकृति कशी काय आहे ? रात्रीं फीट बीट आली नाहीं ना ?"

"नाहीं." त्या म्हणाल्या.

पुन्हां कांहीं वेळ दोघेंही कांहीं बोललीं नाहींत. कांहीं झालें तरी आपल्या मनांत आलेली शंका एकदां बोलून दाखवावी असें दिवाणजींनीं ठरवलें. ते म्हणाले, "कालच मी बोलणार होतों — एक महत्त्वाची गोष्ट आहे. आपल्याला वाईट वाटणार नाहीं असं कळलं तरच बोलेन. आपण माझ्यावर राग करूं नये. केवळ कर्तव्य म्हणून मी बोलणार आहें."

राणीसाहेब म्हणाल्या, "तुम्हीं काय सांगणार त्याची कल्पना मला आली आहे. माझ्याही मनांत तीच शंका आली होती. काल सारी रात्र मला झोंप

दिवाणजी म्हणाले, "नाहीं राणीसाहेब, कसलीच काळजी नाहीं. तो आपलाच भवेन्द्र खास. काशीकडच्या गाडीची वाट पहात मी स्टेशनवर उभा होतों. त्याला कसं ओळखायचं याच पंचाईतींत होतों. गाडी आली. हजारों लोक खालीं उतरले. देवाचं नांव घेत मी प्रत्येकाच्या तोंडाकडे पहात होतों. इतक्यांत भगवी कफनी घातलेला एक तरुण माझ्यासमोर जातां जातां थांबला. त्यानं मला विचारलं, 'आपण कुठले रहाणारे?' मीं म्हटलं, 'बाशुली-पाड्याचे.' तो टकमक माझ्याकडे पहात राहिला होता. नंतर एकदम म्हणाला, "दिवाणकाका!' मी म्हटलं, 'तूं भवेन्द्र का!'—मीं एकदम त्याला मिठी मारली. तोही रडला, मीही रडलों —"

राणीसाहेबांनाही रडण्याचा उमाळा आला. थोड्या वेळानें आवंढा गिळून त्या म्हणाल्या, "अजूनही भगवी कफनी टाकली नाहीं का त्यानं?"

"कुठून टाकणार? आतां इथं आल्यावर होऊन जाईल सारं." वाद्यांचे आवाज जवळ जवळ ऐकूं येऊं लागले होते आणि त्याबरोबरच लोकांचा आरडा ओरडाही जवळ जवळ येत होता. सारा घोळका कचेरीच्या समोर येऊन थांबला. दिवाणजींनीं बाहेर येऊन मोठ्यानें ओरडून सांगितलें, "बाजूला व्हा, बाजूला व्हा. पालखी सरळ आंत घेऊन या."

पालखी अन्तःपुराच्या दारापर्यंत आली तेव्हां राखाल खालीं उतरला.

राणीसाहेब वेड्यासारख्या धांवतच सुटल्या, 'आलास बाबा' असें म्हणत त्यांनीं त्याला घट्ट कवटाळून धरलें.

अन्तःपुरांतून येणाऱ्या शंखाच्या आवाजानें दशदिशा दणाणून गेल्या.

## : ३ :

राणीसाहेब राखालला तसाच कवटाळून अन्तःपुरांत घेऊन गेल्या. कचेरी समोरच्या आंगणांत लोकांची एकच गर्दी झाली होती. प्रत्येकजण प्रत्येकाला कांहीं ना कांहीं विचारीत होता, तर कांहीं जण माहित-गाराचा आव आणून त्यांना उत्तरें देत होते.

गांवच्या प्रतिष्ठित लोकांना आणून दिवाणजींनीं बैठकखान्यांत बसवलें. जुन्या गोष्टी निघाल्या. बापाच्या आणि बंधूच्या मृत्यूची बातमी ऐकून बाबूंना कसा

धक्का बसला आणि आपण त्यांची समजूत कशी घातली वगैरे गोष्टी सांगून झाल्यावर दिवाणजींनीं पुरोहितांना विचारलें, "भटचाज्जी महाशय, आतां इतक्या दिवसांनीं बापाच्या मृत्यूची बातमी कळल्यावर स्नानानं शुद्धि होते ना? मी तसंच समजलों आणि बाबूंना कलकत्त्यालाच गंगास्नान घालून आणलं."

भटजींनीं विचारलें, "दोन वर्षं झालीं ना?"

"नाहीं. अजून कांहीं दिवस बाकी आहेत."

भटजी म्हणाले, "तर मग सद्यःशौच नव्हे. दुसरा कुणी सपिंड असता तर चाललं असतं. आतां एक रात्र अशौच पाळलं पाहिजे. उद्यां सकाळीं गंगास्नान करून शुद्ध व्हावं."

दिवाणजी म्हणाले, "असं का? तर मग आमची चूक झाली. बाबूंना सांगितलं पाहिजे."

राणीसाहेबांच्या हुकुमानें पालखीच्या भोयांना एक एक मोहोर आणि एक कापडाचा ताका देण्यांत आला. तें पाहतांच सर्वांची खात्री झाली कीं राणीसाहेबांना आपल्या मुलाची ओळख पटली.

थोड्या वेळानें राणीसाहेबांनीं बोलावल्यामुळें दिवाणजी आंत जायला निघाले. त्यांनीं विचारलें, "बाबू काय करताहेत?"

"हातपाय धुवून वर गेले आहेत!"

"बाबू इथं बाहेर येणार आहेत का?"

'आपल्याला माहित नाहीं!' असें त्या नोकरानें सांगितलें तेव्हां दिवाणजी जमलेल्या लोकांना म्हणाले, "आज ते थकून आले आहेत. मला वाटतं, आज ते बाहेर यायचे नाहींत. उद्यांच आपल्या सर्वांची भेट होईल."

तें ऐकून आंत आलेली मंडळी बाहेर पडली आणि ते लोक बाहेर पडलेले पाहून आंगणांत जमलेल्या मंडळीचीही पांगापांग झाली. कांहीं कांहीं मंडळी अजूनही वाट पहात राहिली होती. तितक्यांत आंत गेलेला एकजण बाहेर आला. तो त्या थांबलेल्या लोकांना उद्देशून म्हणाला, "अरे ऐकलंत का, मोठी गंमत आहे. भवेन्द्रबाबू पालखींतून उतरल्याबरोबर राणीसाहेब त्यांना कवटाळून आंत घेऊन गेल्या तें तर तुम्हीं पाहिलंच आहे. मागील दारच्या पायरीवर पाय धुवायला पाणी ठेवलं होतं. बाबू पाय धुण्यासाठीं पाटावर बसले

तेव्हां आचारी रामू खांद्यावर टुवाल टाकून समोर आला. त्याला पाहतांच बाबू म्हणाले, 'रामू ना तूं?' तें ऐकतांच राम हुंदके देऊन रडूं लागला. म्हातारा नोकर! बाबूंनीं चटकन् ओळखला त्याला. राणीसाहेब म्हणाल्या, 'पाहिलंस रामा, तूं म्हणाला होतास, बाबू मला कसे ओळखतील? आतां पाहिलंस? तुझ्या कडेखांद्यावर वाढलेला तो, तो कसा ओळखल्यावांचून राहील?' तें ऐकून बाबू म्हणाले, 'खूण करून ठेवली आहे ना? मग कशी ओळख पटायची नाहीं?' 'कसली खूण' म्हणून राणीसाहेबांनीं विचारलें, तेव्हां बाबू म्हणाले, 'रामालाच विचार ना आई.' रामा आपल्या कपाळाच्या डाव्या बाजूला हात लावूं लागला. बाबू म्हणाले, 'माझी मुंज झाली ना, त्याच वर्षींची गोष्ट. मी आणि घोषांचा नवीन कांद्याची भजीं विकत घेऊन शाळेजवळच्या तळ्याच्या कांठीं खात बसलों होतों. रामा तितक्यांत तिथं कशासाटीं तरी आला होता, तो म्हणाला, 'दादाबाबू, तुम्ही बाटलांत. किरिस्तांव झालांत, आतां मालकांना जाऊन सांगतो.' मला राग आला. शेजारी विटेचा तुकडा होता, तो मी फेंकून मारला, तो त्याच्या कपाळावर बसला अन् रक्त येऊं लागलं. रामानं तिथंच बसकण मारली तेव्हां आम्ही दोघांनीं उचलून त्याला तळ्यापाशीं नेलं आणि सदरा फाडून त्याच्या जखमेवर पाण्याची पट्टी बांधली, तेव्हां कुठं तो सावध झाला.' राणीसाहेब म्हणाल्या, 'हो, हो. आतां आठवलं. एक दिवशीं रामा डोक्याला पट्टी बांधून आला होता खरा. मी विचारलं तेव्हां म्हणाला होता, कीं, जांभळं काढायला झाडावर चढलों तो खालीं पडलों म्हणून!' तेव्हां रामू म्हणाला, 'होय आईसाहेब. दादाबाबूंना तुम्ही राग भराल म्हणून मी खोटंच बोललों होतों खरा!"

जमलेले लोक थक्क होऊन ती कहाणी ऐकत होते. आतां संशयाला मुळींच जागा उरली नव्हती. प्रत्येकजण लहानपणच्या भवेन्द्राच्या गोष्टी आठवून त्याचा उल्लेख करीत होता.

तरीही त्यांत कांहीं संशय घेणारे होतेच. त्यांत हरिदास गोस्वामी हा प्रमुख होता. घरीं गेल्यावर तो जेवायला बसला, त्यावेळीं त्याची बायको त्याला वारा घालीत म्हणाली, "वाड्यांतून तुम्हांला निमंत्रण आलंय. उद्यां सत्यनारायण आहे. घरांतल्या सर्व लोकांना बोलावलं आहे. चुलीला आमंत्रण आहे."

गोस्वामी चिडून म्हणाला, "सत्यनारायण गेला चुलींत. मी जाणार नाहीं. कुठला कोण एक बदमाष भवेन्द्र बनून येतो — जातपातीचा ठिकाणा नाहीं. त्याच्या घरचं अन्न खाऊन काय जात बुडवूं?"

"बदमाष कसा हो? सारे म्हणतात कीं अगदीं अस्सल आहे तो म्हणून?"

"होय ना?" गोस्वामी म्हणाला, "मग तूं जा तर त्यांच्या घरीं आणि राणीच्या पानांतला प्रसाद खा. सावित्रीव्रताचं पुण्य मिळेल तुला!"

"सावित्रीच आहे ती. सोळा वर्षं परागंदा झालेला नवरा उगीच नाही आला आतां?"

गोस्वामी म्हणाले, "हो तर! आतां ती झाली सावित्री — भला एक सत्यवान् मिळालाय आतां!"

"कां तुम्हाला संशय वाटतो?" ती म्हणाली, "अजून सहा महिने कांहीं त्या दोघांची भेट व्हायची नाहीं."

"कां? कां व्हायची नाहीं भेट?"

गृहिणी म्हणाली, "बाबूंनीं कसलं तरी व्रत घेतलंय म्हणे! सात वर्षांचं आहे तें व्रत. त्यांतले अजून सहा महिने राहिले आहेत. त्या व्रताचं उद्यापन होईपर्यंत ते संन्याशासारखेच रहाणार. थोरल्या राणीसाहेबांनीं पुष्कळ सांगून पाहिलं, रडारड केली, हट्ट धरला — ती म्हणाली, माझा मुलगा भगव्या वस्त्रांत असलेला कसा पाहूं? सोळा वर्षं झाली तपश्चर्या, ती पुरे नाहीं का झाली? हें व्रत मोडलं म्हणून काय झालं? तेव्हां बाबू म्हणाले, 'हें व्रत पूर्ण झालं तर एकशेंवीस वर्षं परमायु होईल माझं. इतकीं वर्षं कष्ट सोसले, तिथं सहा महिन्यांनीं काय बिघडलं?' तें ऐकून राणीसाहेबांनीं कबुली दिली — भगवीं वस्त्रं धारण करणार — हवीष्यान्न खाणार — स्त्रीला स्पर्शसुद्धां करणार नाहींत."

यावर हरिदास गोस्वामीनें कांहीं शेरा मारला नाहीं. मुकाट्यानें जेवण उरकून उठतांना तो म्हणाला, "तर मग खरोखरच भवेन्द्र आहे का हा? — कोण जाणे! — कांहीं सांगतां येत नाहीं —"

## : ४ :

जेवणखाण उरकल्यावर राखाल थोरल्या राणीसाहेबांचा निरोप घेण्यासाठीं गेला. त्यावेळीं ती त्याला म्हणाली, "माझं एक सांगणं आहे बाबा. एकदां सुनबाईची भेट घ्यायला कांहीं हरकत आहे का?"

राखालला मोठा पेंच पडला. व्रत घेतल्याचें ढोंग केलें होतें त्याचें कारण हेंच होतें — वधुराणीची भेट घ्यायची चुकवणें. इथेंच त्याच्या मनाला संकोच वाटत होता. एकदां भवेन्द्राचें सोंग घेतल्यावर तें सर्व दृष्टींनीं सारखें वठवणें भाग होतें. तरीपण कांहीं दिवस असेच जाऊं द्यावे असें त्यानें ठरवलें होतें.

तो कांहीं बोलत नाहीं असें पाहून राणीसाहेब म्हणाली, "ती सती लक्ष्मी आहे बरं! तिच्या तोंडाकडे पाहून आजवर माझं काळीज फाटत होतं. तिला भेटला नाहींस तर तिला तें फार लागेल. कळलं ना तुला?"

राखाल म्हणाला, "व्रताचं उद्यापन होईपर्यंत तिला भेटणं योग्य होईल का आई?"

"नाहीं रे बाबा, त्यांत कांहीं दोष नाही. स्त्रीला स्पर्श करायचा नाहीं, असंच म्हटलंस ना तूं? ती तोंवर दूर राहील. तोंडातोंडी बोलीभाषण व्हायला कसली हरकत?"

तिचा आग्रह पाहून राखालनें संमति दिली. राणी कशी आहे तें पहाण्याची जिज्ञासा त्याला झाली नव्हती असें नाहीं.

"तर मग तिला इथंच बोलावून आणतें." असें बोलून राणीसाहेब निघून गेल्या.

राणीसाहेब निघून गेल्यावर राखालनें दिव्याची वात थोडी मोठी केली. थोड्याच वेळांत रेशमी वस्त्रांचा 'खसखस' शब्द व अंगावरच्या अलंकाराची नाजूक रुमझुम कानांवर आली. तेव्हां राखालनें दाराकडे पाहिलें. अर्धवट बुरखा घेतलेली एक तरुणी आंत येत होती. दारांतून आंत येतांच ती थांबली व मान खालीं घालून उभी राहिली.

राखाल खुर्चीवरून उठून उभा राहिला आणि म्हणाला, "ये."

ती एकेक पाऊल टाकीत हळूहळू पुढें आली. राखालच्या समोर येतांच गळयांत पदर घेऊन ती प्रणाम करण्यासाठीं गुडघे वांकवीत होती असें पाहून

राखाल म्हणाला, "नाहीं. नाहीं. प्रणाम करायचा नाहीं. अजून मला अशौच आहे."

क्षणभर ती थांबली 'माझ्या लेखीं तुम्हीं केव्हांच अशुचि नाहीं.' असें म्हणणें तिच्याकरवीं झालं नाहीं. राखालकडे पाहून तिनें नुसतेंच म्हटलें, "असूं दे —" आणि तिनें नमस्कार केला.

राखालनें तिचा आवाज ऐकला. आंसवांनीं भरलेले तिचे दोन्ही डोळे पाहिले. माथ्याच्या केंसापासून पायाच्या नखापर्यंत त्याच्या देहांतून वीणेच्या तरंगासारखा झणत्कार उठला.

राणी उठून उभी राहिली. समोरचा सोफा दाखवून राखाल तिला म्हणाला, "बैस तिथं." असें म्हणून तोही स्वतः खुर्चीवर बसला. ती बसली असें पाहून त्यानें विचारलें, "बरी आहेस ना?"

तिनें उत्तर दिलें, "बरी आहें."

सुमारें दोन मिनिटें दोघेंही कांहीं बोललीं नाहींत. तें असह्य होऊन राखालनें विचारलें, "तुला आठवण आहे का माझी?"

तिनें मान खालीं घालून उत्तर दिलें. "हो, आहे."

पुन्हां दोघेंही स्तब्ध राहिलीं — रात्रींची वेळ — जिकडेतिकडे सामसूम होतें. कुठूनही कसलाच शब्द ऐकूं येत नव्हता. इतक्यांत घड्याळांत अकराचे ठोके पडले. ठोके थांबतांच राखालनें तिला विचारलें, "सारं कांहीं कळलं ना तुला?"

तिनें पूर्ववत् उत्तर दिलें, "कळलं!"

"यापुढं सहा महिने असंच राहिलं पाहिजे मला!" शक्य तितका निराशेचा स्वर ओढून आणून राखाल म्हणाला.

राणीचे ओठ एक क्षणभरच हलले — जणुं कांहीं ती कांहींतरी बोलणार होती, पण ती लगेच थांबली. पदराचें एक टोंक हातीं घेऊन तें हाताळीत ती स्वस्थ बसून राहिली. राखाल म्हणाला, "तुला वाईट वाटतंय – होय ना?"

तिनें वर पाहिलें. उगीच थोडेसें हंसून राखालकडे पाहून तिनें विचारलें, "कां वाटावं?"

आतां तिनें दुसऱ्यांदा राखालकडे पाहिले होतें. पहिल्यानें ते डोळे आसवांनीं भरले होते. यावेळीं हास्यानें उजळले होते. राखालचें मस्तक

भिरभिरलें. ती हळूच म्हणाली, "दिवसांतून एकदां नुसती भेट झाली तरी मला वाईट वाटायचं नाहीं."

राखालला दिसून आलें, की राणीचा चेहरा स्नेह आणि सरलतेच्या पवित्रतेनें धगधगत होता. रमणीच्या चेहऱ्यावर अशा प्रकारची दिव्य ज्योति त्यानें कधीं पाहिली नव्हती. एवढी कोमलता, एवढा स्नेह आणि भक्ति रमणीच्या ठायीं दिसून येणें हें त्याच्या दृष्टीनें नव्या अनुभवाचें लक्षण होतें.

यापुढें काय बोलावें याचा तो विचार करूं लागला. त्याला कांहींच सुचेना. कसा या प्रसंगांतून सुटेन, या विचारानें तो व्याकुळ झाला होता. अशा वेळीं राणी हळूच म्हणाली, "भारी थकलेले दिसतांहां. रात्र फार झाली. आतां जरा विश्रांति घ्या."

राखालला वाटलें, सुटलों. तो म्हणाला, "जातों तर आतां. पुन्हां भेट उद्यां."

आणि माडीवरच्या मऊमऊ गाद्यांवर राखाल आडवा झाला पण त्याला कितीतरी वेळ झोंप लागलीं नाहीं. राणीचा चेहरा त्याच्या नजरेसमोर सारखा दिसत होता. राखाल जेव्हां जागा झाला त्यावेळीं ऊन बरेंच वर आलें होतें. तिन्ही बाजूंच्या भिंतीला प्रत्येकीं दोन दोन अशा मल्यामोठ्या खिडक्या होत्या. त्या सहाही खिडक्या उघड्या होत्या. बिछान्यावर पडल्यापडल्या तो खिडकीबाहेर पहात होता. आंबे, फणस आणि जांभळीचीं झाडें तिथून दिसत होतीं. आंब्याच्या फांद्यांना लहानमोठे, कांहीं हिरवे कांहीं पिकत असलेले आंबे लटकलेले दिसत होते.

त्या सर्व बाहेरच्या संपत्तीकडे पाहून त्याला वाटलें, "हें सारं माझंच का?"

ज्या खोलींत तो झोपला होता ती खोली गेल्या रात्रीं त्यानें नीटशी न्याहाळली नव्हती. त्या खोलींतील सर्व सामान बहुमोल होतें. मध्यभागीं संगमरवरी तक्ता असलेलें एक गोल टेबल होतें. वर झुंबरें टांगलेलीं होतीं, पण त्यांच्यावर खोळी घातलेल्या दिसत होत्या. दोन्ही खिडक्यांच्या मध्यभागीं एक मोठा आरसा होता, त्यांत तो झोपलेल्या पलंगासह त्याचें संपूर्ण प्रतिबिंब दिसत होतें. भिंतीवरच्या सर्व तसबिरा विलायती होत्या. तें सारें कांहीं पाहून त्याला वाटूं लागलें, "हें सारं माझंच का?"

पलंगावरून खालीं उतरून त्यानें दार उघडलें त्यावेळीं दोघे नोकर समोर

आले. एकानें त्याला हातपाय धुण्याच्या जागीं नेलें आणि दुसरा तिथेंच पहारा करीत उभा राहिला.

तो परत आला त्यावेळीं दिवाणजी त्याची वाट पहात होते. ते म्हणाले, "चला आतां स्नान करून घ्या. तोंपर्यंत मी इथं थांबतों." स्नान करून येईपर्यंत आठ वाजले. राखालला आंत बसवून घेऊन दिवाणजी जायला निघाले तेव्हां राखाल म्हणाला, "कुठं निघालांत काका? इथंच फराळ करून जा ना."

दिवाणजी म्हणाले, "नाहीं रे बाबा, मला घरींच गेलं पाहिजे. माझं अजून रोजचं आन्हिक व्हायचं आहे. तुझा फराळ होईपर्यंत मी बाहेर बसतों."

राखाल म्हणाला, "तर मग कशाला थांबतां उगीच? घरीं जाऊन सारं कांहीं उरकून या. दुपारीं इथंच पंक्तीला आलं पाहिजे तुम्हीं."

"ठीक आहे." असं म्हणून दिवाणजी निघून गेले.

देवघरांत जाऊन राखाल बसला तेव्हां राणीसाहेब त्याच्या शेजारीं बसून सहाणेवर चंदन घांसूं लागल्या. त्या इथें हजर असल्याचें पाहून त्याची घाबरगुंडी उडाली. मुंज झाल्यानंतर एक वर्षभर तो नियमितपणें संध्या करीत होता खरा, पण आतां त्याला संध्येंतला एक शब्दही आठवत नव्हता. केव्हां मार्जन करायचें, केव्हां नाक धरायचें, केव्हां डोळे झांकून ध्यान करायचें, दोन्ही हातांत जानवें केव्हां घ्यायचें, याची त्याला मुळींच आठवण नव्हती. संध्या करायचें ढोंग केलें तर राणीसाहेबांसमोर आपली फजिती होईल या भीतीनें हातांत जानवें घेऊन त्यानें १०८ वेळ गायत्रीमंत्राचा जप केला.

राणीसाहेबांनीं विचारलें, "झाली का रे संध्या, बाबा?"

"हो, आई, झाली. आतां नुसती शिवगायित्रीच आहे माझी."

"तर मग चल, थोडा फराळ करून घे."

फराळ झाल्यावर राखाल आपल्या बैठकीच्या खोलींत हुक्का ओढीत बसला. आतां राणी येईल या आशेनें तो दाराकडे नजर लावून राहिला होता, पण ती आली नाहीं. एक नोकर येऊन म्हणाला, "हुजूर, दिवाणजी आपल्याला बैठकखान्यांत बोलावताहेत. बाहेर पुष्कळसे लोक हुजुरांची भेट घ्यायला आले आहेत."

"बरं आहे. येतों थोड्या वेळानं." असें म्हणून राखाल गंभीर होऊन बसला.

ही मोठ्या कठीण परीक्षेची वेळ होती. बाहेर येणाऱ्या लोकांत भवेन्द्राच्या ओळखीचे कोण होते याची त्याला कल्पना नव्हती. त्याच्या आत्मचरित्रांत या लोकांसंबंधीं विशेष कांहीं लिहिलें नव्हतें.

तो बैठकखान्यांत येऊन बसला. आलेल्या माणसांची ओळख दिवाणजी करून देऊं लागले. 'जीवनचरिता'च्या अनुरोधानें तो त्या त्या लोकांशीं बोलूं लागला. बोलतांना तो फार सावधगिरी ठेवीत होता.

सुदैवानें गांवच्या शाळेचे हेडमास्तर तितक्यांत आले. ते नवीनच आलेले असल्यामुळें राखाल त्यांच्याशीं बोलत बसला. शाळा कशी काय चालली आहे? किती विद्यार्थी आहेत? त्यांत कोणत्या जातीचे जास्त आहेत? परीक्षेचा वार्षिक निकाल कसा काय लागतो? वगैरे प्रश्न विचारून त्यानें बराच वेळ काढला. एक दिवस येऊन शाळेला भेट देण्याचेंही त्यानें वचन दिलें. याच वाटाघाटींत अर्धा तास गेल्यामुळें जमलेल्या लोकांची हळूहळू पांगापांग झाली तेव्हां राखालनें सुटकेचा सुस्कारा सोडला.

सगळे उठून गेल्यावर दिवाणजी म्हणाले, "थोरले धनी आम्हांला सोडून गेले त्याला दोन वर्षं झालीं. या मुदतींत जें कांहीं केलंय तें मीच. त्याची तपासणी करायला दुसरं कुणी नव्हतं. मीं म्हातारा माणूस, कळत किंवा न कळत माझ्या हातून कांहीं चुका झाल्या असल्या तर एकदां सारे कागद तपासून पहा."

राखाल म्हणाला, "आपले कागदपत्र मीं काय तपासणार काका? मला काय कळतंय त्यांत? आजवर तुम्हीं जें कांहीं केलंय, तसंच यापुढंही करीत जा म्हणजे झालं."

दिवाणजी म्हणाले, "हो, मींच केलंय खरं. ज्या वर्षीं तुझा जन्म झाला तेव्हांच धन्यांनीं मला दिवाणजीच्या जागीं कायम केलं. तेव्हांपासून मीं तीस वर्षं हेंच काम करतोंय. तरीपण माझी कांहीं चूक झाली असेल म्हणून तूं एकदां हिशेब पाहून घे."

राखाल हंसला आणि म्हणाला, "काका, मीं मोठा हिशेबी पंडित आहें असं का वाटलं तुम्हांला? अन् तसा असतों म्हणून काय होणार होतं? कांहीं भूलचूक झाली तर झाली. जी भूलचूक तुमच्या ध्यानीं आली नाहीं ती मला कशी उमगणार?"

दिवाणजी म्हणाले, " अरे बाबा, माणसाची नजर काय जन्मभर सारखीच राहाते ? आतां साठ वर्षं झालीं मला. म्हणून म्हणतों कीं या साऱ्या हिशेबावर एकदां तूं नजर टाकलीस तर बरं होईल. हा पैसा मोठा वाईट असतो बाबा. "

राखाल म्हणाला " तें तर खरंच ! म्हणूनच तर पळून गेलों होतों. पण राहावलं कुठं ? घरचा विसर पडणं कठीण गेलं. आतां आलोंच आहें काका ! रुपेरी सांखळींत अडकून पडायचं आहेच, तर दोन दिवस असेच जाऊं द्या कीं. "

राखाल तोंडानें असें बोलत होता खरा, पण ही इस्टेट केवढी मोठी होती, हातीं रोकड किती होती वगैरे गोष्टी पाहण्याविषयीं त्याचा जीव धडपड करीत होता.

दिवाणजी म्हणाले, "तर मग दोन दिवस थांबूं. धन्यांचं वर्षश्राद्ध होऊन जाऊं दे. मग कोर्टाचं प्रोबेट घेतलं पाहिजे अन् कलेक्टरकडून नांव बदलून घेतलं पाहिजे. कंपनीचे जे बॉंड्स आहेत त्यांवर धन्याची सही आहे. त्याची कांहीं काळजी नको. पण बेंगाल बँकेत जे पैसे जमा आहेत ते कोर्टाच्या सर्टिफिकिटाशिवाय तुझ्या नांवें जमा व्हायचे नाहींत. "

अगदीं सहज म्हणून राखालनें विचारलें, " किती आहेत बेंगाल बँकेंत ? "

" ५० हजारांवर असतील. "

" आणि कंपनीचे बॉंड्स् ? "

" सुमारें सहा लाखांवर असतील. "

' साडेसहा लाख ? ' दरमहा पंचवीस रुपये पगार घेणाऱ्या ह्या रेल्वेच्या कारकुनाचें डोकें फिरलें. एवढे रोख ५० हजार रुपये जरी आपल्या हातीं आले तरी पुरे ! जमीदारीचं काम मोठं बिकट अन् भानगडीचं. ही भुताची कामगिरी हवी कुणाला ? तो म्हणाला, " काका, मीं पुन्हां गृहस्थाश्रम पत्करला आहे खरा, पण या उठाठेवी मला रुचत नाहींत. हे रुपये–आणे–पै करीत बसायच्या ऐवजीं कांहीं जपजाप्य केलं किंवा तीर्थभ्रमण केलं तर मला जास्त आनंद होईल. "

दिवाणजी म्हणाले, " असं कधीं झालंय बाबा ? तुझी दौलत तूं नाहीं पहायची तर कुणी ? मी आतां म्हातारा झालोंय. आतां माझे असे किती दिवस राहिले आहेत ? दादा आज हयात असते तर तुला सारं कांहीं

शिकवून सवरून आम्ही दोघांनींही काशीवास पत्करला असता –" बोलतांना दिवाणजींचा गळा दाटून आला, "– पण तें कांही आमच्या नशिबीं नव्हतं. शेवटीं मीं एकटाच राहिलों."

दिवाणजींना गहिंवर आलेला पाहून राखलनेंही आपल्या मुद्रेवर विषण्णतेचा आव आणला. तो म्हणाला, "माझाही ओढा आहे देवधर्माकडे. मला या हिशेबाठिशेबाच्या भानगडी नाहीं आवडत."

दिवाणजी म्हणाले, "तें खरं आहे बाबा. पण आज तुला हा संसारधर्म करायला हवा. देवदयेनं चारदोन मुलं झालीं, तुझ्या नजरेखालीं तीं करतीं-सवरतीं झाली, म्हणजे मग देवधर्माच्या गोष्टी बोल. आज नाहीं."

मुलेंबाळें व्हायची गोष्ट निघाली, तेव्हां गेल्या रात्रीं पाहिलेला राणीचा अश्रु आणि हास्यपूर्ण चेहरा राखालला आठवला. तिला तुन्हां एकदां पाहाण्यासाठीं त्याचा जीव कासावीस झाला होता, पण तितक्यांत नोकर आला आणि त्यानें जेवणाची तयारी झाल्याची वर्दी दिली.

जेवण झाल्यावर दिवाणजींना घेऊन राखाल आपल्या खोलींत येऊन बसला. रामानें सुगंधी तंबाखू भरून हुक्का आणून ठेवला तो घेऊन ओढीत दिवाणजी एका सोफयावर बसले. जमीदारीच्या बाबतींत त्या दोघांच्या गोष्टी चालल्या होत्या. कृष्णनगरला जाऊन कलेक्टरसाहेबाला भेटणें अवश्य होतें. राखालनें विचारलें, "कोणत्या पोशाखांत जायचं ?"

दिवाणजी म्हणाले, "भगवी कफनी घालून साहेबाकडे जाणं बरं दिसायचं नाहीं."

राखाल म्हणाला, "मठांत होतों त्यावेळीं साहेबसुभ्यांना भेटायचा प्रसंग येई, पण त्यावेळीं होतों महंत. भगवं धोतर, भगवी रेशमी कफनी, भगवं उपवस्त्र, डोक्याला भगवा फेटा, पायांत भगवे मोजे — बूटच काय ते भगवे नसत — बदामी असत."

"तो तसला पोशाख आहे का बरोबर ?" दिवाणजींनीं विचारलें, "नसला तर नवा करून आणला पाहिजे कलकत्त्याहून !"

राखाल म्हणाला, "एकदां कलकत्त्याला गेलं पाहिजे. आज हातीं कितीसे पैसे आहेत. एक मोटरकार आणली पाहिजे म्हणतोय."

"मोटरकार !" दिवाणजी उद्गारले, "खूप पैसे पडतात ना तिला !"

दिवाणजीचा आवाज ऐकून राखालला वाटलें, कीं या कामीं ते अडथळा आणणार! तेव्हां त्यानें म्हटलें, "छे, छे, भारी किंमतीची घ्यायची नाहीं. या खेडेगांवांत १५-२० हजारांची मोटर केव्हांच बिघडून जाईल. सध्यां सातआठ हजारांची घेतली तरी चालेल."

दिवाणजी म्हणाले, "तेवढी रक्कम तिजोरींत सांपडेल. केव्हां जायचं तें सांगा म्हणजे हातीं असलेलीं एकदोन जरुरीचीं कामं लवकर उरकून घेईन."

राखालला मोठी पंचाईत आली. हा दिवाणजी येणार का बरोबर? कलकत्त्याला कुणी ओळखीचा माणूस भेटला अन् त्यानें जर 'कायरे राखाल?' म्हणून विचारलें, तर साराच डोलारा कोसळायचा, म्हणून तो म्हणाला, "केव्हां जायचं तें कांहीं ठरवलेलं नाहीं. कदाचित् उद्यांसुद्धां जाईन." असें सांगायचा त्याचा उद्देश एवढ्यासाटींच कीं दिवाणजींनीं कलकत्त्याला आपल्याबरोबर येऊं नये.

दिवाणजी म्हणाले, "उद्यांच जायचं असलं तरी माझी हरकत नाहीं. हातचीं कामं परत आल्यावर उरकीन. पांचसात दिवस तर लागायचे नाहींत?"

राखालनें थोडासा विचार केल्याचा आव आणला. तो शेवटीं म्हणाला, "दहाबारा दिवस सहज जातील. कृष्णचतुर्थीला बाबांचं वर्षश्राद्ध आहे, त्याची तयारी करायला हवी ना? आपण तोंपर्यंत इथं नसलांत तरी चालेल का?"

दिवाणजींना वाटलें, आपल्याला बरोबर घेऊन जायला बाबू तयार नाहींत. त्यांना थोडेसें आश्चर्यच वाटलें. राखाल हा आपण सदाचारपरायण कट्टा ब्रह्मचारी असल्याचें सांगत होता, तेव्हां त्यानें अशी अडचण कां दाखवावी तें दिवाणजींना कळेना. त्यांनाही मोठा पेंच पडला. त्या दिवशींच सकाळीं थोरल्या राणीसाहेब त्यांना म्हणाल्या होत्या, 'एका बाबतींत नीट लक्ष ठेवायला हवं. सध्यां कांहीं दिवस भवेन्‌ला कुठं एकटा जाऊं देऊं नका. कुठंही जायचं असलं तरी त्याच्याबरोबर जा. केव्हां त्याचं मन बदलेल याचा नेम नाहीं. पुन्हां पळून जाऊं नये अशी खबरदारी घ्या. अर्थात् दिवाणजींना कांहींतरी युक्ति काढावी लागली. ते म्हणाले, "बरी आठवण केलीत. कृष्णचतुर्थीला श्राद्ध आहे हें माझ्या ध्यानांतच नव्हतं. ती तयारी करायला कलकत्त्यालाच जायला हवं. धान्यधुन्य तिकडूनच आणावं लागेल. इतकंच नव्हे, सैंपाक करायला माणसंसुद्धां कलकत्त्यालाच पाहावीं लागतील."

राखाल म्हणाला, “ सैंपाकाचीं माणसं कलकत्त्याहून ? लहानपणची मला चांगली आठवण आहे. अशावेळीं गांवचेच लोक येऊन सारीं काम करीत !”

दिवाजी म्हणाले, “ त्यावेळच्या गोष्टी कशाला हव्या बाबा? सोळा वर्षांपूर्वींच्या गोष्टी आतां राहिल्या आहेत का ? पूर्वीं आपल्या हातचे चार जिन्नस चार लोकांच्या मुखीं जावे म्हणून प्रत्येकजण मुद्दाम पुढं येई. आतां तोच माणूस म्हणतो, मी काय आचारीपाणकी आहें ? हीं कामं आतां हलकीं वाटतात त्यांना.”

दिवाणजी आपल्याबरोबर कलकत्त्याला आल्यावांचून रहात नाहींत हें राखालला कळून चुकलें.

राखालला वाटलें, आतां राणीचीं जेवणींखाणीं उरकलीं असतील. दिवाणजी उठून गेले तर ती बिचारी येईल तरी ! त्यानें तोंडाआड हात धरून एक जांभई दिली. ती पाहून दिवाणजी म्हणाले, “ तर मग मी आतां जातों. आतां जरा विश्रांति घ्या. इथंच बिछाना करायला सांगूं का ?”

राखाल होय म्हणाला तेव्हां रामाला हांक मारीत दिवाणजी निघून गेले.

## : ५ :

राखालची इच्छा पुरी झाली. थोड्याच वेळांत मान खालीं घालून लाजतलाजत राणी आंत आली. तिनें जरा ठाकठीक कपडे केले होते असें पाहून राखालनें विचारलें, “ कुठं निघालीस ?”

राणी चकित होऊन म्हणाली, “ छे, कुठं जातेंय मी ?”

राखाल जरासा ओशाळून म्हणाला, “ तसं नव्हे, कुठं होतीस म्हणून मी विचारीत होतों.”

“ देवघरांत होतें.” असें म्हणून राणी तशीच मुकाट्यानें उभी राहिली. तिला राखाल म्हणाला, “ बैस ना.”

राणी लाजून उघड्या दाराकडे पाहूं लागली तेव्हां तिचा उद्देश ध्यानीं येऊन राखालनें उठून दारावरचा पडदा ओढला. तो येऊन स्वतः खुर्चीवर बसला आणि सोफा दाखवून तिला म्हणाला, “ बैस ना इथं.”

राणी बसली आणि तशीच मान खालीं घालून ती म्हणाली, "कलकत्त्याला जाणार आहांत वाटतं ?"

राखाल म्हणाला "हो, असं म्हणतोंय."

क्षणभर थांबून राणी म्हणाली, "इतक्यांतच कशाला जायचं तें?"

राखाल कांचरत म्हणाला, "बरींचशीं कामं आहेत ना?"

आतां राणीनें वर मान करून पाहिलें. तिचे डोळे पाण्यानें भरून आले होते. ती म्हणाली, "आई रडतायत ना ?"

राखालनें उत्कंठित होऊन विचारलें, "आई रडतेय् ? कां ?"

राणी म्हणाली, "एव्हांच कशाला जायचं? दिवाणकाका आहेत ना? तुम्हांला काय हवं असेल त्याची यादी करून द्या त्यांच्याकडे — ते घेऊन येतील."

राखाल म्हणाला, "कांहीं कपडे करायचे आहेत — ते बेतले पाहिजेत. सोबत गेलं नाहीं तर —"

"कपड्यांसाठीं स्वतः कशाला जायला हवं?" राणी म्हणाली "दिवाणकाका कलकत्त्यांतल्या बड्या दुकानांतून दर्जी घेऊन येतील, कपड्यांचे नमुने घेऊन येतील, दर्जी इथं माप घेईल आणि कपडे तयार करून पाठवून देईल."

राखाल क्षणभर थांबून म्हणाला, "ठीक आहे. तसंच करूं. आईला वाटतंय तर मीं नाहीं जाणार आतां." असें म्हणून त्यानें शेजारच्या डब्यांतलें एक पान घेऊन दुसरें तिच्या हातीं दिलें. पान हातीं घेऊन ती तशीच बसली होती असें पाहून तो म्हणाला, "जेवणं झालीं नाहींत का तुमचीं ?"

"नाहीं. आम्ही जेवायला निघत होतों, तितक्यांत दिवाणकाका आले. त्यांनीं तुम्हीं कलकत्याला जात आहांत असं सांगितलं, तेव्हां आई रडूं लागल्या."

राखाल थोडेंसें हंसून म्हणाला, "म्हणून आईनं तुला इथं पाठवलं होय !" तिनें मानेनेंच हो म्हटलें तेव्हां त्यानें विचारलें, "नाहींतर तूं यावेळीं आली नसतीस — होय ना !" असें म्हणून तो हंसला.

राणीनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. तिच्या जिवणीवर थोडेंसें हंसूं झळकून गेलें.

इतक्यांत रामू बाहेरून म्हणाला, "बाबूंचा बिछाना कोणत्या खोलींत घालूं ?"

" थांब, मीं आलें हं " असें म्हणून तिनें राखालला विचारलें, " तिकडे आईच्या खोलींत बिछाना घालायला सांगूं कीं इथंच झोपणार ? "

राखाल म्हणाला, " मीं इथंच झोपेन. "

त्या खोलींत पलंग नव्हता. राणी दारापाशीं जाऊन म्हणाली, " रामचरण, बाबू इथंच झोंपतील. एक नवारीची खाट घेऊन ये आणि इथंच बिछाना घाल. "

रामा निघून गेल्यावर राणी पुन्हां येऊन बसली तेव्हां राखाल म्हणाला, " आतां पुन्हां केव्हां येणं व्हायचं ? "

" कां ? " असें म्हणतांना राणीचे ओठ फुलले होते. राखाल म्हणाला, " तुला पहावंसं वाटतं ना मला ? "

पुन्हां ओठ फुलवीत हंसत राणी उद्गारली, " इश्श ! "

" कां ? खरं नाहीं वाटत ? " तिनें मानेनें नकार दिला तेव्हां तो म्हणाला, " कां खरं नाहीं वाटत ? "

ती कांहीं उत्तर देईना. राखालनें पुनःपुन्हां विचारायला सुरवात केली तेव्हां शेवटीं ती म्हणाली, " आतां मला टाकून कलकत्त्याला जायला निघालां होतां ना ? "

" दोन दिवसांसाठींच तर जाणार होतों ! "

" पण—जाणार होतां ? "

रामा बाहेरून ओरडला, " खाट – बिछाना घेऊन आलोंय. "

राखाल तिला म्हणाला, " जा, आतां जेवायला जा. उशीर झाला फार. मी तास दोन तास वामकुक्षी करतों. तितक्यांत ऊन खालीं येईल. तूं मागील-दारच्या बागेंत फिरायला घेऊन जाशील का मला ? "

" बागेंत फिरायला जायचं ? "

" तूं ये – आपण दोघेंही जाऊं. "

राणीचा चेहरा लाजेनें रंगला. ती म्हणाली, " दोघेंही बरोबर ? छेः ! भलतंच ! "

" तर मग ? मीं आधीं जाऊं ? तूं नंतर येशील ? "

" छेः ! भलतंच ! "

राखाल नाराज होऊन म्हणाला, " तूं यायची नाहींस ? मग मी तरी कशाला जाऊं तिकडे ? "

राणी म्हणाली, – " नाहीं, तुम्हीं जा. मीं आधींच जाऊन राहातें तिथं. "

" अगदीं निश्चित ? "

" निश्चित ! "

" ठीक — विसरूं नकोस हं. "

" तुम्हीं विसरूं नका ! " असें म्हणून ती गोड गोड हंसत निघून गेली.

रामानें येऊन खाटेवर बिछाना घातला. कांहीं वेळ झोप घेतल्यावर तिसऱ्या प्रहरीं राखाल जागा झाला आणि बागेंत गेला. तिथें राणी त्याला भेटली खरी पण ती केवळ पांचच मिनिटें ! राखालनें बागेंत तिला शोधून काढलें तेव्हां लाजेनें ती अगदीं विरमून गेली. तितक्यांत कुणीतरी येईल या भीतीनें ती अगदीं अस्वस्थ झाली होती, सारखी इकडे तिकडे पहात होती असें पाहून राखालनें तिला जाऊं दिलें. ती झाडाआड लपतलपत निघून घरांत गेली.

संध्याकाळ व्हायच्यापूर्वी अंतःपुराच्या मागील दारानें कनकलता आणि सुरबाला बाहेर आल्या आणि गंगेच्या घाटाकडे निघाल्या. कनक पहिल्यानें आली होती तेव्हां सुरबालेकडे फारसें लक्ष देत नसे. बिचारी सुरबाला आपल्या दुःखांत चूर झालेली होती, तरीही ती राणीचें मन प्रसन्न ठेवण्याचा प्रयत्न करी, पण राणी कनकलतेवर नाराज होऊं लागली तेव्हांपासून कनकही थोडी थोडी सुरबालेकडे ओढ घेऊं लागली. कनक मोठी चतुर होती. सुरबालेच्या जीवनांत कांही तरी गूढ रहस्य आहे आणि तें कुणाला कळलेलें नाहीं, म्हणूनच तें रहस्य उकलून काढण्यासाठीं ती धडपडत होती.

सूर्य त्यावेळीं अस्ताला गेला होता. त्या दोघीही घाटाच्या पायऱ्यांवर पाण्यांत पाय सोडून बसल्या होत्या.

सुरबाला म्हणाली, " वधुराणी मोठी खूष झालीय – नाहीं ? "

कनक म्हणाली, " असली वस्तु लाभली म्हणजे कोण खूष व्हायचं नाहीं ? तूं झाली नसतीस खूष ? " तो प्रश्न सुरबालेला आवडला नाहीं.

कनक म्हणाली, " ही काय ग अक्कल या बाबूची ? अजून सहा महिने व्रत पाळायचं होतं तर एवढ्या घाईनं आले कशाला ? सहा महिन्यांनंतर आले असते तर काय बिघडलं असतं ? "

सुरबाला म्हणाली, " बिघडायचं काय ? पण घरीं म्हातारी आई आहे— सहा महिन्यांत जर ती मेली असती तर मुलाची तिची दृष्टभेट कशी झाली असती ? "

" मीं आईबद्दल नाहीं बोलत. मी बोलत होतें राणीबद्दल ! "

सुरबाला म्हणाली, " ते सहा महिने आधीं आले हें राणीच्या लेखीं देखील चांगलंच नाहीं का ? डोळेभरून नवऱ्याला पाहायला मिळतंय हें थोडं थोडकं भाग्य का बायकांच्या दृष्टीनं ? "

कनक म्हणाली, " बरं, बरं ! पुरे झाली तुझी पंडितगिरी ! — पण असं पहा, हा भवेन्द्र नसला — कुणी तोतया असला — तर ? "

कनकचे उद्गार ऐकून सुरबाला शहारली. ती म्हणाली, " इडापिडा टळो ! असं कांही बोलूं नको. ते भवेन्द्रबाबू नसते तर घरच्या लोकांनीं संशय नसता का घेतला ? "

कनक म्हणाली, " पण केव्हां केव्हां असं होतं, बरींच वर्षं कुणी नापत्ता झाला अन् मेला, तर त्याच्या संपत्तीच्या लोभानं एकादा लबाड माणूस तोतया बनून येतो म्हणतात. एकदां कमला थिएटरमध्यें अशीच एका नाटकांत मी — असंच एक नाटक मीं पाहिलं होतं. "

" त्यांत कुणी ओळखलं नाहीं त्याला ? "

" नाहीं. "

" घरीं बायको होती का त्याची ? "

" होती तर ! अगदीं तरुण होती. "

" तो जो आला होता त्याचं असं कांही व्रतबीत होतं का ? "

" नाहीं. तसं कांहीं नव्हतं. "

सुरबाला हंसून म्हणाली, " हे आले आहेत ते जर तसे असते, तर त्यांचेही असे कांहीं व्रतनियम नसते. "

कनक म्हणाली, " एवढ्यावरूनच कांहीं तो तोतया नाहीं हें शाबीत होत नाहीं. नाटकांतल्या तोतयापेक्षां हा कदाचित जास्त बुद्धिमान् असेल. "

सुरबाला म्हणाली, " छे छे ! असं कांहीं मनांतसुद्धां आणूं नकोस. सतीलक्ष्मी आहे आमची राणी ! देव काय एवढा निष्ठुर आहे ? "

पाणी भरून घेऊन दोघीही तशाच बोलत बोलत परत घरीं यायला निघाल्या. सुरबाला पुढें होती. कनकलता तिच्या मागोमाग जात होती.

त्या बागेंतून पुढें जात होत्या. एका झाडापाशीं येतांच सुरबाला एकदम स्तंभित होऊन थांबली. कनक पुढें येऊन पाहाते, तों थोड्या अंतरावर राखाल उभा होता. या दोघी येत आहेत असें पाहून तो दुसऱ्या बाजूला वळून चालूं लागला. कनकनें पाहिलें, सुरबालेचा चेहरा पांढरा फटक पडला होता. तिचे हातपाय कांपत होते. दमछाट होऊन तिनें कनकला विचारलें, "कोण तो?"

सुरबालेची ती अवस्था पाहून कनक आश्चर्यचकित झाली. ती म्हणाली, "दुसरं कोण?—बाबू!"

सुरबालेनें विचारलें, "बाबू?—कोण बाबू?"

"भवेन्द्रबाबू!—किंवा भवेन्द्रबाबूंचं सोंग घेऊन जो आला आहे तो!" असें म्हणून कनक सुरबालेच्या तोंडाकडे नीट निरखून पाहूं लागली.

सुरबाला उद्गारली, "भवेन्द्रबाबूंचं सोंग घेऊन? सोंग घेतलंय का त्यानं?"

कनकलतेच्या मनांत आलेला संशय आतां जवळ जवळ खरा झाल्यासारखें तिला वाटूं लागलें होतें. तिनें उत्तर दिलें, "सोंग घेतलंय् कीं नाहीं तें मला काय माहीत? तुला माहीत कीं त्याला माहीत!"

सुरबाला विचुकपणें कनकच्या तोंडाकडे पहात राहिली. नंतर तिनें विचारलें, "तूं काय म्हणतेस तें कळलं नाहीं मला."

कनक हंसली आणि म्हणाली, "तसं कांहीं म्हटलं नाहीं मीं! आज कितवी तारीख म्हणून विचारीत होतें. चल, चल, इथं किती वेळ उभं रहाणार?"

त्या दोघीही आंत आपापल्या खोलींत निघून गेल्या. कनकलता एकटीच बसून खूप विचार करीत होती. या घटनेबद्दल तिला निश्चित कांहीं अंदाज करतां येईना. हीं दोघें एकमेकांना ओळखतात यांत शंकाच नाहीं, पण तीं कट करून आलेलीं नसावीं खास. हा माणूस तोतया होता, कीं खरोखरच भवेन्द्र असून महन्त असल्यामुळें सुरबालेला ओळखीत होता, तें कांहीं सांगतां येत नव्हतें.

रात्रीं उकाडा होत असल्यामुळें राखाल उघड्या गच्चीवर जेवायला बसला होता. समोर एक मोठा दिवा तेवत होता. थोड्या अंतरावर अंधारांत उभी

राहून सुरबाला सारखी टक लावून राखालकडे पहात होती, इतक्यांत कनक एकदम मागून आली आणि तिनें दोन्ही हातांनीं तिचे डोळे झांकले.

सुरबाला म्हणाली, " कनकदिदी. "

कनक म्हणाली, " दिदी ? दिदी ! मला दिदी म्हणतेस ती मी काय तुझ्यापेक्षां मोठी आहें ? "

सुरबाला अस्वस्थ होऊन म्हणाली, " आधीं माझे डोळे सोड पाहूं. "

" मी डोळे सोडणार नाहीं. भल्या घरचा माणूस जेवायला बसला होता, त्याच्यावर अशी नजर लावलीस कशाला ? बिचाऱ्याला अजीर्ण होईल ना दृष्ट पडून ! "

सुरबाला चिडून म्हणाली, " असं काय करतेस ? डोळे सोड ना. "

तिच्या डोळ्यावरचे हात काढून कनक म्हणाली, " बघ – बघ अगदीं डोळे फाडून बघ. माणूस आवडलं, कीं डोळेभर पाहून तृप्ति होते. कुठं ओळख झाली होती तुझी ? "

" ओळख ? " सुरबाला उद्गारली.

" हो हो ! ओळख – परिचय – दोस्ती ! कुठं झाली होती दोस्ती ? "

" कोण म्हणतंय असं ? "

" कोण म्हणतंय ? त्यांनीं स्वतःच सांगितलं वधुराणीला. "

सुरबाला चकित होऊन म्हणाली, " काय सांगितलं राणीला ? "

" त्यांनीं सांगितलं, कीं या बाईला मी पूर्वी ओळखत होतों. "

सुरबाला ठांसून म्हणाली, " राणीला असं सांगितलं ? मुळींच नाहीं ! शक्यच नाहीं ! "

कनक म्हणाली, " तर मग खरं काय तें मला सांगून टाक ना. "

सुरबाला कांही न बोलतां तणतणत तिथून निघून गेली. आपल्या शेजघरांत जाऊन ती उशींत तोंड खुपसून रडूं लागली.

# रत्नदीप

## ( चतुर्थ खंड )

: १ :

कलकत्त्याच्या उत्तरभागच्या एका दुमजली घराच्या एका खोलींत खगेन्द्रनाथ एक पत्र हातीं घेऊन लक्ष लावून वाचीत होता. त्याच्या समोरच्या टेबलावर आणखी एक उघडें ठेवलेलें पत्र पडलें होतें. पहिलें पत्र वाचून झाल्यावर त्यानें दुसरें पत्र वाचायला घेतलें. हें दुसरें पत्र पहिल्या पत्राइतकें लांबलचक नव्हतें. तें पत्र असें होतें :—

" प्रिय खगेन्द्रबाबू,

आज आपलें पत्र मिळालें. मला जो संशय आला होता, तसेंच तुम्हांलाही वाटतें हें पाहून मला समाधान वाटतें. ज्या बातम्या काढण्यासाठीं आपण मला लिहिलें होतें, त्यापैकीं कोणतेंही काम माझ्याकरवीं अजून झालेलें नाहीं. उद्यां दिवाणजी कलकत्त्याला जाणार आहेत. ते तिथें पांच सात दिवस रहाणार आहेत. त्यांचा पत्ता :— नं. ६५, माणिकतोला. शक्यतर त्यांची भेट घेऊन जरूर असलेली माहिती त्यांच्याकडून काढून घ्यावी. मी अजूनही कांहीं दिवस इथें राहिलें पाहिजे असें तुम्ही लिहितां, पण आजकाल वधुराणी माझ्यावर नाराज असल्यासारखी दिसते. तिला सोबती मिळाला आहे. आतां

सोबतिणीची काय जरूर ? आपण दिवाणजींना एकदां सांगून पहावें. तूर्त एवढेंच पुरे.

— आपली
कनक

पत्र वाचून झाल्यावर खगेन्द्रनें घड्याळाकडे पाहिलें. तीन वाजले होते. यावेळीं गेलें तर भेट होईल, उशीर केला तर कदाचित् ते बाहेर जातील.

खगेन्द्रनें आलमारी उघडून त्यांतून कांहीं जुने कपडे बाहेर काढले. फाटकें धोतर, फाटका सदरा चढवून, एक मळकटशी चादर खांद्यावर टाकून खगेन्द्र जिना उतरून खालीं आला. तो रस्त्यावर आला त्यावेळीं धरमतोल्याकडे जाणारी ट्राम येत होती. खिशांत पैसे होते, तरी तो ट्राममध्यें बसला नाहीं. तसाच उन्हांतून पायीं पायीं तो माणिकतोल्याकडे जायला निघाला.

तें घर दिवाणजीच्या एका मित्राचें होतें. त्यानें चौकशी केली, त्यावेळीं दिवाणजी आले आहेत असें त्याला कळलें. तिथल्या नोकरानें त्याला दिवाणखान्यांत बसवून घेतलें आणि तो दिवाणजींना खबर देण्यासाठीं निघून गेला. थोड्या वेळानें नोकर परत आला आणि म्हणाला, " बाबू, दिवाणजी झोंपले आहेत. लवकरच उठतील. तोपर्यंत बसणार आहां का आपण ? हुक्का आणून देऊं का ? "

" हुक्का नको. " खगेन्द्र म्हणाला, " भारी उकाडा होतोय. तेवढा पंखा सोड. "

पंख्याची कळ दाबून नोकर निघून गेला.

बराच वेळपर्यंत तो विचार करीत बसला होता.— विधवा वधुराणीशीं लग्न करायचा त्याचा बेत फसला होता. हा जो कोण तिचा नवरा म्हणून आला होता, तो भवेन्द्र नव्हे असें कनकला वाटत होतें. आणि ही सुरबाला तरी कोण ? कुठून नदींतून वाहत आली ? हीं दोघेंही कट करून आलीं नाहींत असें कनक खात्रीपूर्वक म्हणत होती. पहिला बेत फसला, आतां या भवेन्द्राला पकडलें तर कांहीं पैसे उकळतां येतील कीं काय तें पहावें. त्याला जाऊन दम द्यायचा, नाहींतर पोलिसांत वर्दी देतों म्हणून सांगायचं. राणीशीं लग्न झालें असतें तर सोळा आण्याचा मालक झालों असतों. सध्यां चोराची लंगोटी मिळाली तरी सही.

इतक्यांत तो पूर्वीचा नोकर येऊन दाराशीं उभा राहून म्हणाला, " दिवाणजी उठले आहेत, त्यांना वर्दी दिली आहे. "

सुमारें दहा मिनिटांनीं दिवाणजी डुलत डुलत आंत आले. त्यांना पाहतांच खगेन्द्र खुर्चीवरून उठून उभा राहून म्हणाला, " मला ओळखलंत का ? "

दिवाणजी म्हणाले, " खगेन्द्रबाबू का ? नमस्कार. बसा, बसा. कसं काय ? सारं ठीकठाक ? "

खगेन्द्र म्हणाला, " सारं ठीक. आजच आपलं येणं झालं वाटतं ? "

" हो. आज सकाळीं नवाला आलों. माझा पत्ता कसा लागला तुम्हांला ? कनकलतेनं लिहिलं वाटतं ! "

" हो. ठीक आहे ना आपली प्रकृति ? "

" अरे बाबा, साठ वर्षे उलटलीं, आतां प्रकृति ठीक काय अन् काय काय ? तुमची काय खबर ? कोणत्या गांवीं जायचं ठरलं ? "

" कुठं काय ठरलंय अजून ? "

" वेळ कां घालवतां उगीच ? "

खगेन्द्र चेहरा पाडून म्हणाला, " पैशाच्या अभावीं ! कुठंही जाऊन वकिली थाटायची म्हणजे हातीं पैसा पाहिजे. नुसतीं कायद्याचीं पुस्तकं घ्यायलाच दोन तीनशें रुपये लागतील. त्याशिवाय कपडालत्ता, खुर्ची-टेबल कपाट — हें तर सारं हवं ! तसंच गेल्याबरोबर कांही कुळं मिळायचीं नाहींत. पांच सहा महिने निभतील इतका पैसा तर हातीं हवा ! "

" कुठं मास्तरची नोकरी होती ना तुम्हाला ? "

" हो. चाळीस रुपये पगारावर मास्तरी करीत होतों आजवर. आतां पन्नास मिळताहेत प्रेसमध्यें. प्रेसमध्येंच रहातों. शक्य तेवढी काटकसर करून कसेबसे दिवस काढतोंय. पुरेसे पैसे शिलकी पडले कीं मग जायचं म्हणतोंय. "

" कुठं जायचं ठरलंय ? "

" गयेला जायचं म्हणतोंय. तिथं प्रॅक्टीस जरी जमली नाहीं, तरी देखील कमिशनचीं कामं मिळतात. घडेवांटपाचे दावे तिथं बरेच असतात. अगदीं ज्युनिअर वकिल देखील कमिशनचं काम करून महिना दोन तीनशें रुपये कमावतात. "

दिवाणजी म्हणाले, "मग तेंच बरं तर. गयेलाच जा."

"तेंच करणार आहें." खगेन्द्र म्हणाला, "आपल्याला एक गोष्ट विचारायला आलों होतों. आतां बाबू घरीं आले आहेत, तेव्हां कनकची तिथं अजून जरुरी आहे का?"

"तें मी कसं सांगू बाबा? तें खातं आहे धाकट्या राणीसाहेबांचं."

पुन्हां एकदां चेहरा पाहून खगेन्द्र म्हणाला, "आपण मोठीं माणसं, माझी बहीण आपल्या आश्रयाला होती, त्यामुळें मी निश्चिंत होतों. कनक तिथं होती तोंवर प्रेसमध्यें राहून चार पैसे शिल्लक टाकीत होतों. ती जर तिथून निघाली, तर मग मला बिन्हाड करावं लागेल. मग पन्नास रुपयांत भागायचं नाहीं. उलट जे चार पैसे शिल्लक टाकले आहेत, तेही खर्चून जातील. वकिली करायची आशा सोडून जन्मभर मास्तरी करून मरावं लागेल!" असें म्हणून त्यानें एक मोठा सुस्कारा सोडला.

त्याची ती अवस्था पाहून दिवाणजींना कळवळा आला. थोडा वेळ हुक्का ओढून घेतल्यावर ते म्हणाले, "बरं, बरं, कांहीं काळजी करूं नकोस. मी गेलों कीं छोट्या राणीला विचारतों. आतां कनकलतेची जरुरी नाहीं असं ती म्हणाली, तर मी तिला गळ घालून सांगेन आणि तुझ्या बहिणीला वर्ष दोन वर्षं तिथंच ठेवून घ्यायची तजवीज करीन. तितक्यांत तुम्ही आपला प्रॅक्टीसचा जम बसवा आणि मग आपल्या बहिणीला घेऊन जा."

खगेन्द्रला वाटलें, एक काम तर झालें. आतां भवेन्द्रसंबंधीं कांहीं बातमी मिळाली तर पहावी, म्हणून इकडल्या तिकडल्या गोष्टी झाल्यावर त्यानें विचारलें, "यायच्यापूर्वी बाबू काशीलाच होते का?"

दिवाणजी म्हणाले, "नाहीं! घरीं यायच्यापूर्वीं कांही दिवस काशीला होते."

खगेन्द्र मोठी खुलावट दाखवून म्हणाला, "काशी! वाहवा! काय सांगावं! काशी म्हणजे काशीच. बाबा हयात होते त्यावेळीं पांच सहा महिने आम्हीं काशीला होतों. दशाश्वमेध घाटाच्या शेजारींच आमचं बिन्हाड होतं. संध्याकाळीं घाटावर जाऊन बसलं कीं तिथून हलूं नयेसं वाटे. आपले बाबू कुठं रहात होते काशीला?"

"दशाश्वमेध घांटाच्या जवळपासच रहात होते. कुणातरी पंड्याच्या घरीं."

"पंड्याच्या घरीं होय? तिथला एक पंड्या आमच्या ओळखीचा झाला होता. त्याचं नांव होतं रामदास. मोठा भला माणूस! बाबू कुणाकडे रहात होते?"

त्याचा तो प्रश्न ऐकून दिवाणजी संदिग्धपणें त्याच्या चेहऱ्याकडे पाहूं लागले. त्यांचें हुक्का ओढणें बंद झालें होते. ते म्हणाले, "तें कांहीं मी विचारलं नाहीं आमच्या बाबूंना. का बरं?" ते खगेन्द्राकडे तीक्ष्ण दृष्टी लावून पहात होते.

खगेन्द्राला तें कळलें. त्यानें लगेच दुसरा विषय काढला. नंतर थोड्या वेळानें तो उठला आणि म्हणाला, "तर मग आतां येतों. आपण इथं आहां ना कांहीं दिवस?"

"हो. चार–पांच दिवस आहें. इथलं काम संपलं कीं गांवीं जाईन."

"जमलं तर भेटेन पुन्हां." खगेन्द्र म्हणाला, "याउप्पर भेट झाली नाहीं, तरी गरीबाचं काम विसरूं नका." असें म्हणून खगेन्द्र तिथून निघाला.

घरीं आल्यावर तो विचार करीत बसला. हा दिवाणजी कांहीं असातसा माणूस नव्हे. ह्याला झुलवणं शक्य नाहीं. अर्थात् आतां दुसरा मार्ग पाहिला पाहिजे असें त्याला वाटलें.

रोज संध्याकाळीं तो फिरायला बाहेर पडे. रात्रभर कुठें ना कुठेंतरी मजा मारून फार उशीरा रात्रीं घरीं येई. आज तो नित्याप्रमाणें बाहेर पडला नाहीं. एका इझीचेअरवर अंग टाकून तो डोळे मिटून विचार करीत राहिला होता.

सध्यां तो मोठ्या संकटांत होता. कलकत्त्यांत उसनवारी करण्याजोगीं जीं जीं माणसें होतीं तीं आतां संपलीं होतीं. पैसे उसने द्यायचे तर राहोतच, पण कित्येकांनीं कोर्टांत दावे मांडले होते, तर कित्येक दावा घालायची धमकी देत होते. डिक्री येऊन केव्हां सामान जप्त करून नेतील याची खात्री नव्हती. एक दोन महिन्यांत पन्नास साठ हजार रुपये तरी उभे करणें अवश्य होतें.

त्यानें कसेबसे दोन घांस खाऊन जेवण उरकलें. बिछान्यावर पडला तरी त्याला झोंप लागत नव्हती. तो सारखा तळमळत विचार करीत होता.

बारा वाजल्यावर तो ताडकन् उठला आणि दिवा पेटवून लिहायला बसला. खालील जाहिरात तयार झाली:—

## वंगसाहित्यांत युगान्तर
## अचिंत्यपूर्व, अभावनीय, स्वप्नातीत
## नवीन योजना

इतिहाससंशोधन, भ्रमणवृत्तांत, जीवनचरित्र आणि आख्यायिकांचा अपूर्व समन्वय !

## वंगीय जमीदार चरितमाला

बड्या बड्या शब्दांत आणि विशेषणांत बंगालमधील जमीदारांचीं चरित्रें या पुस्तकांतून प्रसिद्ध करण्याचें जाहीर केलें होतें. दीड हजाराहून अधिक पृष्ठें आणि सुमारें तीनशें हाफटोन चित्रें असलेलें हें पुस्तक आगाऊ नांवें नोंदविणाऱ्यास आगाऊ किंमत रोख चार रुपये पडणार असल्याचें जाहीर केलें होतें. पुढें दहा रुपये पडणार होते. खालीं पत्ता दिला होता :— कलकत्ता पब्लिशिंग कंपनी, ४५, हरिमोहन पालची गल्ली, कलकत्ता.

ही सविस्तर जाहिरात लिहिल्यावर खगेन्द्राचें तापलेलें मस्तक थोडेंसें थंड पडलें आणि तो दिवा मालवून झोंपी गेला.

सकाळींच उठून तो एका छापखान्यांत गेला आणि त्या मजकुराचीं हॅन्डबिलें जरूर छापून मिळतील काय असें त्यानें विचारलें.

प्रिन्टरनें विचारलें, " केव्हां पाहिजेत ? " तो दहा वाजतां पाहिजेत असें म्हणाला, तेव्हां प्रिन्टर म्हणाला, " दहा वाजता शक्य नाहीं, फार तर संध्याकाळीं देईन. किती हजार पाहिजेत ? " तो 'शंभर' असें म्हणाला तेव्हां प्रिन्टर त्याच्या तोंडाकडेच पहात राहिला. थोड्या वेळानें तोच म्हणाला, " हं, हं, कळलं, आधी शंभर छापून किती उपयोग होईल तें पाहणार आणि मग अधिक छापणार, असंच ना ! "

खगेन्द्र हंसला आणि म्हणाला, " अगदीं बरोबर. "

प्रिन्टर म्हणाला, " ठीक आहे. आपण अकरा वाजतां या. तोंपर्यंत प्रुफ तयार ठेवतों. तें तुम्हीं तपासून दिलं कीं लगेच तुमच्यासमोर बारा वाजेपर्यंत शंभर हँडबिलं छापून देतों. कागदासाठीं एक रुपया आधीं द्या. "

त्याला एक रुपया देऊन खगेन्द्र तेथून जो निघाला तो चितपूररोडवरच्या एका फोटोग्राफरकडे गेला. तो फोटोग्राफर त्याच्या ओळखीचा होता. त्याला

तो म्हणाला, "असं पहा भुवन, जरा कलकत्त्याबाहेर जायचं आहे — आज संध्याकाळच्या गाडीनं. रीतसर दक्षिणा मिळेल. एका जमीदाराचा फोटो काढायचा आणि त्याला विचारून त्याचं जीवनचरित्र लिहून आणायचं."

"ही काय आहे भानगड ?" भुवननें विचारलें.

"आतां काय म्हणावं तुला ! साऱ्या कलकत्त्यांत खळबळ उडालीय. वंगीय जमीदार चरितमाला मी छापतोंय तें कळलं नाहीं तुला ?"

"असं का ? असलीं बुकं संपतील का ?"

"आतां काय म्हणावं तुला ? इतक्यांत सहासातशें पुस्तकांच्या आर्डरी देखील मिळाल्या आहेत. जमीदारच ते ! कुणी दहा, तर कुणी वीस, तर कुणी पन्नास कॉपींची देखील ऑर्डर दिली आहे."

भुवन हंसला आणि म्हणाला, "छान क्लृप्ति काढलीस बुवा. बरं, मी कुठं जायला हवं ?"

"बाशुलीपाड्याला."

"आहे कुठं हें गांव ?"

खगेन्द्रानें त्या गांवीं कसें जायचें त्याची सर्व माहिती भुवनला दिली. तिथल्या जमीदाराचा वृत्तान्तही थोडक्यांत सांगितला. तो म्हणाला, "तूं उद्यां तिथं जाऊन पोहोंचशील. तिथं फार वेळ काढूं नको. शक्य तितक्या लवकर काम उरकून ये. त्या जमीदाराचा एक म्हातारा दिवाण आहे. तो मोठा धडीबाज आहे. तो तिथं गेला तर सारं काम फुकट जाईल. तो दिवाण इथं कलकत्त्यांत आहे तोंवर प्रयत्न केलास तर पंचवीस कॉप्यांची ऑर्डर सहज मिळेल. तो दिवाण तिथं जाऊन पोंचला तर एकसुद्धां कॉपी खपायची नाहीं."

"आतां कळलं. बरं, आतां असं सांगा, काय काय विचारायचं आणि काय लिहून आणायचं ?"

खगेन्द्र म्हणाला, "मीं हँडबिलं छापून घेतलीं आहेत. एक वाजतां तीं तुला मी आणून देईन. आधीं त्यांचे निरनिराळ्या पोझेसमधले चार पांच फोटो घ्यायचे. मग हँडबिलच्या अनुरोधानं त्याच्या जीवनचरितासंबंधीं माहिती मिळवायची –" ही माहिती कशी मिळवायची तें सांगून झाल्यावर खगेन्द्र म्हणाला, "— आणखी एक महत्त्वाची गोष्ट. कांहीं झालं तरी माझ्या नांवाचा उल्लेख करायचा नाहीं. कोण कोण या कामांत संबंधीं आहेत असं त्यांनीं विचारलं, तर काय वाटेल तें सांग, पण माझं नांव सांगूं नकोस."

" आतां कळलं. "

" माझं हें काम जर योग्य रीतीनं बजावलंस तर जी फी द्यायची ती देईनच, पण त्यावर तुला खूष होण्याइतकी बक्षिसी देईन. आज संध्याकाळच्या गाडीनं जायचं ठरलं ना ? "

" ठरलं. "

" तर हे घे खर्चाचे पैसे आणि हे थोडेसे फीचे पैसे — " असें म्हणून खगेन्द्रानें भुवनच्या हातांत कांहीं नोटा दिल्या.

चौथ्या दिवशीं भुवन जो आला तो सरळ स्टेशनवरून खगेन्द्राच्या बिऱ्हाडीं गेला. तो खगेन्द्राला म्हणाला, " फार चांगल्या जागीं पाठवलंत मला महाराज ! "

" कां ? काय झालं ? "

" कांहींसुद्धां झालं नाहीं. पहिल्या दोन दिवसांत तर बाबूंची भेटच झाली नाहीं. जेव्हां केव्हां विचारावं तेव्हां सांगत, कीं बाबू आहेत अंतर्गृहांत. शेवटीं काल एकदांची त्यांची भेट झाली. मी आधींच हँडबिलं त्यांच्याकडे पाठवून दिलीं होतीं. "

" मग काय म्हणाले ते ? "

" ते म्हणाले, कीं ही सगळी तुम्हां लोकांची लफंगेगिरी आहे. तिकडे एवढे बडे बडे राजे आणि जमीदार असतांना माझ्याकडे कशाला आलांत ? फोटो छापायचे असतील, जीवनचरित्र लिहायचं असेल तर बड्या बड्या राजा-महाराजांपाशीं जा. तिकडे वर्धमान आहे, कुचबिहार आहे, नाटोर आहे, काशीमबझार, दीघापतियाला जा. मी फोटोही काढूं देणार नाहीं कीं जीवन-चरित्रही सांगणार नाहीं. "

या उत्तरावरून खगेंद्राला निश्चितपणें वाटलें, कीं हा भवेंद्र म्हणजे खास तोतया आहे.

त्याच दिवशीं तिसऱ्या प्रहरीं तो दिवाणजीपाशीं गेला आणि म्हणाला, " उन्हाळ्याच्या सुट्टीमुळं शाळा बंद आहे. कनक भेटली, त्याला बरेच दिवस झाले. आपली अनुमती असली तर मी आपल्याबरोबर बाशुलीपाड्याला येतों. "

दिवाणजी म्हणाले, " येणार आहां होय ? ठीक आहे. मी परवां जाणार आहें. चला माझ्याबरोबर. "

ठरल्या दिवशीं खगेंद्र दिवाणजीबरोबर बाशुलीपाड्याला जाऊन पोंचला.

# : २ :

खगेंद्र ज्यावेळीं बाशुलीपाड्याला पोंचला, त्यावेळीं संध्याकाळ झाली होती. पूर्वी बैठकखान्याच्या ज्या खोलींत तो रहात होता, त्याच खोलींत त्यानें आपलें सामानसुमान ठेवलें. एक नोकर हातपाय धुण्यासाठीं पाणी घेऊन आला. अंतःपुरांतून थाळी भरून फराळाचें सामान आलें.

फराळ उरकून खगेंद्र कचेरीच्या ओटीवर एका बांकावर मुकाट्यानें बसून राहिला होता. कनकला भेटण्यासाठीं तो फार उतावीळ झाला होता, पण आंत वर्दी कुणी द्यायची आणि भेटीची व्यवस्था कशी व्हायची, याचीच त्याला पंचाईत पडली होती. बाबूंची भेट घेऊन दिवाणजी आपल्या घरीं निघून गेले होते. त्यानें विचारलें तेव्हां त्याला असें सांगण्यांत आलें, कीं आज ते येणार नाहींत, उद्यां सकाळीं त्याची भेट होईल.

ओटीवर एकटाच बसून खगेन्द्र कंटाळला. तो उठला आणि ओटीवर येरझारा घालूं लागला. आज शुक्लचतुर्दशी होती, तरीही आकाशांत थोडे थोडे ढग जमा झाले होते आणि त्यामुळें चन्द्राचा प्रकाश अंधुक झाला होता. एकदां जाऊन गावांत चक्कर मारून यावें असें त्याला वाटलें, पण वाटेंत दोन्ही बाजूला दाट जंगल होतें, खेडेगांवांत साप किरडवांचें भय, त्यामुळें शहरवासी असलेल्या खगेन्द्राला एकटें जाण्याचें धैर्य झालें नाहीं.

येरझारा घालून थकल्यावर तो पुन्हां बांकावर बसला. तो आपल्याशींच विचार करीत होता. सुरबाला तिथें आली ती नदींतून वहात आली होती, बागेंत अचानक भवेन्द्राला पाहिल्यामुळें तिच्या मनावर परिणाम झाला होता, जेवायला बसलेल्या भवेन्द्राला ती आड राहून सारखी टक लावून पहात होती, त्यानंतर कनकलतेबरोबर झालेलें तिचें संभाषण वगैरे सर्व हकिकती कनकच्या पत्रावरून त्याला कळल्या होत्या.

या साऱ्या गोष्टी त्यानें पुन्हां पुन्हां ताडून पाहिल्या, त्यावेळीं निश्चित् त्याला वाटलें, कीं सुरबाला जी नदींतून वहात आली ती सहजासहजीं घडलेली घटना नव्हे. आज जो आपल्याला भवेन्द्र म्हणून म्हणवतो आहे तो आणि ती यांनीं केलेल्या कटांतला तो एक भाग असला पाहिजे. भवेन्द्र हा कोण याचा पत्ता लावणें जर कठीण गेलें तर सुरबालेचा पत्ता आधीं

लावला पाहिजे. तो पत्ता लागला म्हणजे भवेन्द्राच्या या कटावर आपोआप प्रकाश पडेल, म्हणूनच यावेळीं कनकची भेट होणें फार जरूरीचें होतें. तो सुयोग जमून येत नाहीं असें पाहून खगेन्द्र अत्यंत अस्वस्थ झाला होता.

खगेन्द्र जिथें बसला होता, तिथून जवळच कचेरी होती. तिथें दोन–चार माणसें बसून गप्पागोष्टी करीत आहेत असें त्याला दिसलें. त्यांच्यापाशीं जाऊन त्यांच्याबरोबर गप्पागोष्टी करण्यांत त्यानें थोडा वेळ घालवला. अशा प्रकारें कांहींसुद्धां काम न होतां त्याचा तो दिवस फुकट गेला.

रात्रीं जेवण उरकून खगेन्द्र पुन्हां बैठकखान्यांत आला, त्यावेळीं नोकरांची गडबड सुरू होती. कुणी जिन्यावर दिवा लावीत होते, कुणी धाईघाईनें वर माडीवर जात होते, तर कुणी तसेच खालीं उतरत होते. बाबूंच्या झोपण्याची व्यवस्था करण्याची ही गडबड चालली असावी असें खगेन्द्राला वाटलें.

थोड्या वेळानें हातीं कंदिल घेतलेला नोकर अन्तःपुरांतून येत असलेला दिसला. त्याच्या मागोमाग कुणीतरी व्यक्ति येत होती. नोकर आपआपसांत बोलत होते, कीं हुजूर येत आहेत.

राखाल ओटीवर पोंचला तेव्हां खगेन्द्र अदबीनें उठून उभा राहिला. तो जवळ आला तेव्हां खालीं मान वाकवून त्यानें बाबूंना नमस्कार केला.

राखालनें विचारलें, “ कोण आपण ? ”

नोकरानें कंदिल वर करून दाखवला. तेव्हां राखालला दिसून आलें, कीं हा माणूस अत्यंत देखणा होता.

खगेन्द्रानें आपलें नांव सांगितलें.

राखाल आश्चर्यचकित होऊन त्याच्याकडे पहात राहिला. तो म्हणाला, “ दिवाणजींबरोबर कलकत्त्याहून तुम्हींच का आलांत ? ”

“ जी होय —माझी बहीण— ”

राखाल मध्येंच म्हणाला, “ मला माहित आहे. आपलं जेवण झालं का ? ”

“ जी होय. ”

एका नोकराकडे पाहून तो म्हणाला, “ बाबूंच्या बिछान्याची वगैरे व्यवस्था केलीस का ? ”

नोकर म्हणाला, “ जी हुजूर. ”

“ कुठं केलीस ? ”

"हे बाबू पूर्वीं एकदां आले होते. त्यावेळीं जिथं झोंपत होते, तिथंच त्यांचीं झोंपायची व्यवस्था केली आहे."

राखाल म्हणाला, "ठीक आहे!" त्यानें खगेन्द्राला विचारलें, "इथं आपली कांहीं गैरसोय झाली नाहीं ना?" खगेन्द्राला उत्तर द्यायला वेळ न देतां राखालनें कंदिलवाल्या नोकराला पुढें व्हायला सांगितलें. त्याच्यामागें निघत तो म्हणाला, "चल, पाहूं कशी काय व्यवस्था केली आहे ती!"

खगेन्द्राला आश्चर्य वाटलें. आपल्या बाबतींत तो इतकी कळकळ दाखवील अशी त्याची अपेक्षा नव्हती. आपण नमस्कार केला तर उलट नमस्कार सुद्धां न करतां तो मुकाट्यानें जिना चढून जाईल असें त्याला वाटलें होतें. महिना पन्नास रुपये पगारावर शाळा मास्तरची नोकरी करणाऱ्या माणसाच्या जेवणा-खाण्याची आणि रहाण्याझोंपण्याची सोय गैरसोय, वर्षाला लाख रुपये उत्पन्न असलेला हा माणूस इतक्या कळकळीनें पाहील असें खगेन्द्राला मुळींच वाटलें नव्हतें. तो सुन्न होऊन बाबूच्या मागोमाग आपल्या झोंपायच्या खोलींत आला.

खोलींत येतांच राखालनें चोंहीकडे नजर फेंकली बिछान्याकडे पाहून तो म्हणाला, "ही जुनी मच्छरदाणी कां लावलीस इथं? दुसरी नवी नव्हती का?"

नोकर म्हणाला, "उद्यां बदलतों, हुजूर."

"आणि इथं एक कळशी पाणी कां ठेवलं नाहींस? हे उन्हाळ्याचे दिवस—रात्रीं जर तहान लागली, तर घोटभर पाण्यासाठीं यांनीं कुठें कुणाला शोधायला जावं? जा. एक कळशी चांगलं पाणी अन् एक ग्लास इथें ठेवून जा. अन असं पहा, ही खाट जरा या बाजूला सरकवून घे. दोन खिडक्यांच्या मध्यें खाट आली, कीं वारा चांगला येईल—उकाडा होतोय ना!"

नोकरानें हुकुमाप्रमाणें खाट सरकवून घेतली. दोन्ही बाजूच्या खिडक्या उघडून ठेवल्या.

ती सर्व व्यवस्था झाल्यावर राखाल म्हणाला, "आतां आपण विश्रांति घ्या. रात्र फार झाली आहे." असें म्हणून तो निघून गेला.

बाबू निघून गेल्यावर खगेन्द्र बराच वेळपर्यंत माथ्यावर हात घेऊन खाटे-वर बसून राहिला होता. तो विचार करीत होता, "बाबूंनीं आपल्याबद्दल

एवढी कळकळ कां दाखवली ? याच्या मनांत कांहींतरी संशय तर आलेला नाहीं ? मी कोणत्या उद्देशानं आलों आहें, याचा याला अंदाज तर आला नाहीं? त्यानें माझी चौकशी केली, – मी उत्तर देतों न देतों तोंच तो म्हणाला, कीं मला माहीत आहे ! मी पूर्वी आलों होतों तेव्हां याच खोलींत झोंपत होतों असं नोकरानीं सांगितलं त्यावेळींही तो म्हणाला, कीं मला माहीत आहे. एवढ्या मोठ्या जमीदाराचें हें पाहुणेघर. रोज किती लोक येत असतील आणि किती जात असतील, कुठल्या खोलींत कोण झोंपत होता याची खबर मालकानें राखणें हें एक प्रकारें अस्वाभाविक नव्हे का ? याला जर कांहीं संशय आला असेल, तर तो मला सुखासुखी सोडायचा नाहीं ! वेळीं माझा जीव घ्यायला-सुद्धां कमी करायचा नाहीं."

त्याच्या बिछान्याच्या दोन्ही बाजूला असलेल्या उंच्यापुऱ्या खिडक्यांकडे त्याचें लक्ष गेलें. आकाश मोकळें झालें होतें. सुंदर चांदणें पडलें होतें. एका बाजूच्या खिडकींतून दरड वाढलेली पडकी जमीन दिसत होती. त्याच्याच पलीकडे दोन तीन कळकीचीं झाडें दिसत होतीं. वाऱ्याबरोबर तीं हालत होतीं आणि कळकीच्या पानांचा चमत्कारिक आवाज होत होता.

दुसऱ्या बाजूच्या खिडकीच्या बाहेर चार–पांच हाताच्या अंतरावर जंगल होतें. कसलीं तरी दोन–चार जंगली झाडें वाऱ्याबरोबर एकमेकावर घांसत होतीं. त्यांच्यामागें खूप उंच वृक्ष होते. ते कोणते होते ते अंधुक प्रकाशामुळें सांगतां येत नव्हतें. त्याच बाजूनें रातकिड्यांचा आवाज सारखा होत असलेला ऐकूं येत होता. कसला तरी चमत्कारिक वास येत होता. तो खेड्यांत राहिलेला नसल्यामुळें तो वास भेतुफुलाचा होता हें त्याला कळलें नाहीं.

त्या बाजूला पाहतांच खगेन्द्राच्या मनांत भीतीचा उद्रेक झाला. त्याला वाटलें, 'भर मध्यान्ह रात्रीं आपल्याला झोंप लागली आणि या जंगलांतून बाबूंच्या मर्जीतले कुणीतरी महार मांग जर हातांत कोयती घेऊन आले, आणि खिडकीच्या गरादींतून हात घालून त्यानीं कोयती चालवून जर आपलं डोकं कापलं ? —'

ही कल्पना मनांत येतांच खगेन्द्राच्या सर्वांगावर शहारे उभे राहिले.

तो एकटा होता. वेळ रात्रीची होती. त्याचें मन पापी होतें. त्याच्या मनांत शंकेवर शंका उद्भवूं लागल्या. त्याला वाटलें, 'मी नको म्हटलें होतें

तरीही भुवन फोटोग्राफरनें आपलें नांव तर सांगितलें नसेल? कदाचित् दिवाणजीही बोलले असतील—म्हणाले असतील कीं हा माणूस तुमच्या बाबतींत उगाच बारीक सारीक गोष्टी विचारीत होता म्हणून!—मग मात्र धडगत नाहीं. गुपचूप माझा खून करायची तयारी केली असेल खास. तो जो आला होता, तो नुसती माझी झोंपायची व्यवस्था कशी झाली हें पाहण्यासाठीं नव्हे—माझी गैरसोय दूर करण्यासाठीं नव्हे—त्यानें खाट हलवायला सांगितली ती मला वारा लागावा म्हणून नव्हे—खिडकीच्या समोर खाट आली कीं कोयती चालवायला सोपी होईल हाच असावा त्याचा डाव.'

तो अत्यंत भयभीत झाला. त्याच्या अंगांतून घामाच्या धारा वाहूं लागल्या.

बसल्या बसल्या खगेन्द्र विचार करीत होता—आतां काय करावें? दरवाजा उघडून हळूच बाहेर पळून जावें का?—पुन्हां त्याला वाटलें, जर माझा खून करावयाचाच बेत असेल तर मग माझ्यावर पहाराही ठेवला असेल. मी पळतो आहें असें पाहून कुणीतरी मागून लाठी मारून माझें टाळकें तर फोडणार नाहीं?

त्याला वाटलें, पळायचेंच असेल तर तें उद्यां दिवसा उजेडीं—यावेळीं नव्हे.

खूप विचार करून त्यानें दोन्ही खिडक्या बंद करून घेतल्या. त्यानें दिवा घेऊन पाहिलें, खिडकीचीं दारें मजबूत होतीं. कडीकोयंडेही मजबूत होते. बंद केलेलें दारही त्यानें दिवा घेऊन पाहिलें, त्याचेही कडीकोयंडे आणि अर्गळा मजबूत होत्या. बाहेरून कुणालाही तें दार सहसा फोडतां आलें नसतें.

दार बंद करून घेऊन खगेन्द्र मच्छरदाणींत शिरला. तो झोंपला नाहीं. बिछान्यावर बसून राहिला. झांकलेल्या खोलींत ज्येष्ठ महिन्याचा उकाडा असह्य होत होता. चटकन् झोंप येण्याचा संभव नव्हता. तो हातपंखा घेऊन वारा घेत घेत, पेंगत पेंगत, केव्हां आडवा होत तर केव्हां बसत राहिला होता. कचेरींतल्या घड्याळांतले बारा, एक, दोन आणि तीन वाजलेले त्यानें ऐकले.

त्यानंतर त्याला झोंप लागली. पण तीही फार वेळ नव्हे. कसलें तरी भयंकर स्वप्न पाहून तो एकदम जागा झाला.

बाहेर कावळे ओरडूं लागले होते. खिडकीच्या फटींतून सकाळचा उजेड आंत खोलींत पडत होता.

सात वाजायच्या सुमाराला दिवाणजी आले, त्यावेळीं खगेंद्रानें त्यांच्याकडे आपल्या बहिणीला भेटण्याची इच्छा प्रदर्शित केली.

दिवाणजी म्हणाले, " थांबा. मी आतां तीच व्यवस्था करतों."

सुमारें एक तासानें अंतःपुरांतली दासी आली आणि खगेंद्राला घेऊन आंत गेली. तो एका खोलींत गेला. तिथें एक खुर्ची होती. त्या खुर्चीच्या शेजारीं कनक उभी होती. ती हंसत हंसत म्हणाली, " यावं, यावं – बसावं."

तशाच हंसतमुखानें कनकनें त्याला अभिवादन केलें. त्यानंतर त्याला पोंचवायला आलेली दासी निघून गेली.

खगेंद्र तिच्याजवळ जाऊन हळूच म्हणाला, " गृहस्थाच्या घरीं रहातां रहातां आपलं अभिनयकौशल्य विसरलीस वाटतं ?"

उगीच थोडेसें हंसून कनक म्हणाली, " असं कां म्हणतां ?"

" मी तुझा दादा — किती झालं तरी वडील माणूस — इतक्या दिवसांनीं भेट झाली, पण तूं मला प्रणाम केला नाहींस ! त्या दासीला काय वाटलं असेल ?"

कनक तशीच हंसली आणि म्हणाली, " तिला वाटलं असेल, कीं कलकत्त्याच्या लोकांची रीत ही अशीच. वरिष्ठ-कनिष्ठांचीं नातीं नाहींशींच झालीं आहेत त्यांच्या आचारांतून, असं फार तर ती म्हणेल ! — आतां बसा." असें म्हणून तिनें खुर्ची पुढें लोटली.

जवळच सतरंजी अंथरलेला एक चौफाळा होता. कनक त्याच्या एका कोपऱ्याला बसून म्हणाली, " आतां मला आणखी किती दिवस इथं डांबून ठेवणार आहां ? माझा जीव अगदीं मेटाकुटीला आलाय."

" असं कां म्हणतेस ? इथं तुला कांहीं त्रास होतो का ?"

उघड्या असलेल्या दाराकडे कनकनें एकदां नजर फेंकली आणि अभिनयाच्या पोजमध्यें ती म्हणाली, " स्वाधीनता ! स्वाधीनता नाहीं तर या हीनतेच्या परिस्थितींत कोण जगून राहील हो, कोण जगून राहील ?"

खगेन्द्रही दचकला. एकदां दाराकडे पाहून घेऊन तो घाईघाईनें म्हणाला, " पुरे झालं — पुरे झालं ! खास तूं अभिनय विसरली नाहींस. अजूनही तुझी कला जिवंत आहे."

गाणाऱ्या बाईजीच्या ढंगांत खगेन्द्राला सलाम करीत ती म्हणाली, " उस्तादजी, आपही का कुदरत ! "

त्यानंतर कांहीं वेळपर्यंत इकडल्या तिकडल्या गोष्टी झाल्यावर खगेन्द्र कांहीं वेळ उगीच बसला.

कनक म्हणाली, " विचार कसला करतांदा ? "

" नाहीं — तसं कांहीं नाहीं ! — तुझ्या राणीची खबर सांग ना. "

" माझी राणी तर मशगुल होऊन राहिली आहे. "

" ती कशी काय ? "

" कशी काय म्हणजे काय ? माणूस नव्या प्रेमांत पडलं म्हणजे त्याला जसं होतं, तसं झालंय तिला. "

" तरीपण मी ऐकलं कीं तीं दोघंही तशी कांहीं एकांतांत असत नाहींत म्हणे ! "

" रात्रीं नाहीं — पण दिवस तर आहे ? गेल्या दोन दिवसांत मी पाहतें आहें, तिसऱ्या प्रहरापासून संध्याकाळपर्यंत — अगदीं चांदणं पडेपर्यंत दोघेंही अंतर्गृहाच्या बागेंत जोडीनं फिरत असतात. "

खगेन्द्र म्हणाला, " मग त्यांत बिघडलं काय ? "

" नाहीं. तसं कांहीं बिघडलं नाहीं — पण आपण अगदीं जिमल्या चाटीत होतां, ते आतां हताश झालांत. या आशेची निराशा झाल्याचं एकादं वर्णन लिहून टाका पाहूं. " असें म्हणून ती अभिनयाच्या आवेशांत वर पाहून बोलूं लागली, " अरे हे दुष्ट दुर्दैवा ! काय केलंस हे खगेन्द्रदादाचं ? कुणाची संपत्ति कुणाला दिलीस ? कां मिळाली नाहीं ती त्याला ? " तिनें चेहऱ्यावर करुणेची छाया आणून नजर खालीं केली आणि डोळ्याला पदर लावून ती काल्पनिक अश्रु पुसूं लागली.

खगेन्द्र म्हणाला, " आतां राहूं दे तुझं हें नाटक. आपण आतां मुद्याची गोष्ट बोलूं या. हा माणूस कोण याचा पत्ता लागला आहे का तुला ? "

" मला कसा पत्ता लागेल ? मी काय डिटेक्टिव्ह आहें ? "

" यापूर्वीं तो कुठं होता तें कांहीं आलं नाहीं का तुझ्या कानीं ? "

" पश्चिम देशांतल्या कुठल्या तरी एका देशाचा तो महन्त होता. "

" नांव काय त्या मठाचं ? कुठं आहे तो मठ ? "

" तें मला कसं कळेल-सांगा बरं ?"

" राणीबरोबर आतां तो सारख्या गप्पागोष्टी करीत असतो ना? इतक्यांत त्यानं कांहींतरी सांगितलं असलं पाहिजे तिला. राणीकडून एवढी गोष्ट सहज बोलतां बोलतां काढून घेतां येत नाहीं का तुला ? कुठल्याशा मठांत तो महन्त होता हें तरी तुला कसं कळलं ?"

" काशीहून त्यानं दिवाणजीला हें पहिलं पत्र लिहिलं त्यांत तसं लिहिलं होतं. तें पत्र दिवाणजींनीं थोरल्या राणीसाहेबांना वाचून दाखवलं होतं."

" त्या पत्रांत मठाचं नांव नव्हतं का लिहिलं ?"

" तें पत्र कांहीं माझ्यासमोर वाचून दाखवलं नाहीं. थोरल्या राणीसाहेब म्हणत होत्या, कीं मठांतली महन्तगिरी सोडून तो काशीला येऊन राहिला आहे."

" कुठं आहे तें पत्र ? दिवाणजींनीं तें पत्र राणीसाहेबांकडे दिलंय का ?"

" तें कांहीं सांगतां येत नाहीं."

" थोरल्या राणीसाहेब कुठल्या खोलींत झोंपतात ? तिथं त्यांची पेटीबिटी आहे का ?"

कनक हंसून म्हणाली, " म्हणजे मला काय चोरी करायला लावणार आहां वाटतं ?"

" पहा ना एकदां प्रयत्न करून."

" पकडलं मला तर सोडवणार कोण ? * रोहिणीच्या गोविंदलालसारखा कोण आहे माझा पाठिराखा ? मला तुरुंगांत पाठवतील ना ?"

खगेन्द्र हंसला आणि म्हणाला, " गोविंदलाल तर तुझ्या हातापाशींच आहे! राजासारखं एवढं ऐश्वर्य — सालीना लाख रुपयांचं उत्पन्न — तुझ्यासारखी एखादी रोहिणी मिळाली तर कल्याण होईल त्याचं ! — तें सध्यां राहूं दे. आतां असं सांग, कीं या तोतया भवेन्द्राशीं मुरबालेची पूर्वीपासूनची ओळख आहे, अशी खात्री आहे का तुझी ? अजूनही तुला तसं वाटतं का ?"

" एवढ्या बाबतींत माझी अगदीं खात्री आहे."

* बंकिमचंद्रांच्या 'कृष्णकान्ताचें मृत्युपत्र' या कादंबरीतील एका प्रसंगाला अनुसरून

"तर मग मी तुला सांगतों," खगेन्द्र म्हणाला, "हें कारस्थान या दोघांचं आहे. असल्या बड्या कारस्थानाला हात घालणारा माणूस केव्हांही एकटा यायचा नाहीं. अन्तःपुरांत त्याचा एकादा हेर असणं अगदीं अवश्य आहे. तो हेर म्हणजे सुरबाला."

कनक म्हणाली, "तर मग बागेंत त्या दिवशीं तिनं बाबूंना प्रथमच पाहिलं त्यावेळीं ती अशी दचकली कां? अनपेक्षित किंवा अकल्पित एकादी गोष्ट घडली तरच एकादं माणूस दचकतं ना?"

खगेन्द्र म्हणाला, "मला देखील पहिल्यानं असंच वाटलं होतं, पण या गोष्टीवर मीं फार विचार केला. त्यावरून मी एक निश्चित अनुमान काढलंय."

"काय काढलंय अनुमान?"

"ज्यावेळीं या दोघांनीं कारस्थान रचलं, त्यावेळीं हा माणूस संन्याशाच्या वेषांत इथं यायचा असं बहुधा ठरलेलं नसावं. साधारणपणें तो आला असता म्हणजे गृहस्थमाणसाच्या वेषांत आला असता तर फार तर त्यानं असं म्हटलं असतं, कीं मी पूर्वी संन्यासी होतों, आतां तो पेशा टाकून मी पुन्हां घरीं आलोंय. मूळ असं ठरलेलं असावं. असं हें ठरल्यानंतर सुरबाला होडींतून आली असावी. तुमच्या बागेमागल्या घाटाशीं आल्यानंतर पाण्यांत बुडी मारून मूर्च्छित झाल्याचं ढोंग करून ती घाटावर पडली असावी. त्यानंतर दोन महिन्यांनीं हा भवेन्द्र बनून आला. सुरबाला निघून गेल्यावर त्याला कदाचित् असं वाटलं असेल, कीं आपण संन्याशाच्या वेषांत जावं हेंच बरं. पांच सहा महिने जप तप, ब्रह्मचर्य यांचं अवडंबर माजवून दाखवलं कीं मग कुणाला संशय यायचा नाहीं. म्हणून मी म्हणतों, कीं सुरबाला जी दचकली ती नुसती भवेन्द्राला पाहिल्यामुळें नाहीं—त्याला संन्याशाच्या वेषांत पाहिल्यामुळं."

खगेन्द्राचें निवेदन संपलें. कनक थोडा वेळ गालावर हात देऊन विचार करीत बसली होती. शेवटीं ती म्हणाली, "तुमच्या म्हणण्यांत कांहीं तथ्य दिसतं खरं."

खगेन्द्र म्हणाला, "आतां तूं बोलतां बोलतां युक्तिप्रयुक्तीनं सुरबालेचा पूर्वीचा पत्ता काढून आणलास—"

"तर तुमचं काम होईल का?" कनक त्याचें वाक्य अर्धे तोडून म्हणाली.

"अगदीं निश्चित! दोघां कटवाल्यांपैकीं एका माणसाचा खरा इतिहास जर कळून आला, तर दुसऱ्याचा थांगपत्ता लागणं कठीण जायचं नाहीं."

तें ऐकून कनक जरा उत्तेजित होऊन म्हणाली, "एवढंच जर असेल तर मग मी ही तुमचो कामगिरी पार पाडूं शकेन."

"ती कशी काय?"

"सुरबालेचं माहेर कुठं आहे तें मला माहीत आहे."

"कुठं आहे? कुठं आहे? कसं कळलं तुला?"

"एक दिवस ती बोलतां बोलतां सहज बोलून गेली — लहानपणीं आमच्या वसन्तपुरांत मी पाहिलंय — एवढंच बोलून तिनं पुढं सावरून घेतलं."

"तिथं तिचं माहेर आहे कीं सासर आहे हें कसं कळलं तुला?"

"ती म्हणाली होती — लहानपणीं."

खगेन्द्रच्या कपाळाला आंठ्या पडल्या. क्षणभर विचार करून तो म्हणाला, "हां — माहेर असणं शक्य आहे — आणि सासर असलं तरीदेखील कांहीं हरकत नाहीं. हें वसन्तपूर कुठं आहे त्याचा अंदाज आला आहे का तुला?"

"तिच्या बोलण्याचालण्यावरून ती वर्धमान जिल्ह्यांतली असावी असं मला वाटतं. वर्धमान जिल्ह्यांतल्या लोकांच्या बोलण्यांतल्या ज्या कांहीं लकबा आहेत त्या तिच्या ठायीं पुरेपूर आहेत —" असें म्हणून कनक हसूं लागली.

खगेन्द्र एक मिनिटभर विचार करीत राहिला होता. त्यानंतर तो उठला. हंसत हंसत त्यानें कनकच्या पाठीवर हळूच एक चापट मारली आणि म्हटलें, "शाबास कनक! शाबास! या काळोखांतून रस्ता दिसला एकदांचा."

"आतां काय करणार आहां?"

"आजच मी कलकत्त्याला जाणार आहें. पोस्ट ऑफिसमध्यें जाऊन तिथं गाईडमधून वसन्तपूर कुठं आहे तें शोधून काढीन. त्यानंतर गुपचुप त्या गांवीं जाऊन तिचा पत्ता काढायच्या कामाला लागेन."

"पण तिचं खरं नांव सुरबाला नव्हे हें मात्र ध्यानांत ठेवा हं."

"तें नको ग सांगायला मला! मी आतां असं करणार, कीं त्या गांवची कुठली बाई चैत्र महिन्याच्या पूर्वी होती आणि चैत्र महिन्यानंतर नाहींशी झाली त्याचा पत्ता काढला, कीं सारं कांहीं हळूहळू कळून येईल मला."

कनक म्हणाली, “ तें खरं आहे. पण समजा, ती त्या गांवांतून पांचसात वर्षांपूर्वी कुठंतरी दुसऱ्या गांवीं गेली होती–अन् इथं आली ती दुसऱ्या कुठल्या तरी गांवांतून — समजा, कलकत्ता किंवा कृष्णनगर — मग ? ”

खगेन्द्र मोठ्या पेंचांत पडला. क्षणभर डोकें धरून तो स्वस्थ बसला होता. नंतर तो म्हणाला, “ मग मात्र मोठी मुष्किल आहे खरी. बरं, मी तुला असं विचारतों, जी साडी नेसून ती वद्यात आली होती ती साडी कुठं आहे का ? ”

“ आहे. कां ? ”

“ ती साडी मला देशील का आणून ? ”

“ ती साडी काल तिच्या खोलींत मीं दांडीवर पाहिली होती. ”

“ कांहीतरी निमित्त करून तेवढी ती साडी मला देशील का आणून ? ”

“ काय करणार आहां ती साडी घेऊन ? ”

“ वसन्तपूरच्या धोब्याला ती साडी दाखवली तर ती कुणाची तें तो सांगू शकेल. तेवढी साडी मला हवीच हवी. ”

“ मी कशी मागूं ती साडी. मी आहें ‘ विधवा. ’ सवाष्णबाईची कांठ-वाली साडी कोणतं कारण सांगून मागूं ? ”

“ तर मग असं कर, ती मला नुसती आणून दाखव. ”

“ हां. तेवढं मात्र करतां येईल मला. ” असें म्हणून कनक तिथून निघून गेली. थोड्या वेळानें तिनें ती साडी पदराखालीं लपवून आणून त्याच्या हातीं दिली.

खगेन्द्रनें साडीचे चारही कोपरे नीट निरखून पाहून घेतले. त्या साडीच्या एका कोपऱ्याला धोब्याची खूण होती. त्यानें खिशांतून चाकू काढला आणि तेवढा तुकडा त्यानें चटकन् काढून घेतला.

“ हें काय केलंत ? ” कनक ओरडली.

तिला कांहींच उत्तर न देतां खगेन्द्रनें कापलेला तुकडा आपल्या खिशांत ठेवून दिला. त्यानंतर त्यानें साडीचा कापलेला तेवढा भाग बोटानें ओढून ताणून त्याचीं सुतें बाहेर काढलीं.

तो म्हणाला, “ आतां ही कापल्यासारखी दिसायची नाहीं — आतां जा, ही साडी होती तिथं नेऊन ठेव. मी आतां जातों. संध्याकाळच्या पूर्वी मला इथून निघालं पाहिजे. ”

" आजच चाललांत ? "

" हो — आजच. "

" मला आतां इथं किती दिवस राह्यला हवं ? "

" फार तर दोन महिने. एवढ्या मुदतींत या तोतया भवेन्द्राचं जर सारं नाडीनक्षत्र हुडकून काढलं नाहीं तर माझं नांव खगेन्द्रच नव्हे ! "

त्यानें खिशांतून कांहीं नोटा काढल्या आणि त्या तिच्या हातीं देत तो म्हणाला, " हा घे तुझा दोन महिन्यांचा पगार. आणखी दोन महिने वाट पाहा — तितक्यांत आमचं काम फत्ते होईल. "

दुसऱ्या दिवशीं तो कलकत्त्याला जाऊन पोंचला. पोस्टांत जाऊन त्यानें तपास केला तेव्हां त्याला कळून आलें, कीं वर्धमान जिल्ह्यांत एक, छाप्रा जिल्ह्यांत एक आणि पूर्णिया जिल्ह्यांत एक अशी वसन्तपूर नांवाचीं तीन गांवें आहेत. दुसऱ्याच दिवशीं मनाचा निश्चय करून वर्धमान जिल्ह्यांतल्या वसन्तपुरांत तो जाऊन पोंचला.

: ३ :

वसन्तपुरचें पोस्ट ऑफिस बाजारच्या अगदीं मध्यभागीं होतें. त्यावेळीं एक वाजला होता. आकाश ढगाळलें होतें. वारा बंद असल्या-मुळें उकाड्यानें जीव कासावीस होत होता.

टपाल येण्याची वेळ झाली होती. बाहेरच्या बांकावर बसून पोस्ट मास्तर टपालाची वाट पहात होता. टपाल येतांच तें उघडून पत्रें पोस्टमनच्या हातीं देऊन एकदां केव्हां घरीं जातों असें त्याला झालें होतें.

नेमारी स्टेशनवरून टांग्यानें टपाल येत असे. त्या टांग्यांत चार उतारू बसायची सोय होती. पोस्टाच्या खिडकींतून आंतलें घड्याळ दिसत होतें. एक वाजून दहा मिनिटें झालीं, पंधरा मिनिटें झालीं, तरी टपालच्या टांग्याचा पत्ता नव्हता. पोस्टमास्तर आंत गेला आणि पुन्हां पुन्हां घड्याळाकडे पाहूं लागला. टेबलावर पडलेलें व्ही. पी. चें रजिस्टर घेऊन तो वारा घेत होता, जांभया देत होता मधून मधून पेंगत होता.

हळुहळु उकाडा वाढत होता. तितक्यांत दीड वाजला. खडावाचा खट्खट् आवाज झाल्यामुळें मास्तरनीं दचकून पाहिलें. समोर मुखर्जी महाशय आले होते. आज शनिवार. आज बंगवासी यायचा दिवस. मुखर्जीनें पान चघळीत चघळीत विचारलें, " टपालचा टांगा आला का भैया ? "

" यावं यावं मुखर्जीमहाशय. " पोस्टमास्तर म्हणाले, " अरे पॅकर ! आंतून बाबूंसाटीं एक खुर्ची आण पाहूं ! — नाहीं हो, अजून टांग्याचा पत्ता नाहीं. "

मुखर्जीमहाशय खुर्चीवर बसत म्हणाले, " आज एवढा उशीर कां ? "

" कोण जाणे ! गाडी लेट झाली असावी असं वाटतं. "

" हं असंच असेल ! " असें म्हणून मुखर्जींनीं शिपाईमहाशयाला गुडगुडी भरून आणायला सांगितलें. शिपाई निघून गेल्यावर मुखर्जीमहाशय म्हणाले, " गेल्या आठवड्यांतला बंगवासी वाचलात ? "

" नाहीं. " मास्तर म्हणाले.

" लेडी इस्मिथला मोठं भयंकर रण माजलंय. इंग्रज मोठ्या पेंचांत सांपडले आहेत. "

" असं का ! " मास्तर नुसते नीरसपणें उद्गारले.

" होय तर. " मुखर्जी म्हणाले, " केव्हां काय होईल हें सांगतां का येतंय ? तें असं झालंय —" असें म्हणून त्यांनीं शेजारच्या टेबलावरचा मनीऑर्डरचा फॉर्म खसकन् ओढून घेतला आणि युद्धक्षेत्राचा नकाशा त्यावर काढायला सुरवात केली. गेल्या शनिवारच्या बंगवासीच्या आधारें इंग्रजांचें सैन्य कसें संकटांत सांपडलें होतें तें मास्तर महाशयांना ते समजावून देऊं लागले. डाक यायला उशीर झाल्यामुळें तेच स्वतः संकटांत पडले होते, त्यामुळें इंग्रजाच्या सैन्यावर आलेलें संकट त्यांच्या हिशेबी आलें नाहीं.

ती सगळी समजावणी झाल्यावर मुखर्जीमहाशय म्हणाले, " तुम्हांला खरं वाटायचं नाहीं मास्तर, पण इंग्रजांचं आतां यापुढें कसं होईल याच्या काळजी-मुळं गेल्या आठवड्यांत मला झोंपसुद्धां आली नाहीं. "

इतक्यांत गुडगुडी घेऊन शिपाई आला. मास्तरबाबूंनीं गुडगुडी ओढायला सुरवात केली, त्यांच्या हातून गुडगुडी काढून घेऊन मुखर्जी महाशय तंबाकूचा दम मारीत होते तोंच दुरून टांगा येत असल्याचा आवाज ऐकूं आला.

गाडी येऊन पोस्टाच्या दारांत उभी राहिली. गाडींतून तीनही उतारू खालीं उतरले. दोघे त्या गांवचेच होते. मात्र एक व्यक्ति अपरिचित होती.

त्या व्यक्तीकडे सर्वांचें लक्ष वेधलें. त्याचा सोन्याचा चष्मा, मोलवान् पोशाख, गौरकांति आणि देखणा चेहरा पाहून पोस्टमास्तरबाबू आणि मुखर्जी महाशय त्याच्याकडे नुसते टकमक पहात राहिले. तो खगेन्द्र होता.

गाडीच्या टपावरून शिपायानें टपालाच्या पिशव्या खालीं काढल्या. टांगेवाल्यानें उतारूंचें सामान खालीं उतरून दिलें. दुसऱ्या दोघां उतारूंना खगेन म्हणाला, "जरा थांबा." त्यानें आपली ट्रंक उघडून एक कागदाचें पुडकें बाहेर काढलें. त्यांच्या हातीं एकेक हँडबिल देऊन तो म्हणाला, "हें पुस्तक प्रसिद्ध होत आहे. फार सुंदर पुस्तक आहे. ही जाहिरात एकदां वाचून पहा."

नंतर तो पोस्ट-ऑफिसच्या व्हरांड्यावर आला. मोठ्या अदबीनें नमस्कार करून त्यानें एक पोस्टमास्तरला आणि एक मुखर्जीमहाशयांना हँडबिल दिलें. तेथें एक स्टूल होतें असें पाहून कुणी सांगितलें नाहीं तरीही तो त्याच्यावर बसला.

सदऱ्याच्या खिशांतून चष्मा काढीत काढीत मुखर्जीमहाशय म्हणाले, "महाशयांचं नांव?"

"माझं नांव खगेन्द्रनाथ बंद्योपाध्याय."

"राहाणारे कुठले?"

"कलकत्ता."

"कुठं जाणार आहां?"

"आपल्या याच गांवीं आलोंय्."

"कुणाच्या घरीं?"

"कुणाच्या घरीं असं कांहीं नाहीं."

"कोणत्या उद्देशानं येणं झालंय?"

"एक पुस्तक प्रसिद्ध करतोंय. ही जाहिरात वाचून पाहिलीत म्हणजे कळेल तुम्हांला. या पुस्तकासाठीं माहिती मिळवतोंय. शिवाय चारदोन ग्राहक मिळाले तरीही पाहूचंय."

खगेन, पोस्टमास्तर आणि मुखर्जी यांच्या तोंडाकडे मोठ्या विनयपूर्वक आतुरतेनें पाहात राहिला होता. कांहींसुद्धां न बोलतां पोस्टमास्तर टपालाच्या थैल्या उघडायच्या कामाला लागले होते.

मुखर्जीमहाशयांनीं नाकावर चष्मा चढवला आणि जाहिरात वाचायला सुरवात केली. जाहिरात वाचून झाल्यावर त्यांनीं एकदां खगेनकडे पाहिलें आणि म्हटलें, “ आश्विन प्रतिपदेला हें पुस्तक निघणार आहे वाटतं. ”

खगेननें होकार दिला.

“ तुमची हरकत नसली तर एक गोष्ट सांगणार आहें —” असें म्हणून अत्यंत गंभीर चेहरा करून मुखर्जीमहाशय स्तब्ध राहिले. जणूं काय ते म्हणत होते, कलकत्त्यांत काय हे अनाचार चालले आहेत !

“ काय सांगायचंय ? ” खगेननें विचारलें.

“ महिन्याचा पहिला दिवस कांहीं चांगला नाहीं. अगस्तियात्रेचा दिवस आहे ना तो ? ”

खगेन्द्र हंसला आणि म्हणाला, “ तेवढ्यासाठींच तर या दिवशीं पुस्तक प्रसिद्ध करणार आहोंत — ”

मुखर्जीमहाशय मोठ्या गोंधळांत पडले. ते म्हणाले, “ म्हणजे काय ? ”

“ अगस्तियात्रेच्या दिवशीं जो बाहेर पडतो तो पुन्हां घरीं येत नाहीं असं शास्त्रांत सांगितलं आहे ना ? तेंच हवंय आम्हांला. आमचं पुस्तक अगस्ति-यात्रेच्या दिवशीं एकदां बाहेर पडलं, कीं ते पुन्हां परत येतां नये. ५-७ वर्षांनीं बुकसेलरच्या कपाटांतून म्हणा, किंवा जुने कागद विकत घेणाऱ्या फेरीवाल्या-कडून म्हणा, कसरीनं खाऊन तें पुन्हां आमच्या घरीं येऊं नये, एवढीच आमची इच्छा. ” असें म्हणून खगेन्द्र हात जोडून नाजुक नाजुक हंसत मुखर्जीमहाशयांच्या तोंडाकडे पहात राहिला.

खगेन्द्राची बोलण्याची पद्धति आणि अदबशीर वृत्ति पाहून मुखर्जीमहाशय खूष झाले. त्यांनीं विचारलें, “ तर मग या पुस्तकासाठीं कोणता मालमसाला इथं गोळा करणार आहां तुम्हीं ? ”

टांग्यांतून येतांना बरोबरच्या उतारूकडून खगेननें थोडी थोडी माहिती मिळवली होती. तो म्हणाला, “ आपले इथले जमीदार राय महाशय यांचं घराणं मोठं जुनाट आहे, खानदानी आहे, असें मी ऐकलंय. शारदाबाबूंच्या

वंशाचा थोडासा इतिहास — फार नव्हे, दोन पानं — त्यांचं थोडसं जीवन-चरित — समजा चार पांच पानं होईल एवढं — मिळायला हवं. कोणत्या वेळीं गेलं म्हणजे त्याची भेट होईल?"

तितक्यांत एकजण कार्ड विकत घ्यायला आला होता, त्याच्या हातीं त्यानें एक जाहिरात दिली.

मुखर्जी म्हणाले, "सकाळीं आठ ते नवानंतर बाबू बैठकखान्यांत येऊन बसतात. त्याच वेळीं जाणं सोयीचं होईल. बरं, आपण किती दिवस रहाणार आहांत इथं?"

"चारपांच दिवस राहला हवं. आजूबाजूच्या गांवांतून या जाहिराती वाटायला हव्यात. इथं एकादं घर भाड्यानं मिळेल का?"

"घर? भाड्याचीं घरं इथं हो कुठलीं? हें आपलं कलकत्ता शहर का आहे?"

पोस्टमास्तर-बाबू टपाल पाहून म्हणाले, "खरंच. कृष्णदासबाबूंचा 'बंगवासी' आज कांहीं आला नाहीं. हा शारदाबाबूंचा 'बंगाली' तेवढा आला आहे. दुसऱ्या कुणाचं कुठलंच वर्तमानपत्र आज आलेलं दिसत नाहीं."

मुखर्जीमहाशयांना इंग्रजी येत नव्हतें. ते 'बंगाली' कसे वाचणार होते? ते म्हणाले, "बंगवासी नाहीं आला? बरं तर! काय करणार!"

खगेंद्र म्हणाला, "आपण या आठवड्याचा 'बंगवासी' का शोधतां आहां?"

"हो. आहे का आपल्यापाशीं?"

"आहे! बंगवासी आहे, वसुमती आहे, हितवादीहि आहे. काल निघायच्या वेळीं गाडींत वेळ घालवण्यासाठीं हॅरिझन रोडच्या कोपऱ्यावर एकेक वर्तमान-पत्र घेतलं होतं."

मुखर्जीमहाशयांना स्वर्ग हातीं आल्यासारखं वाटलं. ते म्हणाले, "आहे! खरंच का आहे? कुठं आहे?"

"माझ्या ट्रंकेंत आहे." असें म्हणून खगेंद्रानें ट्रंक उघडून तिन्हीं वर्तमानपत्रें काढून तीं मुखर्जीमहाशयांच्या हातीं दिलीं. त्यांच्या आनंदाला आतां पारावार नव्हता. ते म्हणाले, "पाहा, म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. देव देतो तेव्हां छप्पर फाडफाडून देतो!—एका वर्तमानपत्रासाठीं जीव

खालींवर करीत होतों. तों पहा, एकदम तीन हातीं आलीं. वा, भैया! हीं घरीं नेऊन एकदां वाचून घेतों. कसं? वाचून झाल्यावर परत करीन. कुठं राहाणार तुम्हीं?

खगेन म्हणाला, "कुठं राहायचं तेंच तर पहातोंय! भाड्याचं घर मिळत नाहीं, असं तुम्हींच आतां सांगितलं—"

मुखर्जीमहाशय उठून उभे राहिले. ते म्हणाले, "कांहीं काळजी नको. तें होऊन जाईल. काय सांगूं भैया! तुमच्यासारखा सज्जन माणूस—आमच्याच घरीं घेऊन गेलों असतों—तशी ऐसपैस जागा आहे आमच्या घरांत—पण परवांच आमचा भाचेजांवई आलाय. त्याचेबरोबर त्याचा एक मित्रही आलाय. त्या गर्दीत राहाणं तुम्हांला सोईचं व्हायचं नाहीं. हें समोर झाड दिसतंय ना,—त्याच्या पलीकडे जी ती इमारत दिसतेय्, ती आमच्या शाळेची इमारत. मी इस्कूल कमिटीचा मेंबर आहे. फार चांगला रिझल्ट लागतो आमच्या शाळेचा. गेल्या वर्षी एक मुलगा पास झाला त्याला चार रुपये स्कॉलरशिप मिळाली. सध्यां उन्हाळ्यासाठीं शाळा बंद आहे. तिथली एक खोली तुम्हांला उघडून देतों. तुम्हीं या खोलींत राहायचं, अन् या गरिबाच्या घरीं जो आमटीभात मिळेल तो खायचा. मीही ब्राह्मणच आहें. माझं नांव रामनारायण मुखोपाध्याय." असें म्हणून त्यानें सदऱ्याचीं बटणें पटापट उघडून ब्राह्मणत्वाचें प्रमाणस्वरूप असें जें यज्ञोपवीत तें त्याला दाखवलें.

खगेंद्रानें त्यांना नमस्कार केला. तो म्हणाला "ठीक आहे. मी शाळेंतच राहीन. जेवणासाठीं आपल्याला तसदी द्यायची—"

"तसदी कसली त्यांत!" मुखर्जी म्हणाले, "मी कांहीं तुम्हांला पुलावामुरगी घालीत नाहीं कीं कोरमाही घालीत नाहीं. या खेडेगांवांत कुठं मिळणार आहेत असले जिन्नस! आम्ही जें खातों तोच डाळभात घालूं तुम्हांला. आमचं तेवढ्यानं भागतं. पण तुमची मात्र गैरसोय होईल."

खगेन म्हणाला, "मी सुद्धां डाळभात खाऊन दिवस काढतों महाराज! रोजरोज पुलावा कुठून मिळणार? मी सुद्धां गरीबच माणूस आहें. नाहींतर हें पुस्तक कशाला काढलं असतं? पोटासाठींच ना हे उद्योग!"

"ठीक आहे. चला तर. शाळेची एक खोली खालीं करून देतों. बिछाना आहेच तुमच्यापाशीं. तीनचार बांकं जोडून घेतलीं कीं छान पलंग होऊन

जाईल. शाळेचा दरवान आहे. तो तुम्हांला पाणीबिणी हवं असलं तर आणून देईल. माझं घरही इथून फारसं दूर नाहीं — चला या. ”

एका माणसाला बोलावून त्याच्या माथीं त्यांनीं ट्रंक-वळकटी दिली आणि खगेन्द्राला बरोबर घेऊन ते पुढें निघाले.

रस्त्यानें जातांना कुणीही पांढरपेशा माणूस दिसला, कीं खगेन्द्र एक हँडबिल त्याच्या हातीं देत असे.

शाळेंत आल्यावर मुखर्जीबाबूंनीं खगेनची सारी सोय करून दिली आणि म्हटलें, “ तर मग मी आतां येतों. भाताला ठेवायला सांगतों. तयारी झाली कीं बोलवायला पाठवतों. ”

खगेन म्हणाला, “ आतां या अवेळीं भातबीत नको कांहीं. आतां एकदम रात्रींच जेवण करूं. ”

मुखर्जी म्हणाले, “ ठीक आहे. संध्याकाळीं कंदील घेऊन माझा मुलगा येईल, त्याच्याबरोबर तुम्हीं आमच्या घरीं या. तर मग आतां मी येतों. ”

खगेन म्हणाला, “ आपल्याला फार तसदी दिली मी ! आणखी एक थोडंसं काम आहे — ”

“ काय काम आहे ? ”

“ माझे सारे कपडे मळले आहेत. कलकत्त्याहून निघण्यापूर्वी धोबी कपडे घेऊन आला नव्हता. इथं चांगलासा धोबी आहे का कुणी ? ”

“ आहे तर. एक धोबी आहे इथं. त्याचं नाव आहे नीलमणी. तसा एकंदरींत कपडे अगदींच वाईट धूत नाहीं तो, तरी पण आपल्या कलकत्त्याच्या धोब्याप्रमाणें आमच्या या खेड्यांतल्या धोब्याला कुठं कपडे धुवायला येणार आहेत ? ”

“ कांहीं हरकत नाहीं. सध्यां कामचलाऊ धुऊन दिले त्यानं तरी चालेल. त्या नीलमणीला इकडे पाठवून द्यायची तसदी घ्याल का ? ”

“ ठीक आहे. घरीं गेल्याबरोबर त्याला बोलावून इकडे धाडून देतों. येतों तर. ”

घरीं जाऊन केव्हां एकदां वर्तमानपत्र वाचीन, असें मुखर्जीबाबूंना झालें होतें.

खगेंद्रानें स्टोव्ह पेटवला आणि चहासाठीं पाणी वर चढवलें. डबलरोटी, लोणी आणि 'पॉटेड मिट' त्याच्या टिफीन बॉक्समध्यें होतेंच. एकंदरींत खगेंद्राची राहायची आणि जेवायची व्यवस्था चांगली झाली होती.

तीन दिवस गेले. या तीन दिवसांत खगेंद्रानें मोठ्या उत्साहानें 'बंग-साहित्यांत युगांतर' करणाऱ्या त्या पुस्तकाच्या जाहिराती वाटल्या होत्या. सर्व घरांतील लोकांच्या त्यानें भेटी घेतल्या होत्या. सर्व लोकांत मिळून मिसळून तिथल्या वेगवेगळ्या अड्ड्यांवरही तो जाऊं लागला होता.

जमीदार शारदाचरणबाबूंची अजून भेट झाली नव्हती, कारण ते आजारी होते आणि खगेंद्राला तर त्यांचें जीवनचरित्र त्यांच्याच तोंडून ऐकायचें होतें. अर्थात् वाट पाहिल्यावांचून गत्यंतर नव्हतें.

या तीन दिवसांत त्यानें दोन बातम्या मिळवल्या होत्या. एक, गेल्या माघ महिन्यापासून जमीदारबाबूंचा धाकटा भाऊ नवीनचंद्र आणि कृष्णदासबाबूंची तरुण कन्या लीलावती हीं दोघेंही नापत्ता झालीं होतीं. दुसरें, ज्या दिवशीं हीं दोघें नापत्ता झालीं त्या दिवसाच्या आदल्या रात्रीं गांवच्या कुणब्याची सैरभीची आई गाजनतोल्याच्या बाजारांत नवीनबाबूंबरोबर दिसली होती.

नवीनबाबूंचें वय, रंगरूप, आकारप्रकार वगैरेंबद्दल खगेंद्रानें जी माहिती मिळवली त्यावरून त्याला वाटूं लागलें होतें, कीं गंगेतून वहात आलेली सुरबाला हीच लीलावती असावी आणि भवेंद्राचें नांव घेऊन नवीनचंद्रच बाशुलीपाड्याचा जमीदार होऊन बसला असावा.

हा त्याचा नुसता अंदाज होता. तशी पुरावेशुद्ध बातमी अजून त्याच्या हातीं आली नव्हती. नीलमणी धोब्याला तो साडीचा तुकडा दाखवायलाही मिळाला नव्हता कीं सैरभीच्या आईला गांठून कांहीं विचारण्याचा सुयोगही आला नव्हता.

इथें आल्यापासून दिवसा तो मुखर्जीमहाशयांच्या घरींच जेवीत होता. रात्रींच्या वेळीं दुकानावरून गरमगरम पुऱ्या आणि वांगींबटाट्याची भाजी आणून खात होता. त्यानें कलकत्त्याला पत्र लिहून 'बंगवासी' 'संजीवनी' 'हितवादी' आणि 'वसुमती' हीं चारही वर्तमानपत्रें मिळायची व्यवस्था केली होती. मुखर्जीमहाशयही वर्तमानपत्रें येण्याचे दिवस मोजीत बसले होते.

चौथे दिवशीं दुपारचें जेवण उरकून खगेन पोस्ट-ऑफिसांत गेला. कलकत्त्याहून जाहिरातींचें एक पुडकें येणार होतें. पोस्टमास्तर नुकतेच जेवण उरकून पान खातखात बाहेर येऊन बसले होते. टपालाचा टांगा यायला बराच वेळ असल्यामुळें दोघेही इकडच्या तिकडच्या गप्पा मारीत बसले होते. इतक्यांत गाजनतोल्याच्या पोलीसठाण्याचे दरोगाबाबू येऊन हजर झाले.

"दरोगाबाबू काय! यावें, यावें – अरे, ऑफिसांतील ती मोठी खुर्ची बाहेर घेऊन ये पाहूं." असें म्हणत म्हणत पोस्टमास्तर उठून उभे राहिले. एका रनरनें धांवत जाऊन घोड्याचा लगाम धरला तेव्हां दरोगाबाबू उतरून खालीं आले.

खगेन्द्रानें पाहिलें, तो हे दरोगाबाबू अगदींच अल्पवयी दिसले. त्यांचें वय २४ च्या सुमाराचें असावें असें त्याला वाटलें. सरकारी खाकी पोषाख चढवल्यामुळें ते जरासे कठोर दिसत असले तरीही तो गृहस्थ एकंदरींत एक देखणा, हंसतमुख तरुण होता.

मास्तरनीं विचारलें, "आतां कुठून आलांत इथं?"

"जवळच्याच एका गांवीं गेलों होतों. एक तपास करायचा होता –" असें म्हणून त्यांनीं खिशांतला रुमाल काढून कपाळावरचा घाम पुसायला सुरवात केली.

"अजून जेवणबिवण झालं नाहीं वाटतं?"

"नाहीं."

"तर मग इथंच स्नान करून घ्या. तोंवर चुलीवर भात ठेवायला सांगतो."

दरोगाबाबू मोठ्या विनयानें हंसले आणि म्हणाले, "नको नको. एव्हां कांहीं नको. फार तहान लागली आहे. थोडंसं गार पाणी मागवून घ्या."

"पाणी? पाणी कां! थोडं सरबतच करून आणतों – चांगलीं लिंबं मिळालीं आहेत आज."

"उगीच कशाला एवढी तसदी घेतां?"

"त्यांत तसदी कसली? मी आंत सांगून येतों. तोंवर खगेनबाबू, तुम्हीं जरा दरोगाबाबूंची खबर घ्या ना." असें म्हणून पोस्टमास्तर निघून गेले.

दरोगाबाबूंनीं आपली खुर्ची खगेनकडे फिरवली आणि म्हटलें, "आपलं रंनांव काय महाशय?"

खगेननें आपलें नांव सांगितलें.

दरोगाबाबू म्हणाले, " माझं नांव अवनीमोहन मित्र. इथं यापूर्वी कधीं पाहिलं नाहीं आपल्याला. "

" मी नुकताच आलों इथं. चार दिवस झाले. आपण केव्हांपासून आलां इथं ? "

" मी होय ? दोन वर्षं झालीं मी इथं आलों त्याला. पहिल्यानंच दरोग म्हणून आलों इथं. "

त्यांचें असें भाषण चाललें असतां पोस्टमास्तर परत आले. ते म्हणाले, " सरबत घेऊन येतोय्. खगेनबाबूंचा परिचय झाला ? अहो खगेनबाबू, आपली ती जाहिरात द्या ना दरोगाबाबूंना. हे कांहीं पूर्वीच्या काळचे अशिक्षित दरोगे नव्हेत बरं. चांगले शिकले सवरलेले आहेत. बी. ए. फेल आहेत. "

खगेन म्हणाला, " जाहिराती संपल्या आहेत. आजच्या टपालानं त्यांचीच वाट पहातोंय् मी. "

" कसली जाहिरात ? " दरोगाबाबूंनीं विचारलें.

" एक पुस्तक प्रसिद्ध करताहेत. "

" खरंच कीं काय ? " दरोगाबाबूंनीं विचारलें, " ग्रंथकार आहांत वाटतं आपण ? काव्य कीं कादंबरी ? "

खगेन्द्र हंसला आणि म्हणाला, " काव्य नव्हे कीं कादंबरीही नव्हे. तसं साधारणपणें इतिहासाचंच पुस्तक आहे म्हणाना ! 'वंगीय जमीदार चरितमाला. "

पोस्टमास्तरांच्या नोकरानें एक ग्लास लिंबूचें सरबत आणून दरोगासाहेबांच्या हातीं दिलें. तें घेऊन झाल्यावर त्यांनीं समाधानाचा एक सुस्कारा सोडला.

खगेन्द्रानें खिशांतून आपली पानाची डबी काढली आणि ती उघडून दरोगासाहेबांच्या समोर धरली.

दरोगा म्हणाले, " थँक्स. मी पान खात नाहीं. "

खगेन्द्र म्हणाला, " असं कसं म्हणतां ? कसलं पान खात नाहीं तुम्हीं ? पान खाणं हेंच तर आहे पोलिसांचं काम. "

पोस्टमास्तर म्हणाले, " नाहीं. आमचे दरोगाबाबू असलंही पान खात नाहींत आणि तसलंही पान खात नाहींत. हे शिकलेसवरलेले पांढरपेशे

लोक पोलीसमध्यें भरून सरकारनं या खात्याची माती करून टाकली आहे–" असें म्हणून ते एकदां मोठ्यानें हो हो करून हंसले. नंतर म्हणाले, "कुणाकडेसा म्हणे द्यायला पैसा नव्हता, म्हणून त्यानं दरोग्याला पान खाण्यासाठीं एक वासरूं आणून दिलं होतं–होय ना ?"

दरोगाबाबू म्हणाले, "हो. ती एक जुनी आख्यायिका आहे खरी."

इतक्यांत टपालाचा टांगा आला. टपालांतून खगेन्द्राच्या नांवचें जाहिरातीचें पुडकें आलें होतें. तें उघडून त्यांतील एक जाहिरात त्यांनीं दरोगाबाबूंच्या हातीं दिली.

दरोगाबाबूंनीं ती लक्षपूर्वक वाचली. नंतर ते खगेन्द्राला त्याची माहिती विचारूं लागले, म्हणजे इथें येऊन किती दिवस झाले, आणखी किती दिवस इथें रहाणार, या मुदतींत कार्यभाग कितीसा झाला वगैरे. जाहिरातींतल्या पुस्तकाबद्दलही त्यांनीं बरीचशी माहिती विचारली. शेवटीं ते म्हणाले, "तुमची इच्छा असली तर थोड्या जाहिराती माझ्यापाशीं द्या. गाजनतोल्याला पोस्टऑफिसांत पोलीसठाण्यावर आणि शाळेंत प्रसिद्ध ठिकाणीं या जाहिराती लावून द्यायची व्यवस्था करतों."

खगेन्द्रानें कांहीं जाहिराती धन्यवादपूर्वक दरोगाबाबूंच्या हातीं दिल्या, त्या खिशांत घालून आणि पोस्टमास्तरचा निरोप घेऊन ते घोड्यावर बसून निघून गेले.

## : ४ :

शारदाबाबूंची प्रकृति आतां बरी असल्याची बातमी, त्यानंतर तीन दिवसांनीं मिळाली. आज तिसऱ्या प्रहरीं खगेन्द्राबरोबर त्यांची भेट होणार होती.

मुखर्जीमहाशयांनीं खगेन्द्राला आपल्याबरोबर जमीदारांकडे घेऊन जाईन असें पूर्वीच आश्वासन दिलें होतें, पण त्या दिवशीं डाकेनें तीन तीन वर्तमानपत्रें आल्यामुळें मुखर्जीमहाशय युद्धाच्या बातम्या वाचण्यांत इतके मश्गुल होऊन गेले, कीं त्यांना डोकें वर करायलासुद्धां फुरसत नाहींशी झाली.

त्या दिवशीं चार वाजायच्या सुमाराला खगेन्द्र एकटाच जमीदारांच्या वाड्यांत जायला निघाला. आजपर्यंत लोकांच्या तोंडून शारदाबाबूंसंबंधीं मिळालेली जी माहिती त्यांनीं लिहून काढली होती ते सारे कागद त्यानें बरोबर घेतले होते.

माडीवरच्या एका प्रशस्त दिवाणखान्यांत बाबू बसले होते. जमिनीवर स्वच्छ पांढरा बिछाना पसरलेला होता, त्याच्या मध्यभागीं एका गालिच्यावर तक्क्याला टेकून बाबू बसलेले होते. चांदीच्या हुक्क्यांत विष्णुपूरचा सुगंधी तंबाकू घातल्याचा सुवास दरवळत होता. हुक्क्याची नळी हातांत घेऊन बाबू आपल्या दोस्तभगतांबरोबर गप्पागोष्टी करीत धूम्रपान करीत होते.

भिंतीला टांगलेल्या तसबिरा साऱ्या विलायती होत्या. मध्यभागीं एक मोठा आरसा होता आणि वरती एक मोठें घड्याळ होतें.

खगेन्द्राला त्या जागीं घेऊन जाण्यांत आलें त्यावेळीं तो नमस्कार करून उभा राहिला.

बाबूनें विचारलें, “ आपलंच नांव खगेन्द्रबाबू का ? ”

तो ‘ होय ’ म्हणला. त्यावेळीं ते म्हणाले, “ यावें, बसावें. गेले कांहीं दिवस माझी प्रकृति बरी नव्हती त्यामुळं आपली भेट घेतां आली नाहीं, कीं आपली कांहीं व्यवस्थाही करतां आली नाहीं. आपण आमच्या शाळेंतल्या एका खोलींत रहातां असं कळलं. तिथं आपली कांहीं गैरसोय तर होत नाहीं ना ? ”

“ जी, नाहीं. कसलीच गैरसोय नाहीं. ठीक व्यवस्था आहे माझी. ” असें म्हणून खगेन्द्र मोठ्या अदबीनें शारदाबाबूंकडे पहात राहिला.

हुक्क्याचे दोन चार झुरके मारून बाबू म्हणाले, “ आपण कलकत्त्याला रहातां वाटतं ? आपली जाहिरात मीं वाचली. आपण पुस्तक प्रसिद्ध करतांहां ना ? ”

“ होय. ‘ वंगीय जमीदार चरितमाला ’ या नांवाचं पुस्तक मी प्रसिद्ध करीत आहें. ”

शारदाबाबूंनीं क्षणभर विचार केला, कलत्या मानेनें त्यांच्याकडे पाहिलें आणि म्हटलें, “ वंगीय जमीदार चरितमाला ! माला ! ! ”

बाबूंच्या बोलण्याच्या थाटावरून ते कांहींतरी श्लेष करीत आहेत असें त्यांच्या दोस्तभक्तांना वाटलें. त्या श्लेषाचें अनुसंधान कुणालाच नीटसें झालें

नाहीं, तरीही त्यांनीं एकमेकांकडे पाहून गालांतल्या गालांत हंसून पाहिलें. बाबूंच्या श्लेषावर असें कांहींतरी करणें अवश्य होतें.

बाबू म्हणाले, "माला !—ठीक ! माला कशाची होते बरं खगेन्द्रबाबू ? एक फुलांची तर होतेच !"

खगेन्द्र म्हणाला, "फुलांची होते, मोत्यांची होते—"

"अर्थात् चांगल्या जिनसांची होते." बाबू मध्येंच म्हणाले, "सुंदर सुंदर जिनसांची होते. असंच कीं नाहीं ? फाटके जोडे, नारळाच्या करवंट्या, असल्या कांहीं जिनसांची काय माला होते महाशय ? आमच्या या बंगाल देशांत जे जमीदार बाबू आहेत, त्यांचीं चरित्रं काय माला तयार करण्याजोगीं सुंदर आणि पवित्र आहेत असा तुमचा समज झालाय ?" असें म्हणून बाबू हो हो करून हंसले आणि पुन्हां हुक्का ओढूं लागले.

क्षणभर थांबून खगेन्द्र म्हणाला, "आपलं म्हणणं बरोबर आहे. सुंदर आणि पवित्र वस्तुंचीच माला होते. घाणेरड्या वस्तूंची होत नाहीं. पण जो माला गुंफतो तो योग्य निवडही करतो. हातापाशीं जें कांहीं म्हणून मिळेल त्याची माला गुंफित नाहीं. फुलांचे प्रकारही पुष्कळच आहेत. गुलाब, जाईजुई, मोगरीपासून आरंभ करून झेंडू आणि घाणेरीच्या फुलापर्यंत फुलें आहेत. पण माळी माळ गुंफतो ती जाईजुई आणि गुलाबाची. मीसुद्धां त्याचप्रमाणें निवड करून माला गुंफीत असतों. आतां हें पहा, मी आपल्याला यापूर्वीं कधींही पाहिलेलं नाहीं, पण आपली कीर्ति मीं कलकत्त्यांत बसूनच ऐकली. या खेड्याच्या जंगलांत हें फूल नजरेआड फुललं आहे खरं, पण त्याचा सुवास कलकत्त्यापर्यंत पोंचला ना ?"

तें ऐकून शारदाबाबू गोड गोड हंसूं लागले. एकंदरींत त्यांना खगेन्द्राचें तें भाषण बरेंच आवडलें असावें असें दिसलें. दोस्त भगत मंडळी खगेन्द्राकडे मोठ्या कौतुकानें पाहूं लागली. एकजण म्हणाला, "वाः वाः ! उपमा तर फार सुंदर दिलीत ! अगदीं अचुक लागू पडते आहे इथं. आमच्या बाबू महाशयां-सारखा गुणवान् भूस्वामी या प्रदेशांत मिळणं कठीण."

यानंतर बाबू पुस्तकाबद्दलची माहिती विचारूं लागले त्यावेळीं त्यांनीं बरीच सहृदयता दाखवली. त्यांनीं पांच प्रती घेण्याचें अभिवचन दिलें. खगेन्द्रनें त्यांचें जें जीवनचरित्र लिहून आणलें होतें तें त्यांना वाचून दाखविलें. तें

वाचीत असतांना बाबू मधून मधून त्यांत कोणती दुरुस्ती करायची, अगर कोणता भाग वाढवायचा तें सांगत होते आणि खगेन्द्र त्याच्या नोट्स् घेत होता.

खगेन्द्रनें त्यांचा एक फोटो मागितला तेव्हां दोनतीन वर्षांपूर्वी घेतलेला एक फोटो त्यांच्या संग्रहीं होता तो दुसऱ्या दिवशीं खगेन्द्राकडे पाठवून देण्याचें त्यांनीं कबूल केलें.

शेवटीं खगेन्द्र म्हणाला, "आपले कनिष्ठ बंधू, नवीन बाबू यांची हकीकत यांत कांहीं आली नाहीं, त्यांची एकदां भेट घेतां येईल का?"

बाबू जरासे अस्वस्थ होऊन म्हणाले, "नवीन होय? तो सध्यां नाहीं इथं."

"कुठं आहेत ते?"

"कलकत्त्याला."

"कलकत्त्याला होय!—तर मग मी स्वतःच जाऊन त्यांची एकदां भेट घेईन. कृपा करून आपण मला जर त्यांचा पत्ता दिला—"

बाबू म्हणाले, "त्या दिवशीं एक पत्र आलंय त्याचं. कुठलासा पत्ता दिलाय वाटतं त्यानं. कुठली तरी 'घोष लेन' लिहिली आहे ती मी विसरलों. अरे मास्तर!—"

पलिकडल्या खोलींतून एकजण येऊन हजर झाला. शारदाबाबू त्याला म्हणाले, "परवां आलेल्या पत्रांत छोटेबाबूंनीं आपला जो पत्ता दिलाय तो एका कागदावर लिहून या गृहस्थांना आणून दे पाहूं."

पत्त्याचा कागद हातीं आल्यावर तो पाहून खगेन्द्र म्हणाला, "मी केव्हां केव्हां जातों या बाजूला. कलकत्त्याला गेलों, कीं अवश्य त्यांची भेट घेतों. तर मग उद्यां सकाळीं फोटोग्राफ पाठवून देण्याची आठवण ठेवायची. आतां मी आपला निरोप घेतों. नमस्कार." असें म्हणून खगेन्द्र तिथून निघाला.

घरीं आल्यावर तो विचार करीत बसला. त्याची थोडीशी निराशा झाली होती. नवीनचंद्र कलकत्त्याला असतो तर? अर्थात् त्यानें केलेले सारे अंदाज खोटे ठरले होते.

मग हा तोतया भवेन्द्र होता तरी कोण? सुरबालेचा आणि त्याचा काय संबंध? हा नवीनबाबू जर तोतया भवेन्द्र नव्हे, तर मग ही लीलावती सुरबाला

असण्याचा संभव कुठला! आणि सुरबालाच जर लीलावती आहे असं म्हणायचं तर नवीनचंद्राशिवाय दुसरा कोण भवेन्द्र असणार!

आजवर त्यानें जे कांहीं सिद्धान्त केले होते ते सारे उलटपालट होऊन गेले होते.

रात्रीं त्याची गरम पुऱ्या आणि वांग्याची भाजी आली खरी, पण त्यांतली अर्धी तशीच राहून गेली.

रात्र बरीच उलटून गेल्यावर चट्कन् त्याला वाटलें, कीं आपण फार मोठी चूक करून बसलों आहों. सुरबालेचें सासर अगर माहेर वसन्तपूरला आहे अशी कल्पना करून या पोस्टऑफीस असलेल्या वसन्तपूरला आपण आलों. सुरबालेचें तें वसन्तपूर वेगळेंच असेल आणि तिथें पोस्टऑफीस नसेल असें कां समजूं नये!"

सुरबालेच्या साडीचा जो तुकडा त्यानें बरोबर आणला होता तो नीलमणी धोब्याला दाखवून एकदां संशयाचें निरसन करून घ्यायचें त्यानें ठरवलें.

सकाळींच उठून त्यानें धोब्याला बोलावणें पाठवलें. सैरभीच्या आईची भेट कशी घ्यायची याचाही तो विचार करूं लागला.

तितक्यांत पोलीसठाण्यावरून एक कॉन्स्टेबल दरोगाबाबूंचें पत्र घेऊन आला. दरोगाबाबूंनीं लिहिलें होतें—कीं आपली जाहिरात वाचल्यानंतर इथल्या बऱ्याच लोकांनीं पुस्तक घ्यायची इच्छा प्रदर्शित केली आहे. आपण इथें गाजनतोल्याला येऊन चार दोन दिवस रहाल तर कांहीं ग्राहक मिळण्याची आशा आहे.

दरोगाबाबूला धन्यवाद देऊन खगेन्द्रानें पत्र लिहिलें कीं, एक दिवस अवश्य येऊन आपण त्यांची भेट घेतों. कॉन्स्टेबल पत्र घेऊन निघून गेला.

धोबीघाटावर गेलेला माणूस परत आला. त्यानें सागितलें, कीं बाबूंचे कपडे अजून तयार झाले नाहींत. ते तयार करून नीलमणी धोबी तिसरे प्रहरीं ते घेऊन येईल.

सारा दिवस फुकट गेला. तिसऱ्या प्रहरीं गाजनतोल्याच्या ठाण्यावरून एक कॉन्स्टेबल दरोगाबाबूंचें दुसरें पत्र घेऊन आला. दुसऱ्याच दिवशीं सकाळीं दोन बडे जमीदार ठाण्यावर येणार आहेत. ते बरींचशीं पुस्तकें विकत घेतील अशी आशा आहे. तरी उद्यां ९-१० च्या सुमारास खगेन्द्रबाबूंनीं अवश्य

ठाण्यावर यावें, कोणत्याही प्रकारें ही संधी चुकवूं नये, असें त्यानीं पत्रांत लिहिलें होतें.

पत्र वाचून झाल्यावर खगेन्द्र कॉन्स्टेबलला म्हणाला, "तुम्हीं थोडा वेळ बाहेर वाट पहा, चहा घेऊन झाल्यावर मी पत्राचं उत्तर लिहून देतों."

कॉन्स्टेबल जाऊन बाहेर बसला. खगेन्द्र चहा घेत होता तोंच नीलमणी धोबी धुतलेल्या वस्त्रांची मोट खांद्यावर घेऊन आला. यादीप्रमाणें कपडे पाहून घेतल्यावर खगेन्द्र त्याला म्हणाला, "अरे धोबी, हा तुकडा पहा. याच्या कोपऱ्याला जी खूण आहे, ती तुझीच आहे का?"

तो तुकडा हातीं घेऊन नीलमणीनें खूण पाहिली. त्यानें बाहेर पाहिलें तों झाडाच्या सांवलींत कॉन्स्टेबल बसला होता. संदिग्धपणें तो खगेन्द्राच्या तोंडाकडे पहात राहिला.

खगेन्द्र म्हणाला, "ही खूण तूंच दिलेली आहेस का? हा कपडा कुणाच्या घरचा तें मला कळायला हवं."

तो साडीचा तुकडा नीलमणीनें ओळखला होता. कृष्णदास घोष यांची नापत्ता झालेली मुलगी लीलावती हिची ती साडी होती. तिच्याबद्दल गांवांत जो बभ्रा झाला होता तोही त्याच्या कानीं आला होता. त्याला मोठा पेंच पडला. एक आवंढा गिळून तो घाबरत घाबरत म्हणाला, "जी, साहेब. ही खूण— कशी सांगूं ही खूण कुणाची ती? आपल्याला कुठं मिळाला हा तुकडा?"

खगेन्द्र चिडून म्हणाला, "हा तुकडा मला कुठं मिळाला याची उठाठेव तुला कशाला? जें विचारतोंय त्याचं सरळ उत्तर दे ना."

नीलमणी हात जोडून म्हणाला, "जी साहेब— जी साहेब. मी गरीब माणूस—"

खगेन्द्र रागावून तणतणत म्हणाला, "मर बेट्या! तूं गरीब आहेस कीं तालेवार आहेस तें कुणी विचारलं होतं तुला? ही खूण तूं दिलेली आहेस कीं नाहीं सांग. खरं सांग."

धमकावणी मिळाल्याबरोबर नीलमणी थरथर कांपूं लागला. त्यानें काकुळतीला येऊन विचारलें, "काय झालं आहे, बाबूमशाय?"

"खून झालाय्!" खगेन्द्र चटकन् बोलून गेला.

नीलमणी अगदीं रडकुंडीला आला. तो म्हणाला, "म्हणतां काय? म्हणतां काय? दीदी ठाकरूणचा खून झालाय?"

शेवटीं खगेन्द्राला जी माहिती हवी होती ती मिळाली. तरीपण खात्री करून घेण्यासाटीं तो म्हणाला, "हो खून झालाय. तुझ्या दीदी ठाकरूणचं नांव काय सांग पाहूं."

"नीलेवती! घोषालांची मुलगी नीलेवतीदीदी. अरे अरे! कुणी तिचा खून केला बाबूमशाय?"

खगेन्द्राच्या मनांतला सारा संशय आतां दूर झाला. जरा गंमत करण्याच्या उद्देशानें तो म्हणाला, "दुसरा कोण खून करणार? तुझ्या जमीदाराचा भाऊ."

"छोटेबाबू? हां हां! आम्हांला वाटलंच होतं तसं. तर मग बाबूमशाय, आतां काय होणार? आपण फुलुस का?"

"हो. मी पोलीसचा डिटेक्टिव्ह." खगेन्द्र गंभीरपणाचा आव आणून म्हणाला.

"जी. काय म्हटलंत?"

"डिटेक्टिव्ह — डिटेक्टिव्ह — तुम्ही लोक टिकटिकी म्हणतां ना — तो." असें म्हणून खगेन्द्र आपल्या मिशीला पीळ भरूं लागला.

नीलमणीनें पुन्हां एकदां बाहेर बसलेल्या कॉन्स्टेबलकडे नजर टाकली. त्यानें खगेन्द्राचे दोन्ही पाय धरले आणि काकुळतीला येऊन म्हटलें, "दुहाही हुजूर. मी गरीब माणूस — मला कांहीं कळत नाहीं. मला साक्षी द्यायच्या भानगडींत कृपा करून गुंतवूं नका. हुजुरांचे जे कपडे मीं आजवर धुतलेत त्याचे पैसे मला नकोत — हुजुरच्या पानासाठीं मीं ते दिलेत म्हणून समजा. दुहाही टिकटिकीबाबू, दया करा."

खगेन्द्र हंसला आणि म्हणाला, "बरं बरं. जा. पण खबरदार यांतला एक शब्द कुणाकडे बोलशील तर."

नीलमणीनें आपले दोन्ही कान धरून पिरगळले आणि म्हटलें, "मुळींच नाहीं हुजूर. — कुणाकडेसुद्धां बोलणार नाहीं. जीभ कापली तरी बोलणार नाहीं." असें म्हणून तो बाहेर गेला.

जातांना नीलमणी अगदीं थंडपणें जात होता. पुन्हां पुन्हां मागें वळून पहात होता. आडवळणें घेऊन तो जमीदाराच्या वाड्याच्या मागीलदारच्या

दिंडीदरवाज्यानें आंत गेला. ओटीवरच शारदाबाबू सायंसंध्या करण्यासाठीं हातपाय धुवायला आलेले होते. त्यांना पाहतांच धाडकन् त्यानें त्यांच्या पायांवर घालून घेतलें आणि म्हटलें, "हुजूर मायबाप! आपल्या अन्नावरच वाढलोंय मी — एक बातमी द्यायला आलोंय — मोठं संकट आलंय."

शारदाबाबूंनीं विचारलें, "काय झालंय रे नीलमणी?"

रडकुंडीला येऊन नीलमणी म्हणाला, "जी — भयंकर मामला आहे हुजूर. तो पुलीस का कोणसा गांवांत आलाय!"

आश्चर्यचकित होऊन शारदाबाबू म्हणाले, "कोण आलंय रे! काय आहे भानगड? कोण आलाय पोलीसचा?"

"जी. नांव विसरून गेलों हुजूर. तो पुलीस का कोणसा — डगला बिगला घालीत नाहीं तो."

शारदाबाबू अधिकच चकित होऊन म्हणाले, "डगला बिगला घालीत नाहीं कोण? वेड लागलंय का तुला?"

एक सुस्कारा सोडून नीलमणी म्हणाला, "जी. वेड लागायचाच प्रसंग आहे. हं. जी. टिकटिकी – पुलीसचा टिकटिकी गांवांत आलाय."

शाळेच्या इमारतींत जें जें कांहीं घडलें होतें तें तें सारें नीलमणीनें जमीदाराला सांगितलें. शेवटीं तो हात जोडून म्हणाला, "ही हकिकत मी तुम्हांला सांगितली हें मात्र कळूं देऊं नका कुठं हुजूर. नाहींतर गरिबाच्या जिवावर बेतेल. जन्मभर मीठ खात आलोंय आपलं, तें विसरलों नाहीं म्हणून ही बातमी द्यायला आलोंय. छोटेदादांचा जीव बचावण्यासाठीं जें कांहीं करायचं असेल तें करा."

नीलमणी निघून गेल्यावर शारदाबाबूंची सायंसंध्या तिथल्या तिथेंच राहिली. पोस्टऑफिसांत खगेन्द्र आणि दरोगा यांची झालेली भेट, आज सकाळींच पोलिसठाण्यावरून त्याच्याकडे आलेला कॉन्स्टेबल वगैरे साऱ्या बातम्या शारदाबाबूंच्या कानावर आल्या होत्या. नवीनचा कलकत्त्याचा पत्ता कळवून घेण्यासाठीं खगेन्द्रानें जी उत्कंठा दाखवली होती त्याचीही त्यांना आठवण झाली. अर्थात् नीलमणीनें सांगितलेल्या बातमीवर विश्वास न ठेवण्याजोगें कोणतेंच कारण त्यांना दिसून आलें नाहीं.

ते माडीवर गेले. त्यांनीं आपली आई आणि बहीण यांच्याबरोबर कांहीं वेळपर्यंत गुपचुप खलबत केलें. शेवटीं बैठकखान्यांत येऊन त्यांनीं एका विश्वासू कारकुनाला बोलावणें पाठवलें.

तो आल्यावर त्यांनीं त्या कारकुनाला जें कांहीं सांगायचें तें नीट पटवून दिलें. रात्रीं नवाच्या सुमाराला तो कारकून वाड्यांतून निघून गेला.

अर्ध्या तासानें तो कारकून परत आला आणि म्हणाला, " तो माणूस कांहीं केल्या पांच हजारांखालीं यायला तयार नाहीं. तो म्हणतो, कीं खुनाचा बेमालुम पुरावा आपल्या हातीं आला आहे. फक्त ती बाई कोण हेंच अजून कळलं नव्हतं तें इथं आल्यावर आतां कळलं आहे. तो म्हणाला, कीं अर्धी रक्कम – अडीच हजार रुपये आतांच मिळायला हवे – पुरावा मिळत नाहीं असा रिपोर्ट करून केस खतम् करून दिल्यावर बाकीचे अडीच हजार द्यावे लागतील. "

शारदाबाबूंनीं अन्तःपुरांत जाऊन पुन्हां कांहीं वेळ खलबत केलें आणि अडीच हजाराच्या नोटा एका पुडक्यांत बांधून आणून त्यांनीं त्या कारकुनाच्या हातीं आणून दिल्या.

मध्यान्हरात्रीं कारकून खगेन्द्रापाशीं आला. नोटा मोजून घेऊन खगेन्द्रानें त्याला अभय देऊन निरोप दिला.

बिछान्यावर पडल्या पडल्या तो हंसूं लागला. तो म्हणत होता, याला म्हणतात योगायोग !

## : ५ :

वरीच रात्र होईपर्यंत खगेन्द्राला झोंप लागली नाहीं. तो सारखा विचार करीत होता —

" ज्याअर्थीं आतां मी इथवर येऊन पोहोंचलों आहें, त्याअर्थीं आतां काहीं झालं तरी हें प्रकरण सोडणार नाहीं. हा तोतया भवेन कोण आहे हें उघडकीस आणलंच पाहिजे. पूर्वीं मला वाटलं होतं, कीं हा नवीनबाबू नव्हे. पण हें बरोबर का ?

" कलकत्त्यांतून एक पत्र आलं आहे त्यांत त्यानं आपल्या राहाण्याचा पत्ता दिला आहे, एवढ्यावरनंच नवीनबाबू बाशुलीपाड्याला जाऊन भवेंद्र

बनला नाहीं असा सिद्धांत करतां येत नाहीं. मी हा वसंतपूरला राहिलों आहें. कलकत्त्याचा मुक्काम देऊन मीं एकादं पत्र लिहिलं, तें लिफाफ्यांत घातलं, कलकत्त्याच्या कविमित्राकडे तें पाठवून देऊन तिथं तें पोस्टाच्या पेटींत टाकायची व्यवस्था केली, तर मी कलकत्त्यालाच राहिलों आहें असं ठरणार आहे ना?

"अर्थात् आतां कलकत्त्याला जाऊन तपास करायला हवा–खरोखरच त्या पत्त्यावर नवीन राहिला आहे कीं काय हें पाह्यला हवं. बरं, तिथं जाऊन असं दिसून आलं, कीं खरोखरच नवीन तिथं इतके दिवस राहिलेला आहे, तर पुढं काय करायचं?

"ही लीलावती इथून कुठं कुठं गेली, तिनं काय केलं, याचा जर पत्ता लागला तर तोतया भवेंद्राचा अस्सल परिचय मिळूं शकेल. हा तपास करायचं काम इथंच उरकायला हवं. सैरमीच्या आईला गांठून विचारायला हवं.

"पण ती खरी हकीकत सांगेल का? लीलावतीचा खून झालेला आहे, डिटेक्टिव्ह या नात्यानें तो तपास करण्यासाठीं मीं इथें आलों आहें, ही बातमी उद्यां गांवभर पसरल्यावांचून रहाणार नाहीं. अर्थात् सैरमीच्या आईकडून कुठलीही बातमी मिळणं कठीण जाईल. खरोखरच जर मी पोलिस असतों, माझ्याबरोबर चारदोन कॉन्स्टेबल आणि चौकीदार असते, हातकड्या असल्या, कुणाला कोठडींत डांबतां आलं असतं तर भीति दाखवून किंवा समज देऊन कुठल्या ना कुठल्या तरी मार्गानं तिची कबुली मिळवतां आली असती.

"माझ्यापाशीं यांतलं कांहीं नाहीं–ढाल नाहीं, तलवार नाहीं आणि मी झालोंय निधिराम सरदार. आतां यापुढं काय करायचं?"

तो बिछान्यावरून उठला. त्यानें दिवा पेटवला. कांहीं वेळपर्यंत खोलींतल्या खोलींत तो येरझारा घालीत होता. फिरतांफिरतां सहज त्याची नजर दरोग्याकडून आलेल्या शेवटच्या पत्रावर पडली.

त्यानें तें पत्र उघडलें आणि पुन्हां एकदां वाचलें. तो आपल्याशींच बोलूं लागला, "हेंच तर! हेंच कसं विसरलों मी! हा एक अस्सल पोलिस आहेच. आतां माझ्यापाशीं भरपूर पैसाही आहे. या माणसाला जैसे चारून हें काम पुरं करतां नाहीं का यायचं? पण हा बेटा 'पान' खात नाहीं! त्याला काय करायचं?"

कांहींवेळपर्यंत तो तसाच येरझारा घालीत होता. पुन्हां दिवा मालवून तो बिछान्यावर पडला. बिछान्यावर पडल्यापडल्या तो विचार करीत होता. “ हा बेटा, ‘ पान ’ खात नाहीं – उलट काव्य वाचतो. मी पुस्तक छापतों आहें असं कळलं तेव्हां त्यानं पहिला प्रश्न केला, कीं तें काव्य आहे कीं कादंबरी आहे ? बरं, असं केलं तर नाहीं का चालायचं, हा माणूस नव्या जमान्यांतला दिसतो. कॉलेजांत शिकलेला आहे म्हणे ! मीं जर एकादी प्रेमकथा बनवली अन् जर याला सांगितली – जसं कांहीं मीच तो नायक – हें रहस्य उलगडलं तर आम्हां दोघांचं मीलन व्हायचा संभव आहे, तर खरोखर त्याचं मन विरघळेल. अन् तो शिपाई अन् हातकड्या घेऊन खात्रीनं मला मदत करायला धांवेल.

“ आतां हें ठीक जमलं. आतां ही कथा कशी तयार करायची ? आहे हीच कथा घ्यायची – थोडीशी उलटापालट करायची – यांतच थोडासा बदल करायचा – कुठंकुठं थोडीशी वाढवायची अन् जरूर तिथं कुठलाकुठला भाग गाळायचा–असं केलं कीं सारं कांहीं ठीक होईल. ”

त्या रात्रीं खगेनला झोंप लागायला जवळजवळ तीन वाजले.

दुसऱ्या दिवशीं तो सात वाजतां जागा झाला. चहाफराळ करून तो गाजनतोल्याच्या पोलीसठाण्याकडे जाण्यासाठीं पायीपायींच निघाला.

वसंतपूरपासून गाजनतोला दीड कोस दूर होतें. तो ज्यावेळीं ठाण्यावर जाऊन पोंचला त्यावेळीं दरोगाबाबू अजूनही घरांतून बाहेर आले नव्हते. आपण आल्याची बातमी नोकराकरवीं कळवून खगेन त्यांच्या बैठकीवर बसून राहिला.

थोड्या वेळानें अंगांत नुसता गंजीफ्राक घालून दरोगाबाबू हंसत हंसत बाहेर आले. त्यांच्या हातीं एक मासिकपुस्तकाचा नवा अंक होता. खगेन्द्राचें स्वागत करून ते म्हणाले, “ एक प्याला चहा घ्याल का ? ”

खगेन्द्र म्हणाला, “ धन्यवाद ! एक वेळ चहा घेऊनच मी निघालों तिथून. ”

“ एवढा हा रस्ता पायांखालीं घालून आलां. थकलांहांत. आणखी एकदां होऊन जाऊं दे की. ”

खगेन्द्रानें संमति दिली. नोकराला चहा आणायला सांगून दरोगाबाबूंनीं तिथें बैठक मारली.

चारदोन शिष्टाचाराच्या गोष्टी झाल्यावर दरोगाबाबू म्हणाले, "इतक्या लवकर उठून कां आलां उगीच? आपल्या 'जमीदार चरितमाले'चे ग्राहक दहा वाजायच्या आधीं कांहीं इथं येऊन पोंचायचे नाहींत."

उगीच थोडेंसें हंसून खगेन्द्र म्हणाला, "मी जी ही वंगीय जमीदार चरितमालेची जाहिरात दिली आहे तें नुसतं ढोंग आहे!"

दरोगाबाबू मोठ्या कौतुकानें खगेन्द्राच्या तोंडाकडे पाहात राहिले होते. ते म्हणाले, "तें मला माहीत आहे."

त्यांच्या या उत्तरानें खगेन जसा चकित झाला, तसाच साशंकही झाला. त्यानें चटकन् विचारलें, "काय माहीत आहे? कसं माहीत झालं तुम्हांला?"

दरोगाबाबू म्हणाले, "त्या दिवशीं पोस्टऑफिसांत आपल्याबरोबर बोलत बसलों होतों त्यावरून माझ्या मनांत थोडासा संशय उत्पन्न झाला. म्हणून मीं तो आपल्या जाहिरातीचा कागद कलकत्त्याच्या पोलीस कमिशनरकडे पाठवून दिला. त्या जाहिरातींत जो पत्ता दिला आहे, त्या जागीं कुठलीच पब्लिशिंग फर्म नाहीं, कीं कलकत्त्याच्या कुठल्याही छापखान्यांत त्या नांवाचं पुस्तक कुणीही छापायला दिलेलं नाहीं, अशी कलकत्त्याहून कालच मला तार आली आहे."

खगेन्द्राच्या काळजांत धडकी भरली. तो घाबरला होता खरा, पण तसें बाहेर न दिसूं देण्याचा शक्य तेवढा प्रयत्न करून तो म्हणाला, "आणखी काय काय कळलंय तुम्हांला?"

दरोगाबाबू हंसले आणि म्हणाले, "आणखी कळलंय् तें एवढंच, कीं आपण कांहीं फरारी असामी नाहीं—बदमाषांच्या यादींतही आपलं नांव नाहीं."

खगेन घाबरून म्हणाला "आणखी कांहीं?"

"आणखी कांहीं अजूनपर्यंत तरी कळलेलं नाहीं."

तें ऐकून खगेन्द्रचा जीव बराचसा खालीं पडला. तो म्हणाला, "माझ्याबद्दल जर तुमच्या मनांत असा संशय उत्पन्न झाला होता, तर मग माझ्या पुस्तकासाठीं ग्राहक मिळवायची खटपट आपण कां केली? अन् मला बोलवायला पाठवलंत तरी कां म्हणून?"

दरोगा म्हणाले, "ज्यावेळीं मीं तुम्हांला बोलवायला पाठवलं, त्यावेळीं कलकत्त्याची तार आली नव्हती. तशीच कांहीं तार आली असती तर

आपला शोध करण्यासाठीं कुठं कशाला जायचं? म्हणून आपल्याला बोलावणें पाठवलं. पुस्तकाला ग्राहक आहेत असं जें सांगितलं तें आपल्याच भाषेंत बोलायचं म्हणजे नुसतं ढोंग होतं!" असें म्हणून दरोगाबाबू मोठमोठ्यानें हसूं लागले.

खगेंद्र मात्र हंसला नाहीं. तोंड वांकडें करून मान खालीं घालून तो मुकाट्यानें बसला होता.

दरोगाबाबू त्याच्या तोंडाकडे पाहात होते. ते ओशाळले आणि म्हणाले, "आपल्याला राग आला का खगेनबाबू? असं पहा, आम्हीं पोलीसचीं माणसं, कुणाचाही संशय घेणं हाच आमचा व्यवसाय. मीं नुसतं सरकारी नोकराचं कर्तव्य बजावलं आहे एवढंच. ह्याचं आपल्याला एवढं वाईट कां वाटलं?"

खगेन वर न पहातांच म्हणाला, "तें तर खरंच!"

दरोगाबाबू थोड्याशा आपुलकीच्या भाषेनें म्हणाले, "तर मग आपण असे चेहरा पाडून कां राहिलां आहां?"

खगेननें आतां वर नजर करून पाहिलें. तो शांतपणें बोलत होता, तो म्हणाला, "आपण चोर बदमाष म्हणून माझा संशय घेतलात, याचं मला मुळींच वाईट वाटलं नाहीं. तें कर्तव्यच आहे तुमचं! पण मीं एक आशा मनांत बाळगून आपल्यापाशीं आलों होतों, ती आशा फुकट जाणार असें दिसल्यामुळं माझं मन थोडंसं खट्टू झालं आहे."

दरोगाबाबू आश्चर्यचकित होऊन म्हणाले. "माझ्याकडे आलां होतां तें कांहीं आशा धरून का? कोणत्या बाबतींत?"

"मी या भागांत आलों होतों तो एका विशेष बाबतींत तपास करण्यासाठीं—माझं सारं सुखदुःख त्यावरच अवलंबून आहे म्हणून. आपण पोलीसचे अधिकारी. आपली मदत मिळाली तर ह्या बाबतींतली बातमी काढून मिळेल अशी माझी अपेक्षा होती."

दरोगाबाबू म्हणाले, "मीं तपास करून कांहीं बातमी काढायला हवी का? मला कांहीं अंदाज येत नाहीं तुमच्या बोलण्याचा. असं पहा खगेनबाबू, आपलं खरं नांव खगेनबाबूच आहे ना?—आपली आशा दुगवली असं आपल्याला कां वाटलं तें जर मला उघड करून सांगाल तर माझ्याकडून तुम्हांला कांहीं मदत होईल कीं नाहीं तें मी तुम्हांला सांगूं शकेन."

खगेन म्हणाला, "मीं जें माझं नांव सांगितलं तें खरं आहे कीं खोटं आहे याची अजूनही आपल्याला शंका वाटत असेल, तर आपल्याकडून मला कांहीं मदत होईल असं मला तरी कसं वाटेल ?"

नोकर चहा घेऊन आला. चहाच्या पेल्यांत चमचा फिरवीत फिरवीत खगेन म्हणाला, "या बाजूला मला कुणीही ओळखीत नाहीं. माझं खरं नांव खगेन्द्रनाथ बंदोपाध्याय आहे हें सिद्ध करून देण्यासाठीं मला इथं कुणी मिळण्याचा संभव नाहीं."

थोडावेळ विचार करून दरोगाबाबू म्हणाले, "माझ्याकडून आपलं जर कुठलं काम होत असेल — म्हणजे कोणत्याही आडमार्गानं न जातां — मला जर आपल्यास कांहीं मदत करतां येत असेल तर ती मी अवश्य करीन. आपल्या खऱ्याखोट्या नांवासाठीं मी अडून बसणार नाहीं."

खगेन्द्र म्हणाला, "मला मदत करण्यासाठीं कोणत्याही आडमार्गाला जायची कांहीं जरुरी नाहीं. हें काम आपण केलंत तर नुसतं मलाच नव्हे, तर बंगाल देशांतल्या एक जुन्या खानदानी घराण्याला आपण कायमचं ऋणाईत केल्यासारखं होईल."

दरोगाबाबू म्हणाले, "प्रकरण काय आहे, तें मला नीट उघड करून सांगा."

खगेननें चहाचा पेला तोंडाला लावला. एकदोन घोट घेऊन तो म्हणाला, "मी सारं कांहीं उघड करून सांगतों आतां."

त्यानें चहाचा पेला रिकामा करून खालीं ठेवला आणि रुमालानें तोंड पुशीत तो म्हणाला, "एक पुरुष आणि एक स्त्री एका जागीं जाऊन एक भयंकर कारस्थान करताहेत. त्यांचं हें कारस्थान मला मोडून घालायचं आहे. ती स्त्री कोण आहे त्याचा मी इथं आल्यावर पत्ता लावला आहे — पण पुरुष कोण आहे तें अजून मला निच्छितपणें कळलं नाहीं."

दरोगाबाबू म्हणाले, "कुठं चाललंय् हें कारस्थान ?"

खगेन म्हणाला, "माफ करा. सध्यां तें मला सांगतां येत नाहीं. एवढंच सांगून ठेवतों, कीं ती जागा इथून फारच दूर अंतरावर आहे. या जिल्ह्यांत नाहीं, कीं या डिव्हिजनमधेंही नाहीं."

"ही स्त्री कोण आहे ?"

" वसंतपूरच्या कृष्णदास घोषालची मुलगी लीलावती. तिचा हा पत्ता मला कसा लागला, तें मी सांगतों — " असें म्हणून साडीच्या पदराचा तुकडा काढून आणल्यापासून नीलमणी धोब्यानें तो ओळखीपर्यंतची सारी हकीकत त्यानें दरोगाबाबूला सांगितली.

ती हकीकत ऐकून दरोगाजी हंसूं लागले. " आपण इंग्रजी डिटेक्टिव्ह गोष्टी खूप वाचतां वाटतं ? दुसरे शेरलॉक होमच आहांत कीं तुम्हीं ? "

खगेन्द्र म्हणाला, " शेरलॉक होमची प्रतिभा माझ्याठायीं असती, तर मग माझं काम केव्हांच झालं असतं. "

हातांतल्या मासिकाचीं पानें चाळीत चाळीत दरोगाबाबूंनीं विचारलें, " आपण असं म्हटलंत, कीं पुरुष कोण त्याचा नक्की पत्ता अजून आपल्याला लागला नाहीं. तरीपण कुणाबद्दल तरी आपल्याला संशय आला आहे का ? "

खगेन्द्र म्हणाला, " होय. ज्या रात्रीं लीलावती तिच्या सासुरवाडीहून म्हणजे मैनामती गांवांतून पसार झाली, त्याच रात्रीं आपल्या या गाजनतोल्याच्या जवळपास वसंतपूरच्या सैरभीची आई नांवाच्या एका बाईबरोबर जमीदार शारदाचरणबाबूचा धाकटा भाऊ नवीन जात असलेला दिसून आला होता. त्या रात्रीपासून तोही नापत्ता झाला आहे. म्हणूनच मला संशय आला, कीं ती लीलावती या नवीनबरोबरच पळून गेली असावी आणि त्या दोघांनीं हें कारस्थान पुढं घडवलं असावं. "

दरोगाबाबूंनीं एका नोकराला हांक मारली आणि म्हटलं, " जा रे, मुनशी-बाबूकडून गेल्या ४-५ महिन्यांच्या साऱ्या स्टेशनडायऱ्या घेऊन ये. "

खगेन म्हणाला, " या बाबतींत कांहीं नोंद आहे का ? "

ह्या प्रश्नाचें उत्तर न देतां दरोगाबाबू म्हणाले, " आपण जें हें कारस्थान मोडूं पहातां आहां, अन् त्याच्यासाठीं जो हा तपास तुम्हीं चालवला आहे, तो केवळ धर्मभावनेनं, परक्यावर उपकार करण्यासाठीं का ? "

खगेन्द्र म्हणाला, " तसंच कांहीं नव्हे. त्यांत माझाही बराच स्वार्थ आहे. "

" तो कसा काय ? "

खगेन्द्रानें जी कल्पित कादंबरी दरोगाबाबूला सांगितली ती अशी :—

एका जमीदाराचा एकुलता एक मुलगा होता. पुरीच्या रथयात्रेला गेल्यावेळीं तो नाहींसा झाला होता. या गोष्टीला २५ वर्षे झालीं. जमीदारबाबूंची पत्नी स्वर्गवासी झाल्यावर बऱ्याच प्रौढवयांत त्यांनीं दुसरं लग्न केलं. त्या स्त्रीच्या पोटीं त्यांना एक मुलगी झाली. या मुलीचा आणि खगेंद्राचा परिचय झाला अन् त्यांतून प्रेम निर्माण झालं. घरीं एक मडम ठेवून जमीदारबाबूंनीं त्या मुलीला इंग्रजी शिकवलं आणि खगेन्द्र तिला बंगाली शिकवीत असे. दोन वर्षांपूर्वी हे जमीदार स्वर्गवासी झाले. मरण्यापूर्वी त्यांनीं मृत्युपत्र करून ठेवलें होतें. मुलीला सोळा वर्षे पुरीं झालीं म्हणजे खगेन्द्राबरोबर तिचा विवाह व्हावा आणि त्या दोघांत संपत्तीची सारखी वांटणी व्हावी. तोंपर्यंत त्यांच्या दिवाणजींनीं मुलीचा पालक या नात्यानें इस्टेटीची व्यवस्था पाहावी असें त्या मृत्युपत्रांत लिहिलें होतें. — त्या मुलीचें वय आज १५ वर्षें आहे. फार दिवस मनांत बाळगलेली इच्छा आणखी एक वर्षानं पुरी झाली असती, पण दोन महिने झाले, एक व्यक्ति हजर झाली आहे अन् ती म्हणते आहे, कीं जगन्नाथपुरींत नाहींसा झालेला जमीदारांचा वारस तो मीच. गांवचे चार दोन प्रतिष्ठित लोक आणि कांहीं असंतुष्टसे जमीदाराचे नातलग यांना हाताशीं घेऊन हा माणूस इस्टेट ताब्यांत घेण्यासाठीं दावा लावण्याच्या खटपटींत आहे. हा माणूस येण्याच्या कांहीं दिवसांपूर्वी त्या जमीदाराच्या अंतःपुरांत एक अपरिचित स्त्री आपण अनाथ असल्याचें सांगून घुसली होती आणि तिला तिथें आश्रय मिळाला होता. आतां असें उघडकीस आलें आहे, कीं ही स्त्री या पुरुषाला पत्र लिहून गुपचूप जमीदाराच्या घरांतल्या बऱ्याचशा बातम्या कळवीत असते. ती स्त्री म्हणजेच लीलावती, हें नीलमणी घोष्याच्या द्वारें आतां शाबीत झालें आहे. पण हा पुरुष कोण तें जर कळलें तर साऱ्या गोष्टीचा उलगडा होईल.

नवे दरोगाबाबू आश्चर्यचकित होऊन ही कथा ऐकत होते. शेवटीं ते म्हणाले, “ही तर एक अस्सल कादंबरीच वाटतेय की! मोठी विलक्षण हकीकत आहे ही, खगेनबाबू!”

खगेनला वाटलें, औषध नीट लागूं पडलें खास.

तितक्यांत एक कॉन्स्टेबल बऱ्याचशा स्टेशन-डायरीच्या वह्या घेऊन आला आणि त्यानें त्या दरोगाबाबूंच्या पुढें ठेवल्या. कांहीं वेळपर्यंत ते त्या डायऱ्यांचीं पानें उलटीत होते. एका पानावर ते काळजीपूर्वक लक्ष देऊन वाचूं

लागले. वहीवरची नजर दूर न करतां त्यांनीं विचारलें, "काय म्हटलंत त्या बाईचं नांव ? कोणाची आई ?"

खगेन म्हणाला, "सैरभीची आई."

दरोगाबाबू हळूच हंसून म्हणाले, "हें पहा —"

त्या डायरींत लिहिलें होतें —मैनामती गांवचा चौकीदार बशीरद्दी शेख याचा रिपोर्ट—गेल्या रात्रीं मी नोंद देण्यासाठीं बाहेर गेलों होतों. मैनामती आणि गाजनतोला यांच्या सरहद्दीशेजारीं दोन बायका संशयास्पद रीतीनें जात असल्याचें मी पाहिलें.

चौकीदारानें विचारल्यावर त्यांनीं जीं जीं उत्तरें दिलीं त्यांचीही नोंद डायरींत केलेली होती.

तें वाचल्यावर खगेन्द्र म्हणाला, "तर मग माझा संशय एकंदरींत खरा होता म्हणायचा. लीलावती नवीनबरोबरच पळून गेली खास."

दरोगाबाबू म्हणाले, "मलाही तसंच वाटतं."

बराच वेळपर्यंत याच विषयाची चर्चा चालू होती. दरोगाबाबू खगेन्द्राला विचारतांना, 'तुमची हरकत नसली तर विचारतों' अशा वाक्यानें सुरवात करून त्या जहागिरदाराच्या काल्पनिक मुलीची कथा त्याला विचारून घेऊं लागले होते. ती सर्व कथा विचारून घेण्यासाठीं त्यांना बरेच आडवे तिडवे प्रश्न विचारावे लागले. या प्रश्नांचीं उत्तरें देतांना खगेन्द्र शक्य तितकें अभिनयकौशल्य दाखवीत होता. केव्हां तो लाजत होता, तर केव्हां आवाजांत कंप आणून गहिंवरल्याचा अभिनय करीत होता.

खगेन्द्रानें दिलेल्या उत्तरांवरून दरोगाबाबूंनीं निष्कर्ष काढला, कीं ती जहागिरदाराची मुलगी रूपानें लक्ष्मी, आणि गुणानें सरस्वती असावी. त्या दोघांचें प्रेम म्हणजे स्वर्गीय वस्तु—या मर्त्यलोकांत त्याला तुलना नाहीं.

या सर्व चर्चेचा परिणाम असा झाला, कीं कोणत्याही प्रकारें कायद्याचें उल्लंघन न करतां स्वतःच्या अधिकारक्षेत्रांत खगेन्द्राला जेवढी मदत करतां येईल तेवढी करायचें दरोगाबाबूंनीं अभिवचन दिलें.

: ६ :

यानंतर झालेला कांहीं महत्त्वाचा पत्रव्यवहार जशाचा तसाच देणें अवश्य आहे.

( १ )

वसंतपूर
२५ ज्येष्ठ

प्रिय भगिनी कनकलता,

तुला शेवटचें पत्र लिहिल्यानंतर बऱ्याच नव्या गोष्टी मला कळून आल्या आहेत. इथले दरोगाबाबू माझे एक परममित्र आहेत. त्यांच्या मदतीनें सैरभीच्या आईला रीतसर समज देऊन बऱ्याचशा गोष्टी उघडकीस आणतां आल्या आहेत. ती बेटी काय सहज सांगणार होती ? पोलीस शिपायानें ज्यावेळीं तिच्या हातांत घालण्यासाठीं हातकड्या बाहेर काढल्या त्यावेळीं त्या बयेचें तोंड उघडलें. नवीनचंद्रानें तिला पैसे चारून मैनामती गांवीं पाठवून दिलें होतें. तिथें ती गेली. तिनें एका निर्जन तळ्याच्या घाटावर लीलावतीला गांठलें आणि सांगितलें, कीं तुझी आई अत्यवस्थ आजारी आहे. तुझ्या सासरचीं माणसें तुला पाठवणार नाहींत असें वाटल्यामुळें तुझ्या आईनें डोली आणि भोई पाठवून दिले आहेत. ते गांवाच्या बाहेर थांबले आहेत. रात्रीं दहा वाजतां मी तुमच्या दिंडीदरवाज्यापाशीं येऊन तुमची वाट पाहीन. तुम्हीं बाहेर आलांत, कीं तुम्हांला डोलींतून घेऊन जाऊन आईची भेट करवून देईन आणि लगेच परत आणून पोहोंचवीन. सैरभीच्या आईच्या शब्दावर विश्वासून ती तिच्याबरोबर निघाली. गांवाच्या बाहेर आल्यावर एका वडाच्या झाडाच्या छायेखालीं एक बैलगाडी असलेली त्यांना दिसली. नवीनबाबू ती गाडी घेऊन वाट पहात राहिला होता. त्यानें लीलावतीला पकडलें, तोंडांत बोळा दिला आणि तिला गाडींत घालून तो चालता झाला. त्या गाडीवाल्याचें नांव बलाई घोष असल्याचें सैरभीच्या आईनें सांगितलें. दरोगाबाबूंनीं बलाई घोषला धरून आणून विचारून घेतलें. त्यानेंही सैरभीच्या आईनें सांगितल्या हकिकतीप्रमाणेंच लीलावतीच्या तोंडांत बोळा देऊन तिला गाडींत घालून

नेल्याचें सांगितलें. त्याच्याकडून आणखीही कांहीं माहिती मिळाली. त्यानें सांगितलें कीं, नयनपूरजवळच्या एका बागेंतल्या घरांत नवीनबाबू तिला घेऊन गेला. उद्यां मी आणि दरोगाबाबू नयनपूरला जाणार आहोंत. तिथली हकिकत कळल्यावर मी ही तुला कळवीनच.

तुझा आवडता बंधू,
खगेन्द्रदादा

( २ )

वसन्तपूर
२७ ज्येष्ठ

प्रिय भगिनी,

परवांच्या रोजीं मीं तुला पत्र लिहिलें आहे तें तुला पोंचलें असेलच. दरोगाबाबूंनीं नयनपूरला जातांना मला बरोबर नेलें नाहीं. ते एकटेच तिकडे गेले होते. त्यांनीं बागेंतल्या घरांत चौकशी केली. परत आल्यावर त्यांनीं मला हकिकत सांगितली ती अशी —

लीलावतीला जवळ जवळ एक महिना त्या बागेंतल्या घरांत कोंडून ठेवलें होतें. नवीन मधून मधून येत असे आणि लीलावतीची मनधरणी करीत असे. लीला मात्र सदोदित रडत ओरडत राही. नवीन आला म्हणजे ती म्हणे, कीं माझ्या जवळपास तुम्हीं आलांत तर मी गच्चीवरून खालीं उडी घेईन. सुमारें एक महिन्यानंतर एके दिवशीं रात्रीं नवीन लीलाला घेऊन कलकत्त्याला गेला. तिथून होडींत बसून तो कुठें गेला त्याचा पत्ता अजून लागला नाहीं.

दरोगाबाबूची मदत मिळाली नसती, तर ही हकिकत मला कळणें कठिण होतें. योगायोगानें कालन्याच्या पोलीसठाण्याचा इन्स्पेक्टर आमच्या दरोगाबाबूचा मित्र निघाला. त्यांना पत्र देऊन दरोगाबाबू मला तिकडे पाठविणार आहेत. कालन्याला गेल्यावर तिथल्या इन्स्पेक्टरच्या मदतीनें मी तिथल्या होडीवाल्याकडून माहिती काढीन तेव्हां ते लोक तिथून कुणीकडे गेले तें कळून येईल.

आजपर्यंत जी माहिती मिळाली आहे, त्यावरून असें दिसून येत आहे कीं, लीलावती ऊर्फ सुरबाला नवीनच्या पकडींतून सुटून पळून गेली असावी. त्यानंतर तोतया भवेन्द्राची आणि तिची कुठेंतरी गांठ पडली असावी. हें कारस्थान करायचें ठरल्यावर नंतर ती तिकडे गेली असावी. इतक्यांत तुला त्या बाबतींत जर कांहीं माहिती मिळाली तर कालन्याच्या पोलीस इन्स्पेक्टरच्या पत्त्यावर मला पत्र पाठवून कळवीत जा.

तुझा बंधू
खगेन्द्रदादा

( ३ )

बाशुलीपाडा
३१ ज्येष्ठ

प्रणामपूर्वक निवेदन,

परमपूजनीय दादामहाशय यांसी—पत्रद्वारां माझे बहु बहु प्रणाम. आपल्या चरणांच्या आशीर्वादेंकरून या भगिनीचें प्राणाधिक मंगल विशेष—पहा, ठीक झालें कीं नाहीं ! वडील माणसांना जेवढा मान द्यायचा आणि भक्तिश्रद्धा प्रदर्शित करायची तेवढी करण्यांत माझ्याकडून चूक झाली नाहीं हें आतां सिद्ध झालें आहे.

आपलीं दोन्ही पत्रें मला मिळालीं. मला एक बातमी मिळाली आहे. जो आज भवेन्द्राचें सोंग घेऊन आला आहे तो पूर्वी तीनतारिया येथील मठांत महन्त होता. बाबू एक दिवस दिवाणजीबरोबर बोलत बसले होते. त्यांच्या बोलण्यांत ही गोष्ट सहज निघून गेली. मी आड राहून तें भाषण ऐकत होतें, पण हें तीनतारिया गांव कुठें आहे तें त्यांच्या बोलण्यांत स्पष्ट झालें नव्हतें.

या घरचीं सर्व मंडळी खुशाल आहेत. भवेन्द्रबाबू कुणी का असेना—खरा असो कीं तोतया असो, तो वधूराणीच्या प्रेमांत खरोखरच गुंतून पडला आहे. मधें ती तापानें आजारी पडली होती. एके दिवशीं तिची प्रकृति काळजी करण्याजोगी झाली होती त्या दिवशीं तिच्या बिछान्याच्या शेजारीं खुर्ची टाकून तो बसून राहिला होता. मी अचानक आंत गेलें आणि पाहिलें

तों त्याच्या डोळ्यांवाटे टप्टप् आंसवें गळत होतीं. कुणीही कुणावरही खरोखरच प्रेम केलेलें पाहिलें कीं मला खरोखर अंतःकरणपूर्वक आनंद होतो
आपली खुशाली जरूर कळवावी.

आपली आवडती बहीण
कनकलता

(४)

कालना
६ आषाढ

प्रिय भगिनी,

तुझें पत्र आलें त्याला बरेच दिवस झाले. त्या पत्रांत तूं लिहिलें होतेंस, कीं हा तोतया भवेन्द्र पूर्वी तीनतारिया मठांत रहात होता, पण तें गांव कुठें आहे तें तुला निश्चितपणें कळलें नाहीं. पोस्टाची गाईड मीं नीट चाळून पाहिली, पण त्या नांवाचें पोस्टऑफिस त्यांत सांपडलें नाहीं. कसें का असेना, शक्य तितक्या लवकर त्या गांवाचा पत्ता मला लवकर लागला पाहिजे.

इथें आल्यावर इन्स्पेक्टर बाबूंच्या मदतीनें होडीवाल्या लोकांकडून जी माहिती मला मिळवतां आली तीवरून हें रहस्य अधिकाधिक बिकट होत आहे असें दिसतें. दरीबुल्ला नावाच्या नांवाड्यानें असें सांगितलें कीं, एक प्रतिष्ठित बाबू एक आजारी बाईला घेऊन त्याच्या होडीवर राह्यला होता. ती बाई या बाबूचा तिटकारा करीत होती असें दिसून येत होतें. ती सदोदित रडत ओरडत असे. एकाद्या दिवशीं ती जेवीत असे, तर केव्हां उपाशी रहात असे. बाबूला जवळपास येऊं देत नसे. एके दिवशीं तिसऱ्या प्रहरीं एकाएकीं होडींत कुणीतरी आरडाओरडा केला, ‘सुरी आणा. सुरी आणा.’ त्या बाईनें आत्महत्त्या करण्याच्या उद्देशानें गळ्याला दोरीचा फांस लावला होता. तें पाहतांच बाबूंच्या तोंडचें पाणी पळालें. त्यादिवशीं त्या सर्वांनीं मिळून दोरी कापून तिला खालीं उतरविलें. ती बाई पहिल्यानें बराच वेळ बेशुद्ध होती. बरेचसे उपाय केल्यावर संध्याकाळच्यानंतर ती शुद्धीवर आली. होडींत ती एकटीच झोंपत असे. त्यादिवशींही ती एकटीच होती. ते बाबू छपरीच्या बाहेर झोंपत असत. पहांटे उठून पहातात तर ती बाई नाहींशी

झाली होती. एक नावाड्यानें सांगितलें कीं, दिवाणगंजच्या आगेमागें कुठेंतरी रात्रीं तिसऱ्या प्रहरच्या सुमारास पाण्यांत कुणीतरी पडल्याचा धपकन् झालेला आवाज त्यांनीं ऐकला. पाण्यांतला एकादा मोठा मासा वर आला तर असाच आवाज येतो, तसेंच असेल असें समजून त्यानें तिकडे लक्ष दिलें नव्हतें. त्यावरून असा अन्दाज होतो, कीं पळायच्या म्हणा कीं आत्महत्त्येच्या म्हणा, उद्देशानें तिनें पाण्यांत उडी घेतली असावी. तो दिवस दोलयात्रेचा होता असें दरिबुल्ला म्हणतो. पंचांगांत पाहिलें त्यावरून असें दिसून आलें, कीं ती तिथी २९ वी फाल्गुन होती. सुरबाला कोणत्या दिवशीं बागेंतल्या घाटावर सांपडली त्याबद्दल तपास करून मला जरूर कळीव, म्हणजे नावाड्यानें सांगितलेला तो बाबू आणि ती बाई म्हणजेच नवीन आणि सुरबाला हींच होती कीं नाहीं तें ठरवितां येईल.

तुझा स्नेहांकित
दादा

(५)

बाशुलीपाडा
१० वी आषाढ

प्रिय खगेन्द्रबाबू,

पत्र पोहोंचलें. घाईघाईत एकाच ओळींत लिहीत आहें. दोलयात्रेच्या दुसऱ्याच दिवशीं सकाळीं सुरबाला बागेंतल्या घाटावर सांपडली होती.

आपली
कनक

(६)

कलकत्ता
२० वी अषाढ

तुझें पत्र पोंचलें. तें वाचून मी बराच हताश झालों. आतां स्पष्टपणें दिसून आलें आहे, कीं सुरबाला ही तोतया भवेन्द्राशीं संगनमत करून आलेली नाहीं.

तिच्या बाबतींत तपास करण्यासाठीं जे परिश्रम केले ते सर्व फुकट गेले आहेत. हा तोतया भवेन्द्र कोण त्याचा अजून कांहींच निर्णय लागला नाहीं.

कलकत्त्याला आल्यानंतर नवीनचंद्राचा पत्ता काढण्यासाठीं गेलों होतों. त्याच्या घरीं जाऊन चौकशी केली त्यावेळीं कळलें, कीं कांहीं दिवसांपूर्वी घोड्याची गाडी उलटून त्याला जबर दुखापत झाली आहे आणि तो मेडिकल कॉलेजच्या हॉस्पिटलमध्यें पडून आहे. तिथें त्याला भेटायचा मीं प्रयत्न केला. पण काल तो मरण पावल्याचें कळलें. मरायच्यापूर्वी त्यानें हॉस्पिटलमध्यें वकिलाला बोलावून आपलें मृत्युपत्र केलें. त्यांत त्यानें लिहिलें आहे, कीं लीलावतीवर अत्याचार करायचा आपण जो प्रयत्न केला त्याच पापाचें प्रायश्चित्त आपल्याला मिळत आहे. देवाच्या दयेनें त्यानें केलेल्या प्रयत्नाला यश आलें नाहीं. लीलावती सती आहे, निष्पाप आहे, असेंही त्यानें त्या मृत्युपत्रांत लिहून आपल्या वांट्याच्या इस्टेटींतील अर्धा भाग आपण केलेल्या पापाचें प्रायश्चित्त म्हणून त्यानें लीलावतीला दान केला आहे. बाकीचा अर्धा भाग त्यानें आपल्या भावाच्या मुलांत वांटून दिला आहे. या मृत्युपत्रावर त्यावेळीं मी हजर असल्यामुळें माझी साक्ष आहे.

उद्यां सकाळीं मी काशीला जाणार आहें. तिथें बरेच साधू-संन्यासी असतात. तीनतारिया मठ कुठें आहे याचा पत्ता मी त्या लोकांकडून काढण्याचा प्रयत्न करणार आहें. त्या मठांत गेल्यावर हा भवेन्द्र कोण याचा निर्णय लागेल अशी मला आशा आहे.

तुझा स्नेहांकित
खगेन्द्र

( ७ )

कलकत्ता
१५ वी श्रावण

प्रिय कनक,

माझे इतक्या दिवसाचे परिश्रम शेवटीं सफल झाले. काशीला चौकशी करून मी तीनतारिया मठांत गेलों. त्यांचा भूतपूर्व महन्त बाशुलीपाड्याला

रहाणारा भवेन्द्रच होता असें तिथें कळलें. थोड्या दिवसांनीं मी परत येईन असें सांगून गेल्या फाल्गुन महिन्यांत तो बंगाल देशांत जायला निघाला होता. त्याच्या शिष्यांना बरेच दिवस त्याची कांहीं बातमी कळली नाहीं म्हणून कलकत्त्याला येऊन तपास केला. पोलीसांकडे आणि रेल्वेऑफीसांत चौकशी करून त्या शिष्यांना असें कळून आलें, कीं त्याच सुमारास खुश्रुपूर स्टेशनवर एका संन्याशाचा मुडदा गाडींतून उतरून टाकला होता. त्या संन्याशाची पेटी वगैरे सामान रेल्वेच्या ऑफीसांत जमा झालें होतें तें त्या शिष्यांनीं पाहिलें आणि तें त्या महन्ताचेंच असल्याचें ओळखलें.

याबाबतींत अधिक तपास करण्यासाठीं मी खुश्रुपुरला गेलों होतों. संन्याशाचा मृतदेह गाडींतून त्या स्टेशनवर उतरल्याची हकिकत तिथें कळली. आणखीही हकिकत कळली ती अशी—ज्यावेळीं हा मृतदेह स्टेशनवर उतरला गेला त्यावेळीं लीलावतीचा नवरा, मैनामतीला राहणारा राखाल भट्टाचार्य हाच ड्यूटीवर होता. तो मृतदेह सारी रात्र त्याच्याच ताब्यांत होता. त्यानंतर कांहीं दिवसांनीं नोकरी सोडून राखाल हा काशीयात्रेला निघून गेला.

खुश्रुपूर येथून मी मैनामतीला गेलों. तिथें राखालचा एक मोठा भाऊ आहे. आजतागायत त्यांना राखालची कोणतीच बातमी कळलेली नाहीं. तो जिवंत आहे कीं मेला आहे याचाही त्यांना पत्ता नाहीं.

या सर्व तपासावरून आतां स्पष्टपणें सिद्ध झालें आहे, कीं या मेलेल्या संन्याशाच्या कागदपत्रावरून राखालला त्याचें नांवगांव कळलें असावें आणि त्याच्यासंबंधीं इतर माहिती मिळवून तो भवेन्द्र म्हणून बाशुलीपाड्याला गेला असावा. त्यादिवशीं गंगेच्या घाटावरून परत येतांना बागेंत तोतया भवेन्द्राला अचानक पाहिल्यामुळें 'सुरबाला' ऊर्फ लीलावती कां दचकली त्याचें आतां निराकरण झालें आहे.

अजूनही कांहीं बारीकसारीक गोष्टींबद्दल माहिती मिळवणें अवश्य आहे. ती माहिती मिळवल्यावर बाशुलीपाड्याला येऊन कार्यक्षेत्रांत अवतीर्ण होईन.

तुझा स्नेहांकित

खगेन्द्र

# रत्नदीप

## ( पंचम खंड )

: १ :

तो श्रावण महिन्यांतला दिवस होता. एक आठवडाभर सारखा पाऊस पडत होता. फ्लॅनेलचें खमीस अंगांत घालून दिवाणजी कचेरींत काम करीत होते. ते सारखे खोकत होते. मधून मधून ते बाहेर नजर फेंकून पहात होते. अजूनही पावसाची बुरबुर सुरू होती.

एक महत्त्वाची बातमी आली होती म्हणून त्यांनीं अंतःपुरांत बाबूंना निरोप पाठवून भेटीसाठीं बोलावलें होतें. ‘ लवकर येतों ’ म्हणून बाबूंनीं उत्तर पाठवलें होतें खरें, पण एक तास होऊन गेला तरी बाबूंचा पत्ता नव्हता.

एक दासी कचेरीच्या अंगणांतून जात होती, तिला दिवाणजींनीं बोलावून घेतलें. ती आल्यावर त्यांनीं विचारलें, “ बाबू कुठं आहेत ग ? ”

“ आंत आहेत. ”

“ काय करताहेत ? ”

“ वधुराणीजवळ बोलत बसले आहेत. ”

“ वधुराणीची प्रकृति यावेळीं कशी काय आहे ? ”

“ तशी बरी आहे. ”

" ठीक आहे — जा. " असें त्यांनीं म्हटलें, त्यावेळीं ती दासी निघून गेली.

थोडासा काळोख पडत चालला होता. चष्मा लावला तरीही दिवाणजींना शाईची रेघ नीटशी दिसून येत नव्हती. लेखणी खालीं ठेवून दिवाणजी मालकाबद्दल विचार करीत बसले होते. त्यांना वाटत होतें, " हें आतां कसें व्हायचें ? हे मालक असे दिवसेंदिवस स्त्रैण होताहेत, विषय-संपत्ति कशी राखणार हे ? ही सर्व व्यवस्था पहाण्यासाठीं कुणी योग्य माणूस नसला तर सारें कांहीं बरबाद होऊन जाईल. चौकशी करतांना कळून येत होतें, कीं तीं दोघेंही कबुतरासारखीं अष्टौप्रहर जोडीनें बसलेलीं असतात. हें कसलें व्रत ? काय याचा अर्थ समजायचा ? स्त्रीला स्पर्श करायचा नाहीं — ही याची प्रतिज्ञा ! स्पर्श करायचा नाहीं, तर मग हें काय ! यापेक्षां स्पर्श केला असता तर फार बरें झालें असतें. यांचे सारें जपतप, ध्यान-धारणा म्हणजे बायका, असें होऊन बसलें आहे. पुढें कसें होणार ! "

आकाशांत मेघ गुरगुरत होते. काळोख वाढत होता. चारदोन रातकिडेही सूर धरूं लागले होते. या तरुण मालकाच्या दांपत्य-लीलेचा विचार करतां करतां दिवाणजींना स्वतःच्या तारुण्याच्या कालाची आठवण होऊं लागली. मालकांच्याबद्दल विचार करायचें सोडून देऊन स्वतःच्या तारुण्याच्या कालांतील गोड गोड आठवणींचे जुने घुटके घेत घेत ते मनाची उलटापालट करीत होते.

अशाप्रकारें कांहीं वेळ गेल्यावर त्यांनीं एक मोठा सुस्कारा सोडला. त्यांनीं एका नोकराला बोलावून घेऊन म्हटलें ! " अंदरमहालांत जा आणि मालकांना खबर दे, कीं दिवाणजी वाट पहात बसले आहेत म्हणून. "

नोकर निघून गेला.

थोड्यावेळानें तो परत आला आणि म्हणाला, " बाबू आतांच येत आहेत. "

हळूहळू संध्याकाळ झाली. काळोख पडला तरीही बाबू आले नाहींत. दिवाणजींच्या समोरचा दिवा लागला होता. त्यांनीं घड्याळाकडे पाहिलें — साडेसहा वाजले होते. सायंसंध्या करण्याची वेळ झाल्यामुळें दिवाणजी उठले. एका कारकुनाला बोलावून त्यांनीं सांगितलें. " तूं इथेंच बसून रहा.

बाबू आले तर त्यांना म्हणावं, कीं मीं संध्या आन्हिक करून रात्रीं आठच्या सुमाराला परत येतोंय."

आठ वाजून गेले. दिवाणजी परत आले पण बाबू अजूनही बाहेर आले नव्हते. त्यांना बोलावण्यासाठीं पुन्हां एकदां माणूस पाठवावा, असें त्यांच्या मनांत आलें होतें. पुन्हां त्यांना वाटलें, आठ वाजून तर गेलेच. नवाच्या सुमाराला बाबू झोंप घेण्यासाठीं आपल्या खोलींत येतील त्यावेळीं भेट होईल. दिवाणजी तसेच वाट पहात राहिले.

मालकांच्या या अशा वागणुकीमुळें दिवाणजींना आज मनांतल्या मनांतून फार राग आला होता. आपलें आतां साठ वर्षांचें वय झालें आहे, आणखी किती दिवस आहेत आपले? एव्हांपासूनच आपल्या जहागिरीच्या व्यवस्थेची यांनीं माहिती करून घेतली नाहीं तर या दौलतीचें पुढें होणार काय? आपल्यामागें जो दुसरा कोणीतरी दिवाण नेमला जाईल तो आपल्यासारखाच जीव तोडून धन्याच्या हितसंबंधांकडे लक्ष देईल का? धन्याची वृत्ति हीच राहिली तर तो दोन हातांनीं लूट करूं लागेल.

हे विचार मनांत आल्यामुळें ते जितके अस्वस्थ झाले होते, तितकाच त्यांना उद्वेग आला होता. इस्टेटीची व्यवस्था पहाण्याकडे मालकांचें लक्ष जाण्यासाठीं कोणता उपाय करावा याचा ते विचार करीत होते. माणसाला पाण्यांत लोटून घातल्याशिवाय तो पोहायला शिकत नाहीं—तसेंच कांहींतरी केलें पाहिजे होतें.

त्यांनीं मनाशीं ठरवलें, कीं कांहीं दिवस तरी कांहींतरी निमित्त करून बाजूला सरून राह्यचें. कामाचा बोजा माथीं पडल्यावर बाबूंची जाणीव आपोआप जागी होईल असें त्यांना वाटत होतें.

रात्रीं नवाच्या सुमाराला हातीं कंदील घेतलेला नोकर अन्तःपुरांतून बाहेर आला आणि त्याच्या मागोमाग माथ्यावर छत्री घेऊन बाबूही बाहेर आले. आतां पावसाला पुन्हां जोर आला होता.

बैठकखान्याच्या व्हरांड्यांत असलेल्या बाकावर दिवाणजी बसून राहिले होते. बाबू येतांच ते उठून उभे राहिले. त्यांना पहातांच राखाल म्हणाला, "अजूनही घरीं गेलां नाहींत का काका?"

दिवाणजींना राग आला होता, चीड आली होती, तरीही तें सारें गिळून टाकून नरम आवाजांत ते म्हणाले, "नाहीं रे बाबा, तसंच जरूरीचं काम होतं —"

"खरंच?" राखाल म्हणाला, "तुम्हीं तिसऱ्या प्रहरीं एकदां मला बोलावणं पाठवलं होतं, नव्हे का काका?"

"होय रे बाबा, पहिल्यानं एकदां चार वाजतां बोलावणं पाठवलं — तूं म्हटलंस कीं आतांच आलो. साडेपांच वाजेपर्यंत वाट पाहिली तरीही आला नाहींस, म्हणून आठवण करण्यासाठीं पुन्हा एकदां माणूस पाठवला —"

राखाल म्हणाला, "बरं बरं — मोठी चूक झाली माझी — अगदींच कसा विसरून गेलों — मला माफ करा काका. तुम्हांला उगीच त्रास झाला माझ्यापायीं."

दिवाणजींच्या रागाचा पारा आतां खरोखरच उतरला. ते म्हणाले, "नाहीं रे बाबा, त्यांत कसला त्रास?"

राखाल म्हणाला, "ही श्रावण महिन्यातली रात्र, गोड्ड काळोख पडला आहे, पाऊस कोसळतो आहे, एवढ्या रात्रीं चिखलपाण्यांतून घरीं जावं लागेल तुम्हांला. काळोख पडायच्या पूर्वींच कां गेलां नाहीं घरीं? इतकं का जरूरीचं काम होतं?"

"होय रे बाबा, तसंच जरूरीचं काम होतं."

"तर मग चला. वरच जाऊं. तिथंच बोलत बसूं." असें म्हणून राखाल जिन्याच्या पायऱ्या चढूं लागला. त्याच्या मागोमाग जाता जातां दिवाणजींनीं विचारलें, "बधुराणीची प्रकृति कशी काय आहे आतां?"

दिवाणजींचा तो प्रश्न ऐकून राखाल मनांतल्या मनांत शरमला. त्याला वाटलें, 'मीं राणीबरोबर सारखा घोटाळतो आहें — कर्तव्याकडे माझें जें दुर्लक्ष होत आहे, त्याचें कारण राणीच, हें म्हाताऱ्यानं ओळखून चुकलें आहे.' तो उघड म्हणाला, "दिवसा प्रकृति एकंदरींत ठीक होती, पण तिसऱ्या प्रहरापासून अंग गरम होऊं लागलं आहे. आतांच थर्मामीटर लावून पाहिलं तों ताप एकूण १०१° होता."

दिवाणजी म्हणाले, "म्हणजे तसा कांहीं विशेष नाहीं. सारखा पाऊस कोसळतोय. या असल्या पावसाळी हवेंत थोडाबहुत ताप हा यायचाच. त्याची एवढी काळजी करायचं कांहीं कारण नाहीं."

राखाल तसाच मुकाट्यानें झोंपायच्या खोलींत आला. तो खुर्चीवर बसला. नोकराला हांक मारून म्हणाला, "एक कोरडा टुवाल घेऊन माझे पाय जरा नीट पुसून घे पाहूं — " दिवाणजीकडे वळून तो म्हणाला, "बसा काका. काय भानगड आहे ?"

दिवाणजी बसले आणि म्हणाले, "आज सदरेंतून मोतीबाबू पेशकार यांचें पत्र आलें आहे. मीर्झाहाटच्या डाकबंगल्यांत परवांच्या दिवशीं कलेक्टरसाहेब येणार आहेत. तिथं ते तीन दिवस रहाणार आहेत."

राखाल म्हणाला, "एवढ्या कोसळत्या पावसांत साहेबांनीं दौरा काढला आहे का ?"

"मिर्झाहाटच्या जवळपास एक मोठं जंगल आहे, तिथंच ते आहेत. पाखरांची शिकार करायला जाणार आहेत, असं पेशकारांनीं लिहिलं आहे. गेल्या वर्षीही असेच आले होते. आमच्या जहागिरीच्या हद्दींत येणार आहेत, तेव्हां त्यांची योग्य ती सरबराई करायला हवी ना ! जिल्ह्याचे मालक आहेत ते."

राखालनें विचारलें, "त्यांना भेटबीट पाठवायला हवी आहे वाटतं ?"

"भेट तर पाठवायला हवीच. ती सारी व्यवस्था झाली आहे. तुला विचारतां आलं नाहीं, पण आज दुपारींच हरिचरणला कलकत्त्याला पाठवून दिलं. ह्या असल्या कामांत तो मोठा तरबेज आहे. विल्सनच्या हॉटेलांतून खाण्याचे जिन्नस, दोन बाटल्या शांपेन, अर्धा डझन व्हिस्की आणखी असंच कांहीं कांहीं — ती यादी आमच्याकडे तयार असतेच — त्या यादीप्रमाणें सारे जिन्नस विकत घेऊन उद्यां संध्याकाळच्या गाडीनं तो कलकत्त्याहून सरळ एकदम मिर्झाहाटला जाईल."

राखाल म्हणाला, "मिर्झाहाटला आमची कचेरी बिचेरी आहे का ?"

दिवाणजींना वाटलें, 'आतां जवळजवळ तीन महिने झाले. आपली कचेरी कुठं आहे, हेंसुद्धां याला अजून माहित नाहीं. अशानं ही जमीदारी कशी चालवणार हा ?' ते उघड म्हणाले, "नाहीं. मिर्झाहाटला आमची कचेरी नाहीं. तिथून सुमारें दीड कोस अंतरावर भद्रकाली नांवाचं गांव आहे. तिथं आमची एक बरीच मोठी कचेरी आहे. त्या भागांतली आमची सर्वांत मोठी कचेरी तीच ! चांगलं दुमजली घर आहे एक. लहानपणीं थोरल्या मालकांबरोबर एकदोन वेळ तूं गेला होतास. आठवत नाहीं का ?"

"नीटसं आठवत नाहीं." राखाल आपल्याशींच हंसून म्हणाला.

दिवाणजी म्हणाले, "तिथल्या नायबाच्या नांवानेंही एक परवाना पाठवलाय्. साहेबाच्यासाठीं मुर्गी, अंडीं, तूप, दूध, मासे, भाजीपाला तयार ठेवायला त्याला सांगितलं आहे."

राखाल म्हणाला, "तर मग सगळा बंदोबस्त होऊन गेलाय म्हणायचा!"

दिवाणजी म्हणाले, "हो. पण मला प्रश्न पडला आहे, कीं नायबावर अवलंबून निश्चिंत रहाणं बरं का?"

राखालनें विचारलें, "तर मग तुम्हीं स्वतः जाणार आहां का? तुम्हीं गेलां तर मग काळजी करायला नको."

दिवाणजी म्हणाले, "मी स्वतः अवश्य जाईन. पण तूं गेलास तर सारं कांहीं ठीक होईल."

राखाल म्हणाला, "मी? मी यावेळीं कसा—"

दिवाणजी म्हणाले, "आतां राणीची प्रकृति हळूहळू सुधारते आहे. थोडासा ताप येतो आहे खरा, पण वैद्यबुवा म्हणतात, कीं एकदोन दिवसांत तिला साफ बरं वाटेल. मी आहेंच इथं. मी सदोदित नजर ठेवीन. तूं गेला नाहींस तर बरं दिसायचं नाहीं बाबा."

यावर कांहीं उत्तर न देतां राखाल मुकाट्यानें बसून राहिला. राखालला काय वाटलें असेल याची कल्पना येऊन दिवाणजी म्हणाले, "यावेळीं मीं तुला जायला सांगितलं नसतं. पण आतां आल्यापासून तुझी आणि कलेक्टर-साहेबांची भेट झालेली नाहीं. त्यावर असं झालंय्, कीं ते तुमच्या हद्दींत आले आहेत. तूं स्वतः जाऊन त्यांचं स्वागत केलं नाहींस तर कदाचित् ते मनांतल्या मनांत चिडून जातील. हे साहेबलोक! मिजास केव्हां बिघडेल तें सांगतां येत नसतं."

थोडावेळ विचार करून राखाल म्हणाला, "मीं काय केलं पाहिजे तिथं?"

दिवाणजी म्हणाले, "विशेष काहीं नाहीं. उद्यां जेवणं उरकलीं, कीं मेण्यांत बसून भद्रकालीच्या कचेरींत जायचं. तिथं मुक्काम करायचा. हरिचरण तितक्यांत येऊन तिथं पोहोंचेल. मुर्गी, अंडीं, तूपदूध, भाजीपाला अन् भेटीचे जिन्नस सकाळींच नायबबरोबर पाठवून द्यायचे. तो डाकबंगल्यांत जाऊन साहेबाची वाट पाहील. आठनऊ वाजेपर्यंत साहेब तिथं पोहोंचणार नाहींत. साहेब

पोंचल्यावर नायब आणलेले जिन्नस साहेबांच्या खानसाम्याच्या हवालीं करील. कलकत्त्याहून आणलेली भेट तेवढी बाजूला ठेवील. इथं घोडेस्वार हजर असणार. इकडे कचेरींत मेणाभोई तयार असतील. साहेब येऊन डाकबंगल्यांत पोहोंचला, कीं घोडेस्वार दौडत येऊन तुला खबर देईल, तेव्हां मेण्यांत बसून बाहेर निघायचं. तिथं जातांच साहेबाकडे आपलं कार्ड पाठवायचं. साहेब तुला बोलावून घेईल, तेव्हां शेकहॅण्ड करून खुर्चीवर बसायचं. हुजूरची प्रकृति कशी आहे, मेमसाहेब कशा काय आहेत, त्या आल्या नसल्या तर त्या कां आल्या नाहींत, वाटेंत प्रवासाचा त्रास तर झाला नाहीं, वगैरे प्रश्न करायचे — "

राखालनें विचारलें, " बंगालींत का ? "

दिवाणजी म्हणाले, " नाहीं, नाहीं, इंग्रजींत बोलायचं. तें सांगायला विसरलोंच होतो मी. तुझे वडील बंगालींतच बोलत असत त्यावेळीं मला अगदीं कसंसंच वाटे. तूं इंग्रजींतच बोल. इंग्रजींत ' हुजूर ' म्हणायचं नसतं. चारदोन वेळ ' युवर ऑनर ' म्हणायचं — चारदोन वेळ ' सर ' म्हटलं तरी चालेल, पण ' युवर ऑनर ' म्हणणंच बरं ! हें सारं होऊन गेलं म्हणजे मग त्यांना सांगायचं, कीं हुजुरच्या सेवेसाठीं मुर्गी, अंडीं, शाकसब्जी पूर्वीच पाठवून दिलीं आहेत. आमच्या कारकुनानं तीं खानसाम्याच्या हवालीं केलीं आहेत. आतां हुजुरांसाठीं ही लहानशी भेट आणली आहे, हिचा स्वीकार केला कीं कृतार्थ होईन असं सांगायचं. हरिचरणला खूण केली, कीं तो आंत येऊन भेटीची डाली समोर ठेवून देईल. "

" अरे बापरे ! एवढं सारं करायला हवं का ? " राखाल म्हणाला, " हा कर्मभोग कांहीं लहानसहान नाहीं. "

थोडेसें हंसून दिवाणजी म्हणाले, " तें काय मला कळत नाहीं रे बाबा ! पण करायचं काय ! हे साहेब म्हणजे कलियुगांतले देव ! त्यांची पूजाअर्चा केली नाहीं तर कसा निभाव लागेल ! "

क्षणभर विचार करून राखाल म्हणाला, " त्यानंतर ही पूजा उरकून मला इकडे परत येतां येईल ना ? "

" नाहीं — तें बरं दिसायचं नाहीं, " दिवाणजी म्हणाले, " साहेब तीन दिवस रहाणार आहेत तिथं. रोज सकाळीं जाऊन एकदां तरी त्यांची भेट घेणं अवश्य आहे. "

" रोजरोज बोलायचं काय ? "

" भेटायला जायचं नि विचारायचं, कीं हुजुरची कांहीं गैरसोय तर होत नाहीं ना ? तशी कांहीं गैरसोय असली तर सांगा म्हणजे मी सोय करतो, अशा शिष्टाचाराच्या चारदोन गोष्टी बोलून निघून यायचं. थोडीशी खुशामत केली पाहिजे ना साहेबाची — दुसरं काय ? "

अर्थात् राखालला संमति द्यावी लागली. तो म्हणाला, " ठीक आहे. मी तिथं जाणं अगदीं अवश्यच आहे असं तुम्हीं म्हणतां त्याअर्थी गेलंच पाहिजे. माझ्या जाण्याची जरूर ती व्यवस्था करा. '

रात्र बरीच झाली होती. इकडल्या तिकडल्या चार दोन गप्पागोष्टी झाल्यावर दिवाणजी निरोप घेऊन निघून गेले.

राखाल पडल्या पडल्या काळोखांत विचार करीत होता, ' मीं आलों त्याला अडीच महिने झाले. अजून एक दिवससुद्धां दोघंही एका जागीं असल्यावांचून राहिलों नाहीं. तिला पाहिल्याशिवाय हे तीन दिवस कसे काढूं ? "

आजारानें फिकट पडलेला राणीचा चेहरा नजरेसमोर येऊन राखालच्या भावी विरहाच्या यातना अधिक दुःसह होत होत्या. तो आपल्याशींच म्हणाला, " एक मोटर असती यावेळीं, तर असा हा कोंडमारा झाला नसता. रोज सकाळींच उठून सरळ बाहेर पडलो असतों. खुशामत म्हणा, कीं लाळघोटेपणा म्हणा, जें कांहीं करायचें तें करून दुपारच्या वेळीं तडक घरीं येऊन पोंचलों असतों. आतां तीन दिवस तिची प्रकृति ठीक राहिली कीं मिळवलं म्हणायचं. "

: २ :

दुसऱ्या दिवशीं सकाळीं राखालनें उठून चौकशी केली तेव्हां अन्तःपुरांतून बातमी आली, कीं राणीची प्रकृति आतां जरा बरी होती.

स्नान उरकून आठ वाजायच्या सुमाराला राखाल अन्तःपुरांत आला. राणीच्या खोलीच्या दारापाशीं येतांच त्याला दिसून आलें कीं, दोन स्त्रिया

राणीच्या उशाशीं बसल्या होत्या. राखाल आलेला पहातांच त्या दोघीही निघून गेल्या.

राखाल आंत आला त्यावेळीं त्याला दिसून आलें, कीं एकावर एक तीन उशा ठेवलेल्या असून त्याला टेकून राणी बसून राहिली होती. राखालला पहातांच तिनें माथ्यावर पदर ओढला.

तिच्या बिछान्याच्या शेजारीं एक खुर्ची ओढून घेऊन राखाल बसला. त्यानें तिला विचारलें, "कसं काय वाटतंय इंदु?"

क्षीण आवाजांत राणीनें उत्तर दिलें, "बरं वाटतंय."

"अंग गरम नाहीं ना आतां?"

पांढरेफटक पडलेले ओठ किंचित मुरडून राणीनें उत्तर दिलें, "मला काय माहीत? अंगाचा गरमपणा अंगाला माहीत!"

तिच्या या उत्तराचा उद्देश राखालच्या ध्यानीं आला. तो राणीला स्पर्श करीत नव्हता. तिच्या कपाळावर हात ठेवून किंवा हातांत हात धरून ताप आहे कीं नाहीं हें पाहायच्याऐवजीं तो नुसता तोंडच्या बोलानें विचारीत होता. हेंच तिला पसंत नव्हतें. विषादपूर्ण नजरेनें एकदां राणीकडे पाहिल्यावर लगेच त्यानें नजर खालीं केली. त्याच्या तोंडून नकळत एक सुस्कारा बाहेर पडला. तो म्हणाला, "तुला तर माहीत आहे, इंदु!"

"काय मला माहीत आहे?"

"माझं दुर्भाग्य काय तें तुला माहीत आहे!"

बोलत असतांना राखालचा गळा दाटून आला होता. त्याचे डोळे ओलावले होते. राणीनेंही एक मोठा सुस्कारा सोडला.

त्यानंतर थट्टेच्या स्वरांत आणि रुसण्याचा आव आणून ती म्हणाली, "नाहीं, नाहीं — असे रागावूं नका तुम्हीं. मीं तें नुसतं थट्टेनं बोललें. दुर्भाग्य कसलं? जें व्रत तुम्हीं धारण केलं आहे, तें व्रत पालन करण्याइतकी शक्ति आणि संयम तुमच्या ठायीं आहे, याला काय दुर्भाग्य म्हणायचं? — अगदीं चांगलं वाटतंय मला. अंग मुळींच गरम नाहीं."

औषध, पथ्यपाणी, वैद्यबुवाबद्दलच्या कांहीं गोष्टी झाल्यानंतर राणी म्हणाली, "अजूनही तुमचा चेहरा असा उदासवाणा कां दिसतोय? मी तसं बोललें म्हणून का?"

राखाल म्हणाला, "नाहीं."

"तर मग तुमच्या मनांत असं आलंय तरी काय?"

राखाल म्हणाला, "असं पहा इंदु, तूं आज असं बोललीस म्हणून मला वाईट वाटलं असं जें तुला वाटलं, तें बरोबर नाहीं. दिवसेंदिवस मला हें अगदीं असह्य होत चाललंय्. या व्रताच्या कैचींत सांपडून माझे प्राण ओठाशीं आले आहेत. जोंपर्यंत तुझी प्रकृती बरी होती, तोंपर्यंत तुला स्पर्श करतां येत नाहीं म्हणून मला कठीण जात होतं खरं, पण तें मला सहन करतां येत होतं. पण जेव्हांपासून तूं आजारी पडूं लागलीस—ही खेप धरून तूं तीन वेळ आजारी झाली होतीस—तेव्हांपासून तें सहन करण्याची माझी शक्ति कमी कमी होत चालली आहे. तापाच्या वेळीं तुझं डोकं फार दुखत होतं. ती दुःखी असह्य झाली म्हणजे तूं तडफड करीत होतीस त्यावेळीं तुझ्या माथ्यावरून मला हात फिरवतां येत नव्हता. तुझा हात धरून तुला उठून बसवतां येत नव्हतं. तुला थंडी वाजूं लागली कीं तुझ्या अंगावरचं पांघरूण अंगभर ओढतां येत नव्हतं. असं झाल्यामुळें माझ्या मनाची अवस्था काय होत होती हें तुला कोणत्या शब्दांनीं सांगूं इंदू? केव्हां केव्हां असं वाटतं, पुष्कळ झालीं हीं व्रतं. आतां यापुढें व्रताची पर्वा करूं नये. इथंच साऱ्या व्रतांची समाप्ति करून टाकावी."

राणी दुसरीकडे तोंड फिरवून मुकाट्यानें बसून राहिली होती. तिला रडण्याचा उमाळा येत होता पण मनांतली ती अवस्था ती जीव टाकून आवरूं पहात होती.

अशा रीतीनें मन आवरून ती म्हणाली, "असं कधीं झालंय? असं कांहीं होऊं देईन का मी? केव्हांही नाहीं! मी तुमची धर्मपत्नी, तुमचा धर्म राखायला तुम्हांला मदत करायच्याऐवजीं मी काय तुम्हांला अधर्माच्या मार्गावर खेचूं?"

त्यावर राखाल कांहीं बोलला नाहीं. यावेळीं त्याच्या हृदयांत राणीबद्दल एकप्रकारची असामान्य श्रद्धेची भावना उत्पन्न होत होती.

थोड्या वेळानें राणी उगीच थोडीशी हंसली आणि म्हणाली, "केवळ एकच घटना घडून आली तर मात्र मला वाटतं, कीं मी स्वार्थाला बळी पडेन आणि व्रतभंग करायला तुम्हांला भाग पाडीन."

राखालला आश्चर्य वाटलें. तो तिच्या तोंडाकडे सारखा पहात राहिला. या तिच्या उद्‍गारांबद्दल वाटलेलें कुतूहल निवारण करण्यासाठीं त्यानें विचारलें, "अशी कोणती घटना ती इंदू?"

राणी अगदीं शांतपणें म्हणाली, "तुमच्या व्रताचं उद्यापन व्हायच्या आधीं म्हणजे या साडेतीन महिन्यांच्या आंत जर माझी अखेरची घटका भरत आली तर मग—"

राखाल तिला झिडकारून म्हणाला. "छे, छे! असं कांहीं बोलूं नकोस. असे अमंगळ शब्द नुसते तोंडावाटेसुद्धां बाहेर काढूं नकोस."

राणी म्हणाली, "अमंगल? बायकाच्या जातीला त्यापेक्षां मंगल तें काय दुसरं! महद्‍भाग्य तें काय दुसरं? त्या दिवशीं मात्र मीं तसलं कांहींच ऐकून घेणार नाहीं. तुमच्या मांडीवर डोकं टेकून मीं खुशाल प्राण सोडीन. मुळींच मानणार नाहीं तुमचं व्रत मीं तेव्हां." तें भाषण पुरें करतांना राणीचे दोन्ही डोळे पाण्यानें भरून आले होते. मुद्रेवर हंसूं आणि डोळ्यांत आसूं. तें स्वर्गीय दृश्य पाहून राखाल मंत्रमुग्ध होऊन गेला.

पण तें अगदीं क्षणभरापुरतेंच. हळूहळू त्याच्या हृदयांत एकप्रकारच्या वेदनेचा सचार झाला. ती वेदना आत्मग्लानीमुळें उत्पन्न झाली होती— स्वतःबद्दल धिक्कार वाटल्यामुळें उत्पन्न झाली होती.

पण राणीचा समज मात्र अगदीं वेगळाच झाला. तिला वाटलें, आपण आपल्या मरणाची गोष्ट काढल्यामुळें त्याला दुःख झालें असावें. त्याच्या मनावरचा तो परिणाम दूर व्हावा म्हणून तिनें तिसराच विषय काढला. डोळे पुसून घेऊन ती म्हणाली, "खरंच, कलेक्टरसाहेब म्हणे आमच्या हद्दींतल्या कुठल्याशा गांवीं येताहेत?

राखाल म्हणाला, "हो, मिर्झाहाटला येताहेत."

"कितीसं लांब आहे तें गांव?"

"भद्रकालीच्या जवळपास कुठंतरी आहे."

"तरमग फारच दूर आहे म्हणायचं—त्यांची व्यवस्था वगैरे झाली काय सारी?"

"झाली आहे. भेट खरेदी करण्यासाठीं माणूस कलकत्त्याला पाठवला आहे. त्यांच्या सरबराईचे बाकीचे जिन्नस घेण्यासाठीं भद्रकालीच्या नायबाला

इकडून हुकूम गेले आहेत. तें सारं होऊन गेलंय् खरं, पण त्यामुळेंच मीं मोठ्या संकटांत सापडलोंय्."

"कां? काय झालंय्?"

दिवाणजीबरोबर गेल्या रात्रीं जी चर्चा झाली ती सारी हकिकत राणीला तपशीलवार ऐकवल्यानंतर तो म्हणाला, "तुझी प्रकृति ही अशी, यापुढं तीन दिवस तुला सोडून मीं कसा जाऊं तिकडे!"

राणीनें क्षणभर विचार केला. तिच्या मुद्रेवर हळूहळू अभिमानाची छाया दिसून येऊं लागली. ती एकदम म्हणाली, "तीन दिवस मला सोडून जाण्यासाठीं तुम्हांला कठीण जातंय्? सोळा वर्षे मला सोडून राह्यला होतां ते कसे?"

तिचे फिकटलेले ओठ अधिक फिकट झालेले दिसले. राखालच्या मनांत आलें, 'त्यावेळीं तुझी ओळखसुद्धां नव्हती, तूं कोण आहेस हें माहीतसुद्धां नव्हतें!' असें उत्तर देणें ठीक झालें असतें आणि प्रेमाचें खरें स्वरूप प्रकट झालें असतें—पण तसे शब्द त्याच्या ओठांवर येऊन तिथेंच विरघळले. त्याला पुन्हां वाटलें, 'छे छे! माझ्यावर तिचा एवढा विश्वास, एवढं प्रेम ही करते आहे, तिच्यासमोर खोटं बोलून तिची फसवणूक कशी करूं मी! धिक्कार असो मला!' मनःक्षोभामुळें त्याला एक प्रकारची ग्लानी आली. त्याच्या हृदयांत वेगवेगळे तरंग उठले. तो एक शब्दसुद्धां न बोलतां स्वस्थ बसून राहिला.

राणीला त्याची ती मनःस्थिति नीटशी कळणें शक्य नव्हतें. आपण जो श्लेष केला त्याची शरम वाटून तो असा मुकाट बसला आहे असा समज करून घेऊन ती चटकन् म्हणाली, "तुमच्या मनाला लागलं का माझं बोलणं? माझ्यामुळं आज उगीच पुनः पुन्हां तुमच्या मनावर आघात होत आहेत मात्र! ही अशी आजारी पडल्यापासून मीं अगदीं हळवी होऊन गेलेंय्. मला क्षमा करा. मीं जर तुमच्यावर रुसायचं नाहीं तर रुसायचं तरी कोणावर?"

राणीच्या त्या आवाजांत एवढी कोमलता होती, एवढें कारुण्य होतें, एवढी गोडगोड काकुळती होती, तिच्या त्या भाषणांत आत्मसमर्पणाचा सूर एवढा झणझणत होता, कीं त्यामुळें राखालची आत्मग्लानी कमी व्हायच्या ऐवजीं वाढली मात्र.

त्याच्यावर झालेला हा परिणाम राणीच्या ध्यानांत आला. तिला फार वाईट वाटलें. राखालचें मन दुसरीकडे वळवण्यासाठीं तिनें पुन्हां एकदां प्रयत्न करून पाहिला. ती म्हणाली, " भद्रकाली गांवीं कालीचं मोठं जागृत देवस्थान आहे, असं म्हणतात तें खरं का ? "

" खरंच मोठं जागृत देवस्थान आहे का तें ? "

" होय तर. सारेच म्हणतात तसं. "

राखाल कांपऱ्या आवाजांत म्हणाला, " तर मग मीं अवश्य जाईन तिथं. देवीची पूजा बांधीन. अन् तूं लवकर बरी होऊन उठावीस म्हणून देवाला नवस करीन. "

राणी म्हणाली, " हें बघा — नवस करायचा तो असा — माझी प्रकृति बरी व्हावी अन् आपण दोघं मिळून आईची पूजा करायला तिथं जोडीनं यावं — कसं ? "

" हो, असाच नवस करीन. "

" अन् आईच्या प्रसादाचा सिंदूर माझ्यासाठीं घेऊन यायचं — कसं ? "

" अवश्य घेऊन येईन. "

त्याचवेळीं पडद्याच्या बाहेरून थोरल्या राणीसाहेबांनीं हांक मारली, " बाबा भवेन. " राखाल म्हणाला, " काय आई ? "

" सूनबाईला साबुदाण्याची पेज द्यायची आहे ना आतां ? साबू तयार आहेत. " बोलत बोलत ती पडदा दूर करून आंत आली.

राखाल उठून उभा राहिला. आतां आपण बाहेर गेलें पाहिजे, हें त्याच्या ध्यानीं आलें. थोरल्या राणीसाहेब जवळ येऊन म्हणाल्या, " अरे बाबा, वैद्याचे उपचार इतके दिवस सुरू आहेत. अजून ताप कांहीं केल्या हटतां हटत नाहीं. पुन्हांपुन्हां तीन वेळ ताप उलटला. तिकडे शहरांतून कुणातरी डॉक्टरला बोलावून आणून दाखवावं, असं नाहीं का वाटत तुला ? "

राखाल म्हणाला, " होय आई, मीसुद्धां तोच विचार करीत होतों. एकदां जाऊन दिवाणकाकांना विचारून पहातों. त्यांचं काय मत पडतं तें पाह्यला हवं. "

" तसं काय वाटेल तें कर बाबा, पण कांहींतरी केलं पाहिजे खरं आतां. पोर पहा कशी वाळून अर्धी होऊन गेलीयू. हवा बदल केला पाहिजे असं डॉक्टर म्हणत असेल तर कुठल्यातरी हवेच्या ठिकाणीं घेऊन जा हिला. "

राणीच्या समोर या निर्णयाची चर्चा होणें इष्ट नव्हे, असें त्याला वाटलें.

" डॉक्टर आले म्हणजे पाहूं ते काय म्हणतात तें ! " असें म्हणून तो तसाच बाहेर निघून गेला.

: ३ :

जेवण झाल्यावर राखाल जायला निघाला. यापूर्वी त्यानें इतक्या दूरचा प्रवास कधींच केला नव्हता. सुरवातीला तो मेण्याच्या मध्यभागीं बसून राहिला होता. सुमारें कोसभर रस्त्यावर असलेलीं हिरवीं हिरवीं शेतें पाहत पाहत तो चालला होता. जातां जातां हळूहळू त्याच्या डोळ्यांवर झांपड येऊं लागली.

थोड्यावेळानें तो मेण्यांत आडवा झाला आणि लवकरच झोंपी गेला. सुमारें एक तास झाल्यावर तो जागा झाला. त्यानें घड्याळ्यांत पाहिलें तों दोन वाजले होते. उशाखालीं असलेला पानाचा डबा उघडून एक विडा तोंडांत घालून तो आळसावलेल्या नजरेनें बाहेर पहात राहिला होता.

हळूहळू त्याला राणीची आठवण झाली. तिच्याबद्दल त्याला काळजी वाटत होती. त्याला वाटलें, आज कांहीं ती आपल्याला दिसणार नाहीं. उद्यां नाहीं. परवां नाहीं. त्यानंतरच्या दिवशीं संध्याकाळीं तिची भेट व्हायची अपेक्षा होती.

यावेळीं राणी काय करीत असेल, काय बोलत असेल, कोण कोण तिच्या शेजारीं बसून असतील, अजूनही तसाच तिचा ताप निघाला असेल का ?— या सर्व गोष्टींचा तो विचार करीत होता.

वारंवार त्याला यातना होत होत्या त्या एकाच गोष्टीच्या. तीन दिवस तिची आपली गांठभेट होणार नाहीं— त्यानंतर काय— त्यानंतर तरी भेट होईल ना ?—

माणसाचें जीवन म्हणजे अळवावरचें पाणी ! केव्हां काय होईल कुणी सांगावें ? पुन्हां घरीं गेलों अन् दिसून आलें,— कीं राणी नाहीं. आजार मोठा कठीण,— काय होईल कुणी सांगावें ? तिथें गेलों अन् पाहिलें घरचीं सारीं माणसें रडताहेत,— सारें कांहीं आटोपलें आहे !—

हे चमत्कारिक विचार मनांत आल्यामुळें राखालच्या हृदयाचा थरकांप झाला. त्याचें सर्वांग शहारून उठलें. त्याचे डोळे हळूहळू आपोआप झाकूं लागले. त्या झांकलेल्या डोळ्यांवाटे पाझरलेलें पाणी मेण्यांतल्या बिछान्यावर पडूं लागलें.

असाच कांहीं वेळ गेला. राखालनें डोळे उघडले. हळूहळू तो उठून बसला. हातरुमालानें डोळे पुसून घेऊन तो आपल्याशींच म्हणाला, "छे, छे ! असं कसं होईल ? देव इतका का निष्ठुर आहे ? काय म्हणून तो असा प्रसंग आणील माझ्यावर ?——"

त्याचवेळीं पुन्हां त्याच्या मनांत एक नवीन विचार आला,—"देवानं काय म्हणून मला अशी दया दाखवावी ? मीं हा असा महापातकी ! फुलासारखी जी कोमल आणि निर्मल, गंगाजलासारखी जी स्निग्ध आणि पवित्र, तिचा सर्वनाश करायला मीं प्रवृत्त झालोंय—काय म्हणून ईश्वरी कृपा व्हावी माझ्यावर ?—"

अशा रीतीनें तो विचार करीत असतां आणखी एक तास निघून गेला. मेणा एका लहानशा गांवांत प्रवेश करीत होता. रस्त्याच्या बाजूला एक मोठें वडाचें झाड होतें. दुसऱ्या बाजूला एक छोटीशी पुष्करणी होती. थोड्याशा अंतरावर चणेमुरमुरे वगैरे खायच्या जिनसांचें एक छोटेसें दुकान होतें.

मेण्याच्या भोयानें त्या वडाच्या झाडाखालीं मेणा उतरला. त्यांचा एक म्होरक्या समोर आला आणि हात जोडून म्हणाला. "हुजूरचा हुकूम झाला, तर आम्हीं इथं थोडावेळ थांबून जरा पाणी पिऊन घेऊ."

"ठीक आहे, हा घ्या !—" असें म्हणून राखालनें एक रुपया त्या भोयाच्या हातीं दिला.

बराच वेळपर्यंत मेण्यांत बसून राहिल्यामुळें त्याचें शरीर आंकसून गेलें होतें म्हणून तोही मेण्याबाहेर आला. त्यानें विचारलें, "हें कोण गांव ?"

भोई म्हणाला, "हें चेडागाँ हुजूर. इथं मुसलमानांचीच वस्ती फार आहे. हिंदु अगदींच कमी आहेत."

"कुणाच्या जमीदारीखालीं आहे हें गांव ?"

"मोरगंजच्या सिंघीबाबूंच्या जमीदारीखालीं."

सिंघबाबूंचें नांव राखालनें ऐकलें होतें. अत्याचारी आणि प्रजेला त्रास देणारा म्हणून त्या जमीदाराची मोठी प्रख्याति होती.

हातपाय धुण्यासाठीं भोई लोक पुष्करिणींत उतरले. राखाल तसाच फिरत फिरत गांवांत गेला. त्या गांवांत मातीचीं छोटीं छोटीं घरें होतीं. कित्येकांत एकच खोली तर कित्येकांत दोन खोल्या होत्या. अंगणांत कोंबडीं, बदकें चरत होतीं. परसवांत कोहळे भोपळ्यांचे वेल होते. कुठें कुठें एखादी मुसलमान बाई घराच्या ओसरींत बसून चरखा फिरवीत होती. एकादी संपन्न गृहस्थाची बिबी डोळ्यांत काजळ, कानांत रुप्याचें झुबके, हातांत रुप्याचे बाजूबंद घालून ओसरीवर बसून मुलाला पाजीत होती.

हें सर्व दृश्य पहात पहात राखाल पुढें चालला होता. तो थोडासा पुढें गेला तोंच एका झोपडीच्या अंगणांत बरेच लोक गोळा होऊन गडबड करीत होते. दोघेजण एक मेंढीचें लठ्ठ कोकरूं दोरीला बांधून ओढीत होते. त्यांची बडबड सुरू होती. बाकीचे लोक उभे राहून नुसते तमाशा बघत होते.

एकजण — तो मुसलमान होता — म्हणत होता, "कांहीं झालं तरी मी हें मेंढरूं देणार नाहीं — प्राण गेला तरी नाहीं."

दुसरा माणूस — तो हिंदु होता — त्याच्या हातांत लाठी होती आणि डोक्याला पगडी होती. तो म्हणत होता, "नाहीं देणार ? तुझा बाप देईल ! जमीदाराचा हुकूम आहे. देणार नाहीं म्हणजे काय ?"

मुसलमान म्हणत होता, "जमीदाराचा खंड तर मी चुकवीत नाहीं ? वेळचे वेळीं देतों आहे ना ? माझं पाळीव मेंढरूं मीं काय म्हणून द्यावं ? यह जुलूम है !"

झोपडीच्या ओसरीवर एक दहाबारा वर्षांचा मुलगा रडवें तोंड करून उभा होता. त्याच्यामागें दाराच्या चौकटीला हात धरून एक वयस्क बाई उभी होती. ती त्या मुलाची आई असावी.

ही काय भानगड आहे हें पाहण्यासाठीं राखाल रस्त्यावरून त्या झोपडीच्या अंगणांत गेला. तो म्हणाला, "कसली गडबड चालवली आहे तुम्हीं लोकांनीं इथं ?"

मुसलमान म्हणाला, "ठाकूर, सलाम. आपण हिंदूंचे साधू दिसतां. आतां आपणच सांगा — मीं हें मेंढरू पोटच्या पोरासारखं पाळून पोसलंय. स्वतःला खायला मिळालं नाहीं तरी याला खायला घातलंय. आतां हें एवढं मोठं झालंय. माझं आवडीचं हें जनावर, मी कसं यांना देऊं हुजूर ? हे घेऊन जातील आणि याची कत्तल करतील."

दूसरा माणूस ओरडून म्हणाला, " बेट्याची सैतानी तर पहा. जमीदाराच्या वाड्यावर उद्यां खाना आहे. कलकत्त्याहून मोठमोठे बाबूलोक येणार आहेत. देणार नाहीं म्हणजे काय? द्यायचं असलं तर दे, नाहींतर खेटर मारून ओढून नेईन." असें म्हणून त्यानें दोरी धरून एक जोराचा हिसका दिला. त्यासरशीं तें मेंढरूं खालीं पडून ' बें बें ' करून ओरडूं लागलें.

राखाल संतापून म्हणाला, " कोण रे तूं?"

तो तोंड वेंगाडून म्हणाला, " वा: मोठा लार्डसाहेब आला आहे जणूं! आणि या बेट्याजवळ मी कोण आहें याची जबानी दिली पाहिजे होय! मी आहें सिंघीबाबूंचा बरकंदाज—मला काय कुणाची पर्वा! जा जा ठाकूर, या गांवांत भीक मिळायची नाहीं तुला. इथं सारे मुसलमान आहेत."

राखालचा तोल सुटला आणि तो एकदम ओरडून म्हणाला, " चूप राव हरामजादा! आपली वस्तु जो देत नाहीं ती जबरदस्ती करून नेणार आहेस का तूं?"

आतांपर्यंत जमलेले मुसलमान दुर्दान्त जमीदाराच्या भीतीनें तोंडांतून एक शब्द बाहेर काढण्याची छाती होत नसल्यामुळें नुसते पहात राहिले होते. या अपरिचित संन्याशाचा जोर पाहून त्यांनाही वाचा फुटली. कुणी म्हणाले, " हबीबभाई, मुळींच देऊं नकोस. तुझ्या मालकीचा मेंढा, काय म्हणून द्यावा तूं?"

दुसरा कुणी म्हणाला, " हा जुलुम नव्हे तर काय! हा बरकंदाजाचा बेटा कसा मेंढरूं नेतो तें तर पाहूं!"

कुणी कुणी याहीपेक्षां कडक भाषेंत बोलत होते.

साधूसंन्याशाच्या अभिपाशाच्या भयानें असो, कीं मुसलमान लोक एकवटले आहेत हें पाहून असो, एवढ्या वेळानें बरकंदाज जरा नरम आला. तो आवाज खालीं आणून म्हणाला, " मी कांहीं हा असाच घेऊन जात नाहीं. याची काय किंमत असेल ती घे. रोख पैसे देतों, मग तर झालं?"

हबीबुल्ला म्हणाला, " अरे ठेवून दे तुझा तो पैसा. ज्याच्यावर जीवापेक्षांही प्यार केला त्याच्या गळ्यावर सुरी फिरवूं का मी? बिलकुल नाहीं! प्राण गेला तरी नाहीं!"

राखाल म्हणाला, "अरे जमीदाराचा बरकंदाज, बऱ्या बोलानं इथून मुकाट्यानं चालता हो पाहूं. तुझ्या धन्याला मेंढरू खायची लहर आली असेल तर त्याला म्हणावं, जो आपखुशीनं आपलं जनावर देत असेल त्याच्याकडून घेऊन जा. गरीब माणसावर असा जुलूम करूं नकोस."

राखालकडे नुसती नजर फिरवूनसुद्धां न बघतां मारे हातवारे करीत बरकंदाज म्हणाला, "ठीक आहे म्हणावं! जाऊं दे म्हणावं! जमीदाराचा अपमान? आतां मजाच दाखवतों तुम्हां लोकांना!" असें म्हणून रागानें गरगरत तो तिथून निघून गेला.

बरकंदाजाचे शेवटचे बोल ऐकून जमलेले सारे लोक घाबरून गेले असल्याचें राखालला दिसून आलें. ते आपसांत बोलूं लागले, "ही वेळ निभावली रे, आतां हा एकाचे पांच करून जमीदाराला जाऊन सांगेल अन् मग जमीदार लाठीवाले लोक पाठवून देईल—"

हबीबुल्ला म्हणाला, "दिले तर दिले! मरायचं असलं तर मरून जाईन—मरण झालं तरी एकदांच यायचं ना?"

राखाल म्हणाला, "असं पहा, तुमचा जमीदार कांहीं भला माणूस नव्हे. तुम्हां लोकांवर त्यानं जर जुलूम जबरदस्ती केली तर उद्यां मिर्झाहाटला जा, तिथं कलेक्टरसाहेबाचा मुक्काम होणार आहे. ते तीन दिवस तिथं रहाणार आहेत. तुम्ही जा आणि सर्व हकिकत त्यांना सांगा." असें म्हणून राखाल तेथून जायला निघाला. जमलेल्या साऱ्या मुसलमानांनीं त्याला वांकून सलाम केला.

राखाल मेण्यापाशीं येऊन पोंचला त्यावेळीं भोई लोक फराळ करून ताजेतवाने होऊन बसले होते. मेणा पुन्हां वाटेला लागला.

मेण्यांत बसल्याबसल्या राखाल आतांच पाहिलेल्या प्रसंगावर मनांतल्या मनांत आलोचना करीत होता. त्यांच्या साऱ्या भाषणांत,—'ज्याच्यावर प्यार केला, त्याच्या गळ्यावर सुरी फिरवूं कशी?—' हे शब्द त्याच्या कानांत सारखे गर्जत राहिले होते. एक सामान्य मुसलमान, प्रबळ पराक्रमी अशा त्या जमीदाराच्या रागाची पर्वा न करतां, स्वतःवर निश्चितपणें संकट येईल ही कल्पना असतांही आपल्या स्नेहाच्या जीवाचें रक्षण करतो!—राखालला त्या सामान्य मुसलमानाबद्दल मोठा अभिमान वाटला. तो आपल्याशींच म्हणाला, 'हें असं पाहिजे!'

या तात्कालिक प्रसंगामुळें मनावर झालेला परिणाम दूर झाला तेव्हां राखाल पुन्हां राणीची आठवण काढूं लागला. निघायच्या वेळीं तो तिला भेटून आला त्यावेळीं तिची प्रकृति बरी होती. परत गेल्यावर कृष्णनगरहून डॉक्टर-साहेबाला बोलावून घेऊन तिची एकदां प्रकृति दाखवायची असें राखालनें ठरवलें. त्यांनीं हवाबदल केला पाहिजे असें सांगितलें तर तिला हवा बदलायला घेऊन जायचें. सिमला म्हणा, नैनीताल म्हणा, दार्जिलींग म्हणा, डॉक्टरसाहेब जिथें सांगतील तिथें घेऊन जायचें. कुठूनही तिची प्रकृति पूर्णपणें बरी झाली म्हणजे झालें. माझ्या या खडतर व्रताला उद्यां तीन महिने होतील. आणखी तीन महिन्यांनीं —

राखालची मुद्रा एकदम पालटली — जणुं काय कुणी तरी त्याच्या छातीवर जोरानें ठोसा मारला ! त्याचे डोळे फडफडले. नाक थरथरलें. त्याचा श्वास जोरजोरानें वाहूं लागला.

हळूहळू त्याचें मस्तक खालीं वांकत गेलें. किती वेळ तरी तो त्याच स्थितींत बसून राहिला होता. बसून सारखा विचार करीत होता. त्याच्या डोळ्यावाटे आंसवाचा एक एक थेंब खालीं टपकत होता.

शेवटीं तो आपल्याशींच पुटपुटला, "या निरक्षर हलक्या मुसलमानाला जेवढें धर्मज्ञान आहे तेवढें मला नसावें का ? ज्याच्यावर प्यार केला त्याच्या गळ्यावर दुसरा कुणी सुरी फिरवायला निघाला तर तो स्वतःचा जान द्यायला तयार होतो. पण जिच्यावर मी प्रेम करतोंय तिच्या गळ्यावर मी स्वतःच सुरी फिरवायला उठलोंय ! धिक्कार असो मला आणि माझ्या अदृष्टाला !"

: ९ :

कलेक्टरसाहेबांची सरबराई करून राखाल तीन दिवसांनीं बाशुलीपाड्याला आला. तो घरीं आला त्यावेळीं तिसरा प्रहर उलटून गेला होता. त्याला पाहतांच घरची सर्व मंडळी आश्चर्यचकित झाली. या तीन दिवसांत त्याची मुद्रा पार पालटून गेलेली होती.

अन्तःपुरांत प्रवेश करतांच थोरल्या राणीसाहेबांनीं साशंक होऊन त्याला विचारलें, "बाबा महेन्द्र, तिथें गेल्यावर तुझी प्रकृति बिघडली होती का ?"

राखाल म्हणाला, “ नाहीं आई. ”

“ तर मग तुझा चेहरा असा उतरलेला कां दिसतो ? असं काय झालंय ? ”

“ प्रवासाच्या त्रासामुळें असेल कदाचित्. ” असें म्हणून राखालनें तिथून पाय काढला.

वधुराणीपाशीं तो गेला तेव्हां त्याला दिसून आलें, कीं तिची प्रकृति बरीच सुधारली होती. तेव्हांपासून तिला ताप मुळींच आला नव्हता. तिचा खोकलाही बराच कमी झाला होता.

राखालच्या मुद्रेंत झालेला फरक राणीच्याही ध्यानांत आला. तिनें विचारलें, “ कशी काय होती तुमची प्रकृति तिथं ? ”

“ ठीक होती. ”

“ पण तुमच्याकडे पाहिलं म्हणजे असं कांहीं दिसत नाहीं. चेहरा असा उतरल्यासारखा कां दिसतो ? ”

राखाल म्हणाला, “ तसं कांहीं विशेष झालंच नाहीं मुळीं. ”

राणीलाही वाटलें, कीं प्रवासाच्या त्रासामुळें थकवा आला असणें शक्य आहे. इकडल्या तिकडल्या गोष्टी झाल्यावर तिनें विचारलें, “ आई भद्रकालीचं दर्शन करून आलांत का ? ”

“ हो. दर्शन घेतलं. ”

“ मीं सांगितलं होतं तसा नवस करून आलांत का ? ”

एक क्षणभर राखालनें उत्तर दिलें नाहीं. नंतर तो म्हणाला, “ नाहीं. ”

त्याचें हें उत्तर ऐकून राणीला फार आश्चर्य वाटलें. असें काय झालें आहे याची तिला कल्पना येईना. नित्याप्रमाणें राखालही तिथें अधिक वेळ बसला नाहीं. फराळ उरकून तो बाहेरच्या खोलींत येऊन बसला.

संध्याकाळीं दिवाणजी आले. त्यांनीं वधुराणीच्या प्रकृतीची चौकशी केली. साहेबाकडे काय काय झालें तेंही विचारून घेतलें. शेवटीं त्यांनीं विचारलें, “ असं पहा बाबा, मला महिनाभर सुट्टी मिळेल का ? ”

राखाल म्हणाला, “ कशाला काका ? ”

“ माझी प्रकृति अलिकडे नीट रहात नाहीं तेव्हां म्हटलं दार्जिलींगला जाऊन महिनाभर तिथं रहावं. मागें एकदां मालकांबरोबर दार्जिलींगला गेलों होतों. नुसते पंधराच दिवस होतों पण तितक्यांत प्रकृति पुष्कळच सुधारली.

खूप भटकत असें तिथं अन् भूकही छान लागत असे. तेव्हां म्हटलं पुन्हां एकदां फेरफटका करून यावं."

राखाल म्हणाला, "आपल्या प्रकृतीसाठीं जर जाणं अवश्य असलं तर मग गेलंच पाहिजे. एकदां या जाऊन तर."

दिवाणजी म्हणाले, "पण जमीदारीच्या कामाकडे थोडं बहुत लक्ष दिलं पाहिजे आतां. नायब दिवाण आहेत ते जुनेच माणूस आहेत. आपल्या कामांत तरबेज आहेत पण स्वतःच्या इस्टेटीकडे स्वतः लक्ष दिलं नाहीं तर केव्हां काय होईल तें सांगतां येत नाहीं."

त्यानंतर दिवाणजींनीं कचेरीच्या कामासंबंधीं बोलायला सुरवात केली. आपल्या परीनें त्यांनीं उपदेश केला पण त्यांतला एकही शब्द राखालच्या कानीं गेला नाहीं. जमीदारीच्या हिशेबठिशेबापासून त्याचें मन हजार योजनें वर हेलावत होतें. गेले कांहीं दिवस ज्या चिंतेनें त्याला ग्रासलें होतें त्याच काळजींत तो स्वतःला विसरून गेला होता.

बराच वेळपर्यंत दिवाणजी बोलत बसले होते, पण श्रोत्याचें लक्ष नाहीं असें जेव्हां त्यांच्या लक्षांत आलें तेव्हां त्यांनीं बोलणें थांबविलें. एक मोठा सुस्कारा सोडून ते म्हणाले, "बरं बाबा, आतां येतां तर. रात्र फार झाली."

राखाल उठून उभा राहिला आणि म्हणाला, "यावं काका."

दिवाणजी निघून गेल्यावर राखालनें हुक्का भरून आणायला सांगितलें. हुक्का ओढीत ओढीत त्या निर्जन खोलीत बसून तो गगनाला गवसणी घालण्याजोगी चिंता करीत बसला होता. काहीं वेळानें त्याच्या हातांतली हुक्क्याची नळी आपोआप खालीं पडली. कुणी म्हणतात, कीं तंबाखू म्हणजे चिंताव्याधीची महौषधी, पण व्याधि जेव्हां फार प्रबल होते त्यावेळीं महौषधीही फलदायक व्हायला असमर्थ होते. राखाल आज अशा अवस्थेला येऊन पोंचला होता.

थोड्या वेळानें जेवण तयार असल्याची वर्दी आली. राखाल अंतःपुरांत जाऊन जेवायला बसला, पण तो केवळ नांवापुरताच. वाढलेल्या पानांतले जिन्नस जसेच्या तसेच राहून गेले होते. थोरल्या राणीसाहेब जवळच बसल्या होत्या. तो उठतो आहे असें पाहून त्यांनीं विचारलें, "हें रे काय भवन, कांहींच कसं खाल्लं नाहींस?"

राखाल म्हणाला, " नाहीं आई. आज भूक नाहीं मला. "
" प्रकृति बरी आहे ना तुझी ? "
" आहे ना ! "
त्याची आई काकुळतीला येऊन म्हणाली, " नाहीं रे बाबा, मला असं फसवूं नकोस. तुला काय झालंय तें सांग आधीं. खास तुझी प्रकृति बिघडली आहे. वैद्यबुवांना बोलावणं पाठवूं का ? "
राखाल म्हणाला, " नाहीं आई. वैद्यबुवांना बोलवायची कांहीं जरुरी नाहीं. आपोआप बरं वाटेल. " असें म्हणून तो आंचवण्यासाठीं निघून गेला.
यापूर्वी — विशेषतः राणीची प्रकृति बिघडल्या वेळेपासून — झोंपायला जायच्या पूर्वी राखाल तिला भेटायला जात असे. घटकाभर बसून तिच्याशीं बोलत असे. आज तो तिकडे गेला नाहीं. बैठकखान्याच्या घरांत जाऊन त्यानें आपल्या झोंपायच्या खोलीचें दार बंद केलें.
हुक्का भरून नोकर आला पण खोलीचें दार बंद असलेलें पाहून तो कांहीं वेळ तसाच दाराशीं वाट पहात राहिला. उभ्या उभ्या तो चिलमीवर फुंकरा घालीत होता. बाबूंनीं दार उघडावें म्हणून त्यानें खांकरून खांकरून पाहिलें, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तो तसाच हुक्का घेऊन परत गेला.

: ५ :

दोन दिवसांनीं राणीला अन्नपथ्य देण्यांत आलें. दुसऱ्या दिवशीं दिवाणजी दार्जिलींगला निघून गेले.
राखाल या दोन घटना केव्हां होतील म्हणूनच वाट पहात होता. त्याचें मन आतां स्थिर झालें होतें — तो दृढनिश्चयी बनला होता. त्याच्या मनाची द्विधा वृत्ति आतां मावळली होती. प्रेमाच्या स्थानावर सुरी मारायची नाहीं, विश्वास असल्या ठिकाणीं प्रतारणा करायची नाहीं, राणीला सारं कांहीं सांगून टाकायचें, — त्यानंतर काय व्हायचें असेल तें होईल — असा त्यानें मनाचा निश्चय केला होता.
दुपारीं दिवाणजींना मेण्यांत बसवून निरोप देऊन तो आपल्या शेजघरांत आला. पुन्हां त्याच्या विचाराचें चक्र फिरूं लागलें होतें. गेले कांहीं दिवस

त्याच्या मुद्रेवर जी अशांततेची छाया दिसत होती, ती आज पार नाहींशी झाली होती. स्वतःच्या कर्तव्याच्या बाबतींत कृतनिश्चय झाल्यामुळें त्याचें मन आतां सुस्थिर झालें होतें.

तरी पण त्याच्या यातनेला अंत नव्हता — चिंतेला पार नव्हता.

आतां त्याला मुख्य काळजी वाटत होती ती स्वतःच्या भवितव्याविषयीं. उद्यां असो कीं परवां असो, इथून गेलेंच पाहिजे होतें. इथें उभारलेली प्रतिमा इथेंच विसर्जन करून जाणें भाग होतें. या जीवनांत यापुढें ती पुन्हां दिसण्याची आशा नव्हती — पण न दिसली तर हा जीवनाचा भाग कसा सुसह्य व्हायचा ?

त्याला नजरेसमोर खरा अंधार दिसत होता. प्रकाशाचा एक लहानसा किरणदेखील कुठें दिसायची आशा नव्हती.

तो आपल्याशींच विचार करीत होता, ' माझी जीवाभावाची ही प्रतिभा विसर्जन करून जातांना माझं काळीज फाटून जाईल — जाईना का ! माझी पूजेची प्रतिमा मीं अपवित्र केली नाहीं यांतच मला समाधान वाटेल. माझ्या उरल्या सुरल्या अंधःकारमय जीवनांत एवढीच एक प्रकाशाची रेखा होऊन राहील. जिच्यावर मी मनापासून प्रेम केलं, तिच्या गळ्यावर मीं सुरी फिरवली नाहीं, जिच्या पूजेसाठीं मी माझ्या हृदयाचं सिंहासन अंथरलं तिला मीं कलंकित केलं नाहीं, हाच माझा भावी जीवनांतला प्रकाश रत्नदीपासारखा उजळत राहील. '

आजच्या दिवसांत राणीला अन्तःपुरापलीकडच्या बगीचांत घेऊन जायचें आणि सारें कांहीं तिला सांगून टाकायचें असें त्यानें ठरविलें. केलेल्या अपराधाबद्दल तिच्या पायापाशीं हजारों हजार क्षमा मागून शेवटीं कायम निरोप घ्यायचा असें त्यानें ठरविलें.

घड्याळांत चार वाजले होते. मनांतला संकल्प मनांत घट्ट धरून राखाल अन्तःपुरांत प्रवेश करता झाला. तो आंत गेला त्यावेळीं राणी आपल्या खोलींत बसून एक पुस्तक वाचीत होती. राखाल आलेला पहातांच तिनें लाजून पुस्तक बाजूला करून बंद करून ठेवलें.

शेजारच्या एका खुर्चीवर राखाल बसला आणि म्हणाला, " चल, बागेंत फिरायला येतेस का ? "

बोलत असतांना त्याचें त्यालाच वाटलें, कीं त्याचा आवाज पार बदलून गेला होता — अगदीं अद्‌भुत झाला होता.

राणी साशंक झाली. बराच वेळपर्यंत ती त्याच्या चेहऱ्याकडे सारखी टक लावून पहात होती. शेवटीं तिनें विचारलें, "प्रकृति ठीक आहे ना ?"

राखाल म्हणाला, "ठीक आहे."

"मग तुमचा आवाज असा जड झाल्यासारखा कां वाटतो ? डोळे फुलल्यासारखे कां दिसताहेत ?"

राखालनें तिच्या प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं. तो म्हणाला, "बागेंत चल. तिथं सांगतों."

पूर्वीच्या रिवाजाप्रमाणें राणी पहिल्यानें बागेंत गेली. थोडा वेळ वाट पाहून राखाल बागेंत गेला आणि ठरलेल्या जागीं येऊन त्यानें राणीला गांठलें.

दोघेंही जोडीनें बागेंत फिरूं लागलीं. राणी मधून मधून साशंक मुद्रेनें राखालच्या तोंडाकडे पहात होती.

राणीला जें कांहीं सांगावें म्हणून राखालनें मनाशीं ठरविलें होतें तें तिला सांगण्यासाठीं त्यानें जिवापाड प्रयत्न करून पाहिला. पण ते शब्द त्याच्या तोंडावाटे बाहेर पडणें अशक्य झालें. मनांतले शब्द कंठावाटे ओठापर्यंत येत होते, पण ते तिथल्या तिथेंच अटकून पडत होते.

थोड्या वेळानें राणी म्हणाली, "माझं ऐकाल का ?"

राखाल म्हणाला, "सांगा ना काय तें !"

राणी म्हणाली, "तुमच्या शरीरप्रकृतीप्रमाणेंच तुमची मनःप्रकृतीही बिघडलेली दिसते. सोळा वर्षं तुम्ही परमुलखांत रहात होतां, एकदम या बंगाल देशांत आल्यामुळं इथलं पाणी तुम्हांला मानवत नाहींसं झालंय. गेलीं सोळा वर्षं ज्या विशिष्ट परिस्थितींत तुम्हीं काढलीं ती परिस्थिती आतां बदलली आहे. अगदींच वेगळ्या अशा वातावरणांत येऊन पडल्यामुळं तुमचं मन दुबळं झालंय. मी असं म्हणतें, — चला, थोडे दिवस तुम्हीं अन् मी पश्चिम देशांत एकदां चक्कर मारून येऊं या. बरेच दिवस सासूबाई तीर्थयात्रेला जावं जावं असं म्हणताहेत — चला, आपण उभयतां त्यांना एकदां तीर्थदर्शन करून आणूं. महिना दीडमहिना फिरून काढूं अन् दुर्गापूजेच्या पूर्वीं परत घरीं येऊं. करायचं का असं ?"

उत्तरासाठीं राणी बराच वेळपर्यंत वाट पहात राहिली, पण अपेक्षेप्रमाणें उत्तर आलें नाहीं असें पाहून तिनें विचारलें, " करायचं का असं ?"

राखाल एकदम दचकला. भानावर येऊन तो उद्गारला, " आँ ?"

राणी म्हणाली, " असंच करायचं का ? जायचं का आपण ? जायचं असलं तर सासूबाईकडे बोलून पुढल्या तयारीला लागतें."

राखाल म्हणाला, " कुठं जायचं म्हणते आहेस तूं ?"

राणी म्हणाली, " मी आतांपर्यंत काय बोलत होतें तें ऐकलंच नाहीं का ?"

राखाल ओशाळला आणि म्हणाला, " मी दुसऱ्याच एका बाबीचा विचार करीत होतों. तुझ्या बोलण्याकडे माझं लक्ष नव्हतं. काय म्हणत होतीस तें सांग पाहूं पुन्हां."

राणीनें पूर्वीं सांगितलेल्या सर्व योजनांची एकदां पुनरावृत्ति केली. ती ऐकून राखाल म्हणाला, " ठीक आहे. आपण विचार करूं."

राणीला जें कांहीं सांगावें म्हणून मनाचा निश्चय करून तो आला होता खरा, पण तें सांगण्याचें सामर्थ्य आपल्या ठायीं नाहीं हें त्याला कळून चुकलें. आज रात्रीं बसायचें, एक पत्र लिहायचें, आणि त्यांत सर्व गोष्टी एकदां लिहून टाकायच्या — उद्यां संधि पाहून केव्हांतरी तें पत्र तिच्या हातीं पोंचतें करायचें असें त्यानें ठरवलें.

रात्रीं जेवण झाल्यावर राखाल राणीला पत्र लिहिण्यासाठीं आपल्या शेजघरांत येऊन बसला होता.

एक पान, दोन पानें, तीन पानें एकामागून एक लिहून तो फाडून टाकीत होता. पुन्हां सुरवात करीत होता. एकएकदां लेखणी खालीं ठेवून वर पहात बसून विचार करीत होता आणि पुन्हां लिहायला सुरवात करीत होता. मधून मधून खुर्चीवर मागें रेलून पडून हातानें डोळे झांकून थोडावेळ रडत होता आणि पुन्हां डोळे पुसून लिहायला सुरवात करीत होता.

अशा रीतीनें करतां करतां रात्रीं एक वाजला, दोन वाजले, तीनसुद्धां वाजून गेले — पत्र बहुतेक लिहून पुरें झालें होतें. आणखी एक पान लिहिलें कीं झालें.

पण आतां राखालचा हात कांपूं लागला. सारी रात्र दिव्याजवळ बसून राहिल्यामुळें त्याचें माथें झणझणूं लागलें होतें, म्हणून त्यानें निर्धार केला कीं

बाहेर जाऊन कांहीं वेळ उघड्या हवेंत जरा फिरावें आणि त्यानंतर पत्र पुरें करावें.

असा विचार करून टेबल सोडून राखाल उठला, दार उघडून बाहेर गेला आणि गच्चीवर येरझारा घालूं लागला. तो भाद्रपद महिना होता तरीही आकाशांत आतां मुळींच ढग नव्हते. चंद्र मावळला होता. त्या निर्मळ आकाशांत त्यावेळीं लक्ष लक्ष तारका चमकत होत्या. चोहींकडे स्तब्धता पसरली होती. रातकिडेसुद्धां झोंपीं गेले होते. वारा मंदमंद वहात होता.

कांहींवेळ येरझारा घालीत असतांना त्याला एकदम कसलीतरी आठवण झाली. तो एकदम दचकला आणि गच्चीवर थांबून उभा राहिला.

कांहींवेळ तो तसाच विचार करीत होता. त्यानंतर तो पुन्हां आपल्या खोलींत आला, त्यानें पत्राचें शेवटचें पान लिहिलें — आणि दिवा मालवून तो बिछान्यावर आडवा झाला.

झोंप येईपर्यंत राखाल पत्राच्या शेवटीं लिहिलेल्या मजकुराबद्दल विचार करीत होता. त्याला वाटलें, 'खोटी आशा! पाण्यांत बुडत असलेलं माणूस दुसरं कांहीं समोर दिसलं नाहीं तर वहात जाणारी गवताची काडी जशी पकडून धरतो तशीच ही माझी आशा! कसं का असेना, आतां दोनच दिवसांची बाब आहे ना, उद्यांच इथून निघून जावं असा मीं विचार केला होता — आणखी दोन दिवस इथं राहिलें तर काय बिघडलं? — थोडी गडबड ही होणारच — कदाचित् मला पोलिसच्या ताब्यांत देतील. तुरुंगांत टाकतील का? टाकीनात का! तुरुंगांत काय, कीं तुरुंगाच्या बाहेर काय, माझ्या लेखीं दोन्हींही सारखींच!'

असा विचार करीत असतांना त्याला केव्हां झोंप लागली, हें त्याचें त्यालाच कळलें नाहीं.

## : ६ :

दुसऱ्या दिवशीं राणीला वाटलें होतें; कीं सकाळचीं नित्यकर्में आणि फराळ उरकल्यावर तो ज्यावेळीं अन्तःपुरांत येईल, त्यावेळीं त्याची निश्चयपूर्वक भेट होईल आणि तीर्थपर्यटनाच्या प्रस्तावासंबंधीं तो कांहीं

ना कांहीं तरी बोलेल — त्याची शारीरिक आणि मानसिक अवस्था पाहून ती फार अस्वस्थ झाली होती. गेल्या रात्रीं तिला चांगलीशी झोंप लागली नव्हती.

तिची ती अपेक्षा कांहीं पुरी झाली नाहीं. सकाळचा फराळ करण्यासाठीं राखाल अन्तःपुरांत आला होता खरा, पण राणीची भेट घेतल्याशिवाय तो पुन्हां बाहेर निघून गेला होता.

राणी तशीच वाट पहात राहिली होती. तिला वाटलें दुपारच्या जेवणाच्या वेळीं तरी खात्रीनें भेट होईल, पण दुपारीं तो जेवायला आला, जेवण करून गेला, पण तिला भेटायला तो आला नाहीं.

राणीच्या मनांत त्यावेळीं रागरुसवा निर्माण झाला होता. ती आपल्याशींच विचार करीत होती, "कां बरं ? असा माझ्यापासून तो पळून दूर जातो आहे काय म्हणून ? काय केलंय मीं ? — कळूनसवरून मी कोणताही अपराध तर केलेला नाहीं ! पूर्वीं किती माझ्यावर प्रेम करीत होता ! मी आजारी असलें तरीदेखील मला भेटण्यासाठीं किती तळमळत होता ! आतां असं काय झालंय् त्याला ? भद्रकालीहून परत आल्यापासून त्याच्यांत असा हा बदल झालेला दिसून येतोय — असं काय झालंय त्याची कल्पनाच होत नाहीं मला."

बराच वेळ विचार करून राणीनें शेवटीं ठरवलें, कीं तो प्रकृति बिघडल्याचाच परिणाम असावा. कांहीं का असेना, आज तिसऱ्या प्रहरीं भेट झाली कीं तीर्थयात्रेला जायचा बेत नक्की करून टाकायचा.

सासूबाईंचें जेवण झाल्यावर राणी जेवली. त्यानंतर जेव्हां ती आपल्या खोलींत आली त्यावेळीं एक वाजला होता. पहांटेपासून आकाशांत मेघ दिसूं लागले होते. आतां ते चांगलेच दाट झाले होते. पश्चिमेकडच्या खिडकींत उभी राहून राणी आकाशांतल्या मेघांची लीला पहात होती. दिवस असला तरीही मधून मधून विजा चमकत होत्या. आज पाऊस कोसळणार हें निश्चित होतें.

आजारीपणामुळें तिचा देह दुबळा झाला होता. तिच्यानें फारवेळ उभें राहवलें नाहीं. थोड्यावेळानें ती एका कोचावर बसली. अजून कनक आणि सुरबाला आल्या नव्हत्या. अजून त्यांचीं जेवणीं झालीं नसावींत. त्याच दिवशीं एक मासिक-पुस्तक आलें होतें, त्याचें वेष्टन उघडून राणी त्यांतलीं चित्रें पहात होती. घड्याळांत एकाचा ठोका पडला.

त्याचवेळीं बाहेर कुणीतरी येत असल्याची चाहूल लागली. राणीच्या हृदयांतला रक्तप्रवाह वेगानें वाहूं लागला — ती चाहूल परिचित होती, अपेक्षित होती.

घाईघाईनें तिनें आपलें नेसतें वस्त्र चापूनचोपून घेतलें. त्याच क्षणाला राखाल आंत प्रवेश करता झाला. राणी उठून उभी राहिली. लडिवाळपणानें तिनें विचारलें, " आज एवढ्या वेळानंशी आठवण झाली ? "

राखाल मान खालीं घालून उभा होता. त्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

राणी म्हणाली, " बसा ना. बसायचं नाहीं वाटतं ? "

राखाल म्हणाला. " नाहीं. "

तो क्षणभर थांबला, त्यानें आपल्या छातीकडच्या खिशांत हात घातला आणि लिफाफ्यांत बंद केलेलें पत्र कांपऱ्या हातांनीं राणीच्या समोर धरलें.

राणीनें विचारलें, " कुणाचं पत्र ? "

" तुझंच ! "

हात पुढें करून राणीनें तो लिफाफा हातीं घेतला. उलटून पालटून पाहिला. तें पत्र टपालानें आलें नव्हतें असें तिला दिसून आलें.

तिनें विचारलें, " कुणी लिहिलंय हें पत्र ? "

" उघडून पहा. "

तेवढेंच बोलून राखाल एकाद्या झिंगलेल्या माणसासारखा लटपटत लटपटत बाहेर निघून गेला.

त्याच्या या विलक्षण वागणुकीमुळें तिच्या मनांत भयंकर कल्लोळ उठला. एकादा अपरिचित राक्षस जबडा पसरून आपल्याला गिळून टाकायला येत आहे कीं काय असें तिला वाटलें. आजारामुळें आधींच फिकट झालेला तिचा चेहरा आणखी पांढरा फटक पडला. तिचे हातपाय थरथर कापूं लागले होते.

आकाशांत ढग आल्यामुळें त्या दुपारच्या वेळीं ही काळोखी आली होती. त्या अंधुक प्रकाशांत तिनें तें पत्र उघडून वाचायची सुरवात केली :—

" मी कोणत्या विशेषणानं तुला संबोधावें, तें मला कळत नाहीं. तूं माझ्या जीवनांतलें एकमात्र सुख, एकमात्र आनंद — पण विधात्याच्या विडंबनामुळें तुला मी घालवून बसणार असें मला वाटूं लागलें आहे.

" मीं तसा फारसा शिकलेला नाहीं. मनांत आलेले सर्व विचार योग्य रीतीनें मांडायचें सामर्थ्य माझ्या ठायीं नाहीं. तसें असतें तर या पत्रांत

माझ्या अकृत्रिम प्रेमाचें प्रमाण मला देतां आलें असतें. मीं आजन्म दुःखी असलेला माणूस — मला वाटलें होतें कीं इतक्या दिवसांनीं विधात्यानें मला सुखाचें मुख दाखविलें, पण नशिबानें मला दगा दिला. सर्व कांहीं भस्मसात् होऊन गेलें आहे.

" मीं अत्यंत अकृति, अधम दुराचारी आहें. तुझ्या बाबतींत मीं जो गुन्हा केला आहे तो अक्षम्य आहे, हें मला कळतें. सतीसाध्वी हिंदु स्त्री केव्हांही त्या गुन्ह्याला क्षमा करणार नाहीं. मीं क्षमेला अयोग्य आहें — अपात्र आहें.

" मीं एक मूर्ख आहें. गेल्या कांहीं महिन्यांत तुझ्यावर प्रेम केल्यामुळें मला जें कांहीं कळूं लागलें त्याचेंच फळ म्हणून मीं आज हें पत्र तुला लिहायला बसलों आहें. मी तुझ्यावर ज्याप्रकारें प्रेम केलें — या आयुष्यांत तसें प्रेम कोणावर कधींच केलें नव्हतें — तेव्हां प्रेम कशाला म्हणतात, तुझी भेट व्हायच्या पूर्वी हें जाणण्याची शक्ति माझ्याठायीं नव्हतीच. मीं तुझ्यावर प्रेम केलें आहे म्हणूनच तुझ्याशीं मीं प्रतारणा करणार नाहीं. अकृत्रिम भावनेनें तूं माझ्यावर विश्वास ठेवला आहेस, त्या तुझ्या छातींत सुरी मारण्याइतका मीं नराधम नाहीं.

" आतां, खरें काय तें सांगतों — ऐक — माझें नांव भवेंद्र नाहीं. मी तुझा पति नाहीं. तुझा पति भवेन परलोकवासी झाला आहे हें कळल्यामुळें दौलतीच्या लोभानें मी भवेंद्राचें सोंग घेऊन — "

राणीनें इथपर्यंतच वाचलें. तिच्या डोळ्यांसमोर काळोखी आली. ती मूर्च्छित झाली आणि कोचावरून खालीं कोसळली.

त्यानंतर अर्ध्याच मिनिटांनें पान चघळीत चघळीत हालत डोलत कनकलता आंत आली. दारांत पाऊल टाकतांच ती दचकली. " आँ ! काय झालं ? " असें म्हणून ती धांवतच राणीपाशीं आली. तें पत्र त्यावेळीं जमिनीवर पडलें होतें. तिनें तें उचलून हातीं घेतलें आणि त्याच्यावर धांवती नजर फिरविली. मधूनमधून इकडल्या तिकडल्या एक दोन ओळी तिनें वाचून घेतल्या. आतां तिला सारी भानगड कळून चुकली होती.

घाईघाईनें तिनें तें पत्र आपल्या साडींत लपविलें आणि ती ओरडूं लागली, " अहो, धांवा धांवा ! काय झालं हें बघा ! "

वाड्यांत एकदम गडबड सुरू झाली. सारींचजणें धांवाधांव करूं लागलीं. पहिल्यानें सुरबाला आली. तिच्यामागून धापा टाकीत टाकीत हाबूची आई आली. आणखीही एकदोघी आल्या.

हाबूची आई एकदम मोठमोठ्यानें रडूं लागली. तिला आवरणें कनकला फार कठीण गेलें.

शेवटीं थोरल्या राणीसाहेब आल्या. कुणी तिच्या मस्तकावर पाणी शिंपीत होत्या, तर कुणी पंखा घेऊन वारा घालीत होत्या. असें होतां होतां शेवटीं राणी शुद्धीवर आली. तिनें डोळे उघडले. दोघींनीं धरून तिला कोचावर बसविलें.

थोरल्या राणीसाहेबांनीं रडतरडत तिला विचारलें, " काय झालं ? एकदम अशी मूर्च्छा कशी आली तुला ?"

राणीच्या तोंडून एक शब्दही बाहेर पडला नाहीं. तिनें नुसता कपाळाला हात लावला.

ती सारखी वर पहात होती. ती पडलेलें पत्र शोधून पाह्यचा प्रयत्न करीत नव्हती, हें कनकलतेच्या लक्षांत आलें. थोरल्या राणीसाहेबांनीं विचारलें, " बिछान्यावर पडणार आहेस का ?"

तिनें मान हलवून होकार दिला त्यावेळीं कित्येकींनीं तिला धरून उचलून बिछान्यावर निजविलें. वस्त्रें बदलून तिची शुश्रूषा सुरू झाली.

एकंदर प्रकार काय झाला तें कळण्यासाठीं कनकलतेचा जीव खालींवर होत होता. जाकिटाच्या खिशांत लपवून ठेवलेलें पत्र जळत्या निखाऱ्यासारखें तिला चटके देत होतें.

सारीं गडबडींत आहेत असें पाहून तिनें हळूच तिथून पाय काढला. ती आपल्या खोलींत आली. मुळींच आवाज होऊं न देतां तिनें दार बंद करून घेतलें.

त्यावेळीं पाऊस सुरू झाला होता. ती खिडकीपाशीं येऊन उभी राहिली. खिडकींतून पावसाचे शिंतोडे आंत येऊं लागले होते. खिडकीपासून थोडें हटून तिनें पत्र बाहेर काढलें आणि वाचायची सुरवात केली.

साधारणपणें इकडील तिकडील प्रस्तावना केल्यावर राखालनें त्या पत्रांत आपला संक्षिप्त इतिहास सांगितला होता. आपली स्त्री लीलावती आपल्या-

बद्दल प्रेम दाखवीत नव्हती — रजा घेऊन तिला आणण्यासाठीं तो घरीं गेला. तिथें ती त्याला भेटली नाहीं — नवीनबरोबर ती पळून गेल्याची वदंता कानीं आली — खुश्रूपूरला परत गेल्यावर त्याच्यावर आलेलें संकट — आगगाडींतून संन्याशाचें उतरून टाकलेलें प्रेत, रात्रीच्या वेळीं त्या संन्याशाच्या ट्रंकेंतून काढलेले पैसे आणि कागदपत्र याची हकीकत — कागदपत्रांवरून मेलेल्या व्यक्तीचा झालेला परिचय, डायरींतील कथा, त्या दोघांच्या वयांतलें आणि आकारांतलें साहश्य आणि शेवटी भवेंद्र बनून बाशुलीपाड्याला येण्याची मनांत आलेली कल्पना आणि त्यानंतर त्यासाठीं केलेले सारे उद्योग — यांचें वर्णन करून शेवटी राखालनें लिहिलें होतें —

" मीं जें हें दुष्टपणाचें कारस्थान केलें तें पूर्णपणें सिद्ध झालें. मी तोतया आहें याचा तुमच्यापैकीं कुणालाही संशयसुद्धां आला नाहीं. मीं अगदीं बिनधोक या विपुल संपत्तीचा उपयोग घ्यायला समर्थ झालों असतों.

" पण माझ्याकडून एक चूक झाली होती. प्रेम ही काय वस्तु आहे हें त्यापूर्वीं मला कळलें नव्हतें. प्रेमाचा प्रादुर्भाव झाला म्हणजे माणसाच्या मनाच्या गतींत कशाप्रकारें बदल होतो, तेंही मला माहीत नव्हतें —

" आतां तें मला कळून आलें. मीं केलेल्या साऱ्या खटपटी आतां व्यर्थ झाल्या आहेत. तुझ्या पायापाशीं मीं जे अपराध केले आहेत त्याच्यासाठीं हजारों हजार वेळ क्षमा मागून मीं कायमचा निरोप घेत आहें. या वैभवाला रामराम ठोकीत आहें. ईश्वरापाशीं माझी हीच प्रार्थना आहे, कीं तुझ्या हयातींत त्यानें तुला सुखांत ठेवावें, समाधानांत ठेवावें, धर्माच्या मार्गांत राहून जीवन अतिवाहित करायला समर्थ करावें.

" तुझ्यासमोर ज्याप्रमाणें मीं ही सर्व कहाणी उघड करून दाखविली आहे त्याप्रमाणें राणीमातेच्या समोरही साऱ्या गोष्टी सांगून टाकून तिचे पाय धरून तिची क्षमा मागितली पाहिजे होती ; पण मीं तसें करायचें टाळलें. त्याला एक कारण होतें. मीं तसें कांहीं केलें असतें तर या गोष्टीचा वाड्यांत बभ्रा झाला असता आणि शेवटीं ही बातमी साऱ्या गांवभर पसरली असती, त्यामुळें लोकांनीं कदाचित तुला कलंक लावायलाही कमी केलें नसतें. तूं किती पवित्र आहेस, हें लोकांना कसें कळावें ? जेवढें कांहीं म्हणून तुझें अनिष्ट करणें शक्य होतें तेवढें मी केलें आहे. यापेक्षां अधिक मीं कांहीं करणार नाहीं.

" माझी ही कथा तुझ्या मनांतून धुऊनपुसून टाक. सारें कांहीं विसरून जा. माझ्यासारखा हतभागी या पृथ्वीवर दुसरा कोणी नसेल. इति. "

राखालदास भट्टाचार्य

ता. क. :— एक गोष्ट आठवली म्हणून निरोप घेतल्यावरही पुन्हां लिहीत आहें. हें लिहिल्यामुळें तुझ्या बाबतींत माझ्या हातून घडलेल्या अपराधांत मी भर घालतो आहें कीं काय तें मला कळत नाहीं. माझ्या बुद्धीचा लोप झाला आहे. काय लिहितों आहें, तें माझें मलाच कळत नाहीं.

गेल्या कांहीं दिवसांत माझ्याबद्दल तुझ्या मनाची भावना कशाप्रकारची झाली आहे तें मला माहीत नाहीं. मी ज्ञानशून्य होऊन ज्याप्रमाणें तुझ्यावर प्रेम केलें त्याचप्रमाणें जर तूं माझ्यावर प्रेम केलें असशील, विधवेनें पुन्हां लग्न करणें हें पाप आहे किंवा गैर आहे असें जर तुला वाटत नसेल तर नव्या कायद्याप्रमाणें विवाह करून आपण झाल्या गोष्टीचें परिमार्जन करूं. या गोष्टीला जर तूं संमति दिलीस तर मला स्वर्ग हातीं आल्यासारखें वाटेल. हें जर तुला पटत नसेल तर तसें मला कळतांच मी कायमचा निरोप घेऊन इथून निघून जाईन. माझ्या साऱ्या अपराधांबद्दल तूं मला क्षमा करावी. एवढीच तुझ्या चरणापाशीं माझी शेवटची मागणी आहे. इति—

—राखाल"

इतक्यांत पाऊस बराचसा थांबला होता. मधून मधून मेघांचा गडगडाट होत होता.

सारें पत्र वाचून झाल्यावर कनकलता कांहीं वेळपर्यंत स्तंभित होऊन शून्य दृष्टीनें बाहेर पहात राहिली होती. तिनें तें पत्र आपल्या पेटींत बंद करून ठेवून त्याला कुलूप लावलें. ती आपल्याशींच म्हणाली, 'हें पत्र माझ्याच हातीं पडलं हें भाग्यच म्हणायचं. दुसऱ्या कुणाच्या हातीं पडलं असतं तर इतक्यांत घरभर कल्लोळ माजला असता. आतां हें निभावलं. राखाल निघून जाऊं दे, लोकांना वाटेल संन्यासी भवेन्द्र पुन्हां संन्यासी होऊन निघून गेला. गृहस्थाच्या घरांत त्याचं मन रमलं नाहीं. राखाल म्हणाला तेंच बरोबर — कुणाला कळलं नाहीं तरच सारं ठाकठीक होईल.'

पेटीला कुलूप लावून कनक खिडकीपाशीं येऊन उभी राहिली. बाहेर थोड-थोडा पाऊस पडत होता. ती आपल्याशींच पुटपुटली 'आश्चर्य !—आश्चर्य !

ह्या माणूस आहे कीं देवता आहे ?–याची पायधूळ घेऊन मस्तकीं लावावी असं वाटतंय मला !'

इतक्यांत दारावर कुणीतरी जोरजोरानें थापा मारीत होतें. बाहेरून सुरबाला ओरडली, "काय करते आहेस कनकदीदी, आधीं लवकर बाहेर ये. वधु-राणीला पुन्हां फीट आली आहे."

तें ऐकतांच कनक दार उघडून राणीच्या शेजघराकडे गेली.

: ७ :

राखाल आपल्या शेजघरांत बिछान्यावर आडवा झाला होता. तो सारखा तडफडत होता. जवळच टेबलावर दिवा तेवत होता. राणीची प्रकृति बरीचशी काळजी करण्यासारखी झाली होती अशी बातमी रात्रीं दहाच्या सुमाराला त्याला कळली. वैद्यबुवा पुन्हां पुन्हां अन्तःपुरांत येऊन जात होते.

तो आपल्याशीं विचार करीत होता, 'मीं काय केलं हें ? इंदूची प्रकृति खालावलेली होती. अशावेळीं हा असह्य धक्का सहन करणं तिला शक्य होणार नाहीं हें कसं माझ्या ध्यानांत आलं नाहीं ? ही अगदीं सरळ गोष्ट कळायला कांहीं विशेष बुद्धिमत्ता असायला नको होती — छे छे, केवढा निर्बुद्ध मी ! — केवढा मूर्ख — इंदु जर आतां दगावली तर तिच्या हत्त्येचं पाप माझ्या माथीं येईल ! हत्त्या म्हणजे हत्त्या — निष्ठुरतेची पराकाष्ठा — माझ्या हातून स्त्रीहत्त्या व्हावी, असंच का माझ्या अदृष्टांत लिहिलं होतं ? छे छे, असलं हें कसलं अदृष्ट घेऊन मी या जगांत जन्म घेतला !"

राखालच्या डोळ्यांवाटे आंसवांच्या धारा लागल्या होत्या. उशींत तोंड खुपसून तो रडूं लागला होता.

थोड्यावेळानें मन बरेचसे हलकें झाल्यावर तो पुन्हां विचार करूं लागला. "माझी आशा फुकट गेली आहे. तसं व्हायचा योग नाहीं हें आतां मला कळून चुकलं आहे. पुन्हां विवाह करावा असं जर इन्दूला वाटलं असतं तर तिला माझं पत्र वाचून इतका धक्का बसला नसता. निराशा झाल्यामुळें तिला

थोडं दुःख वाटलं असतं खरं, पण पुढल्या आशेच्या अपेक्षेनें तिनं तें सांवरून घेतलं असतं. पण तसं कांहीं झालं नाहीं. असं कसं व्हावं ? माझ्याकडून चूक झाली ती इथंच. आजन्म हिंदु संस्कारांत वाढलेली, हिंदूंच्या घरांत जुन्या जमान्यांत आयुष्य काढलेली, ती अशाप्रकारें या सुधारकी प्रस्तावाला मनांत ठाव तरी कसा देईल ? आज कित्येक शतकेंपर्यंत या देशांत उच्च कुळांतील स्त्रिया विधवेनें पुन्हां लग्न करणं हें महापाप आहे असं समजत आल्या आहेत, या असल्या सनातनी वंशांत जन्म घेऊन कुठली स्त्री वंशपरंपरागत दृढमूल झालेल्या या संस्कारांना एकाएकीं उखडून काढायला समर्थ होईल ? — मीं अशी अपेक्षा केली हाच माझा पागलपणा. मी पागल नव्हे तर काय ? —

'नाहीं नाहीं. पागल असतों तर बरं झालं असतं. या दुःसह अशा मर्मभेदक यातनांच्यापासून बचावलों असतों ! ' —

राखाल उठून बिछान्यावर बसला. दोन्ही हातांनीं मस्तक दाबून धरून डोळे मिटून तो पुटपुटत होता, 'अरेरे ! जर पागल झालों असतों ! जर पागल झालों असतों !'

कचेरीच्या घड्याळांत एकाचा ठोका पडलेला ऐकतां तो दचकून उठला. पलंगावरून खालीं उतरून तो खिडकीपाशीं जाऊन उभा राहिला. इथून अन्तःपुरांत जाण्याचा दरवाजा दिसण्याजोगा होता. आकाश ढगाळलें होतें त्यामुळें चांदण्याचा प्रकाश फारसा पडत नव्हता. त्या अंधुक प्रकाशांत देखील नोकरचाकर लोक मधून मधून सारखे त्या दारातून ये जा करीत आहेत असें त्याला दिसून आलें.

कांहीं वेळपर्यंत शून्य दृष्टीनें तो त्या दाराकडे पहात राहिला होता. शेवटीं तो थकला आणि पुन्हां बिछान्यावर येऊन पडला. डोळे झांकून झोंप येते कीं काय हें पाह्यचा तो प्रयत्न करीत होता, पण त्या हतभागी जीवाच्या आजूबाजूला निद्रादेवी येणें शक्य होतें का ?

कांहीं वेळपर्यंत तो असाच बिछान्यावर पडून राहिला होता. तो पुन्हां दचकला. झांकलेल्या दरवाज्यावर कुणीतरी बाहेरून थापा मारीत होतें.

वीजेच्या झटक्याप्रमाणें एकच कल्पना त्याच्या मस्तकांत चमकली — राणीची शेवटची घटका आल्यामुळें ती बातमी द्यायला कुणीतरी आलें असावें.

तो चटकन् उठून बसला आणि त्यानें विचारलें, "कोण आहे?"

बाहेरून उत्तर आलें नाहीं.

दारावरच्या थापा मात्र पूर्वीसारख्याच सुरू होत्या.

राखाल उठला. थरथर कांपत असलेल्या हातानें त्यानें दार उघडलें. तो चकित झाला. विधवा वेषांतील एक स्त्री बाहेर उभी होती. थरथरत्या आवाजानें त्यानें विचारलें, "कोण? कोण तूं?"

एक शब्दसुद्धां न बोलतां ती स्त्री आंत आली आणि तिनें घाईघाईनें दार आंतून लावून घेतलें. ती राखालकडे तोंड वळवून उभी राहिली. माथ्यावरचा पदर तिनें थोडासा मागें सारला. केसाची एक बटा कानापाशीं आली होती ती तशीच मागें लोटून ती राखालकडे पहात उभी राहिली.

राखालला दिसून आलें, कीं ती स्त्री तरुण होती. सुमारें वीस वर्षांची होती. तिचें सौंदर्य जसें कांहीं ओसंडून राहिलें होतें. केवळ तिचे डोळे तेवढे उदासवाणे दिसत होते.

राखालनें तिला विचारलें, "तूं — आपण — कोण?"

ती स्त्री म्हणाली, "मी कनकलता."

राखालनें कनकलतेचें नांव ऐकलें होतें. त्यानें तिला दुरून केव्हांतरी पाहिलेंही असावें. तो म्हणाला, "अंः! काय खबर आहे? राणीची प्रकृति कशी काय आहे?"

गंभीर होऊन कनक म्हणाली, "एकंदरींत ठीक नाहीं."

राखाल श्वास आंवळून म्हणाला, "ठीक नाहीं? तर काय —"

पुढले शब्द त्याच्या तोंडावाटें बाहेर आले नाहींत. तारवटल्या डोळ्यांनीं तो कनकच्या तोंडाकडे पहात राहिला होता.

कनक तशीच गंभीर होऊन म्हणाली, "वैद्यबुवांनीं सांगून टाकलंय — रोग उलटेल कीं नाहीं याची शंका आहे."

तें ऐकतांच राखाल पलंगाला टेकून माथ्यावर हात घेऊन एकदम खालीं बसला.

कनकनें दिव्याची वात मोठी केली. शेजारची खुर्ची तिनें पलंगापाशीं ओढून घेतली आणि दिव्याकडे तोंड करून ती खुर्चीवर बसली. एक मिनिट-भर ती तशीच बसून राहिली होती. नंतर अतिशय मिष्ट आणि कोमल आवाजांत

ती म्हणाली, "आतां तें मनांत आणून काय होणार आहे बरं? ज्याच्या नशिबांत जें लिहिलं आहे तसं तें व्हायचंच. तें टाळणं कुणाच्या हातीं का आहे? असं डोळ्यांवाटे पाणी सांडूं नका — छे छे आपण तर एवढे ज्ञानी!"

राखालनें हळूहळू मान वर करून तिच्याकडे पाहिलें. त्यानें विचारलें, "राणीनंच का तुम्हाला माझ्याकडे पाठवलं?"

"नाहीं. ती अजून शुद्धीवर आली आहे कुठं?"

"शुद्धीवर नाहीं? केव्हांपासून अशी बेशुद्ध झाली आहे ती?"

"आपण तें पत्र देऊन बाहेर पडलांत — त्यानंतर अगदीं थोडावेळपर्यंत ती शुद्धीवर होती — त्यानंतर ती एकदम मुर्च्छित पडली."

राखाल विचार करूं लागला, 'पत्राच्या बाबतींत हिला कळलंयसं वाटतंय. आतां काय तें झांकून रहाणार आहे? एव्हांना सर्वांनाच कळलं असेल! शंकाच नाहीं! कळेना का! पण इतक्यांत सर्वत्र गडबड उडाली नाहीं कशी? कदाचित् राणीच्या प्रकृतीमुळं सर्वांचं लक्ष तिच्याकडेच लागलं असेल. जिवाशीं चाललेला खेळ — म्हणून कदाचित् त्यांचं लक्ष माझ्याकडे गेलं नसेल. पण ही कनकलता आली आहे कोणत्या उद्देशानं?'

राखाल बावरून गेला आहे असें दिसल्यामुळें त्याचें सांत्वन करण्याच्या उद्देशानें कनक म्हणाली, "आपण वधुराणीला आंत जें पत्र देऊन आलांत — कळलं का राखालबाबू — तें पत्र योगायोगानं पहिल्यानं माझ्या हातीं आलं — मीं तें लपवून ठेवलंय —"

राखाल आश्चर्यचकित होऊन म्हणाला, "तें पत्र तुम्ही लपवून ठेवलंय? कां म्हणून?"

कनकनें खुर्ची थोडीशी पुढें ओढली, एकदां राखालकडे पाहिलें आणि नजर खालीं करून खिन्नपणें ती म्हणाली, "तें पत्र दुसऱ्या कुणाच्या हातीं पडलं असतं तर काय झालं असतं इतक्यांत? पोलीस इतक्यांत —"

राखाल म्हणाला, "ठाण्यावरचे पोलीस आले असते तर काय झालं असतं?"

"काय झालं नसतं? सर्वनाश झाला असता. आपल्याला पकडून घेऊन गेले असते!"

"गेले असते तर गेले असते !—त्याची उठाठेव तुम्हांला कशाला ?"

कनकला राग आला. ती ओठ फुलवून म्हणाली, "आपल्या हातीं हातकड्या घालून आपल्याला बांधून नेलेलं पाहतांना मला कांहींच का वाटलं नसतं ? काय वाटतं तुम्हांला ? माझं आयुष्य दगडाचं आहे असं वाटलं तुम्हांला कीं लोखंडी वाटलं ?"—शेवटचे शब्द उच्चारतांना सळसळत कनकचा गळा दाटून आला होता. तिच्या दोन्हीं डोळ्यांवाटे आसवें येत होतीं.

कनकलतेचें हें एकंदर अवसान पाहून राखालचें आश्चर्य अधिकाधिक वाढूं लागलें. त्यानें विचारलें, "एवढंच सांगण्यासाठीं का तुम्हीं इथं आला होतां ?"

कनकनें राखालकडे पाहून एक रागाचा कटाक्ष फेंकला आणि म्हटलें, "का बरं ? हें सांगायला आलें म्हणजे काय गुन्हा केलाय मीं ? राग आला का आपल्याला ?"

तो तिचा प्रश्न डावलून राखाल म्हणाला, "एवढ्या रात्रीं कां आलांत तुम्हीं ?"

"आज अन्तःपुराचे सारे दरवाजे खुले आहेत हें पाहून मी चटकन् बाहेर पडलें आणि इथें आलें."

राखाल थोडासा नाराज होऊन म्हणाला, "हें आपलं धाडस कांहीं थोडंथोडकं नव्हे."

कनक मोठ्या मधुर वाणीनें म्हणाली, "पुन्हां पुन्हां मला 'आपण' 'आपण' म्हणून कां लाजवतां ? मीं कांहीं तशी कुणी नाहीं—मी आपली दासी आहें.—" शेवटचें वाक्य उच्चारतांना तिनें पुन्हां एकदां राखालकडे एक मधुर कटाक्ष फेंकला. त्यानंतर खालीं तोंड करून ती म्हणाली, "कुणी धाडस उगीच का करतं ?—जीवाच्या आकांतानं—"

"तुझ्या जीवाचा आकांत कां झाला असा ?" राखालनें विचारलें. त्याला वाटलें, या बाईच्या मनांत कांहींतरी गुप्त कारस्थान असावें.

कनक कांहीं बोलली नाहीं. तशीच मान खालीं घालून ती बसून राहिली होती.

थोडा वेळ वाट पाहून राखालनें पुन्हां विचारलें, "काय आहे तुझ्या मनांत ?"

तिरप्या नजरेनें राखालकडे पहात लाजत लाजत थांबत थांबत कनक म्हणाली, "जर — दासीला — चरणांपाशीं स्थान दिलंत — या आशेनं आलें आहें मीं ! — दुसरं काय असायचं मनांत ?" — असें म्हणून तिनें एक सुस्कारा सोडला.

तिचें तें भाषण ऐकून राखालचें पित्त भडकलें. त्याला तिचा तिटकारा आला. त्यानें एकदम तोंड दुसरीकडे वळवलें.

थोड्या वेळानें कनक काकुळतवाणीनें बोलूं लागली. ती म्हणाली, "असं पहा, वधुराणीच्या नशिबीं जें होतं तें तर झालंच. रात्र संपतां संपतां सारा कारभार आटोपेल असं वाटतंय. एवढी दौलत — ही राजाची संपत्ति वाटे-वरच्या चोरानं लुटून खावी तें बरं का ? आपणच कां तिचा उपभोग घेऊं नये ? आपल्याला तर — आपल्याला तर —"

राखाल तिच्याकडे तोंड फिरवून म्हणाला, "मला काय ?"

कनकनें माथ्यावरचा पदर जरा पुढें ओढून घेतला आणि अत्यंत गोड गोड अशा वाणीनें ती म्हणाली, "आपल्याला तर — विधवेशीं विवाह करायला कांहीं अडचण वाटत नाहीं —"

राखाल तोंड वेंडावून म्हणाला, "तुझ्याशीं का ?"

"काय हरकत आहे ? मीही ब्राह्मणाचीच मुलगी आहें. माझे वाडवडील चांगले कुलीन होते."

राखाल तसाच तोंड वेंगाडून म्हणाला, "तें कुल तूं उज्ज्वल करायला पहात आहेस होय ?"

त्याच्या शब्दांतला श्लेष हिशेबीं न घेतां ती म्हणाली, "आपण जसे भवेन्द्र आहां तसेच भवेन्द्र होऊन रहा. कुणाला कळणार आहे तें ? आपण उभयतां राजाच्या थाटांत राहूं."

राखाल आपल्याशींच म्हणत होता, 'ही मानवी कीं पिशाची ? — काय हा पैशाचा लोभ ! राणीला गेलेलं पत्र हिनं वाचलं असेल तर पत्नी या नात्यानें हिच्यावर मी केव्हांतरी प्रेम करीन असं कसं वाटलं हिला ? केवळ संपत्तीच्या लोभानं धर्मावर तिलांजली द्यायला ही तयार झाली आहे — केवढी सैतानी वृत्ती ही !'

राखाल कांहीं बोलत नाहीं असें पाहून पुन्हां एकदां त्याच्याकडे पाहून कटाक्ष हाणून ती म्हणाली, "द्या ना उत्तर. या दासीला आपल्या चरणांपाशीं राखाल का ?"

दांतओठ खात चिडून संतापून राखाल म्हणाला, "असं वाटतंय, तुला आडवी घालावी आणि या पायांनीं तुझा गळा दाबावा. एक स्त्रीहत्त्या केली आहे मीं — असं वाटतंय, कीं आणखी एक कां करूं नये ?"

कनक उठून उभी राहिली. एका क्षणांत अभिनेत्रीचें सारें अवसान एकदम बदलून गेलें. ती गंभीरपणें म्हणाली, "राखालबाबू, तुम्हीं तसंच कांहींतरी करावं असं मलासुद्धां वाटतंय. असंच कांहीं केलंत, या आपल्या दोन्हीं पायांनीं माझा गळा दाबून हें माझं निष्कारण कलंकित झालेलं जीवन जर संपवून टाकलंत, तर असं वाटतंय, जी मी ही अशी आहें त्या माझा उद्धार तरी होईल ! पण हें सारं काव्य आहे, तें होणं नाहीं ! द्या — मला तुमची पायधूळ द्या अन् माझ्या या अप्रस्तुत वर्तनाची मला क्षमा करा !" असें म्हणून कनकलतेनें चटकन् राखालच्या पायाला हात लावून त्याची पायधूळ घेतली.

कनकलतेचें हें विलक्षण वर्तन पाहून तो थक्क झाला. त्याच्या आश्चर्याला अवसर न देतां कनक बोलूं लागली, "आपलं तें पत्र वाचल्यापासून आपली पायधूळ घेण्यासाठीं माझा जीव कासावीस होत होता. कुठलाही माणूस इतका सच्चा, इतका त्यागी होऊं शकेल असं मला कधीं वाटलंसुद्धां नसतं. मी आपल्यापाशीं प्रेमाच्या गोष्टी सांगायला आलें नव्हतें राखालबाबू, भक्तीभावानं मी आलें होतें. कोळसा उगाळला तरी काळाच म्हणतात तसंच झालं माझं. माझा जातिवंत खोडकरपणा जागा झाला. वाटलं, थोडसं नाटक करावं ! – हो ! मी सांगायला विसरलें, मी निष्ठावंत हिंदु विधवा नाहीं कीं कुणीही नाहीं – मी एक नटी आहें. तोंडाला रंग लावून कलकत्त्याच्या धंदेवाईक स्टेजवर प्रेम करीत, प्रेमाचीं गाणीं गात गात माझं तोंड रक्तबंबाळ झालंय राखालबाबू. मी खरोखरी कोण आहें हें इथल्या कुणालाही माहीत नाहीं. आज केवळ तुम्हांलाच तें कळलं. तुम्ही जसं सोंग घेतलंय तसंच मीही पण सोंग घेतलंय."

राखाल म्हणाला, "तुम्हीं सोंग घेतलंय ? कां ?"

"माझं प्राक्तन – दुसरं काय ? तो इतिहास फार मोठा आहे राखालबाबू. तशीच संधि मिळाली तर केव्हांतरी सांगेन आपल्याला. अन् प्राक्तनाचा दोष

तरी कां म्हणूं मी ? – गुणच म्हणायला हवं. आपल्यासारखे लोक या पृथ्वीवर आहेत, हें मी इथें आलें नसतें तर कसं कळलं असतं मला ? मी आतां इथं फार दिवस रहाणार नाहीं, पण जे कांहीं दिवसपर्यंत मी इथें आहे तोंपर्यंत आपलं कांहीं काम माझ्या हातून झालं तर मी करीन. तर मग आतां येतें. प्रणाम."

राखाल कृतज्ञतापूर्ण दृष्टीनें कनकलतेकडे पहात राहिला होता. तो म्हणाला, "जरा थांबा. थोडी राणीची खबर विचारायची आहे मला."

कनकलता पुन्हां खाली बसली.

राखालनें विचारलें, "तें पत्र तुमच्या हाती कसं आलं ?"

कोणत्या परिस्थितींत तें पत्र आपल्या हातांत आलें तेव्हांपासूनची सर्व हकिकत कनकलतेनें राखालला सांगितली. त्यानंतर राखालनें विचारलें, "त्यानंतर एक दोन वेळ राणी शुद्धीवर आली होती, त्यावेळीं तुम्ही होतां का तिथें ?

"त्यावेळीं मी तिथंच होतें."

"त्यावेळीं ती काय म्हणाली ?"

"विशेष कांहींच बोलली नाहीं."

राखाल संकोचपूर्वक विचारूं लागला, "माझ्यावरती खूपच चिडली असावी असं वाटलं का तुम्हांला ?"

कनक गंभीरपणें म्हणाली, "हें विचारण्यांतच अर्थ नाहीं राखालबाबू. ती शुद्धीवर आली त्यावेळीं पत्र कुठंय म्हणूनसुद्धां तिनं विचारलं नाहीं."

राखालचा जीव खालीं पडला. त्यानें एक मोठा सुस्कारा सोडला.

कनकलता बोलत होती, "आतां या गोष्टीचा विचार करण्यांत काय अर्थ आहे ? आपण दगा दिला नाहीं, शेवटीं तिची राखणच केली — यासाठीं खरोखरीच तिला तुमचे उपकार वाटले असतील. योगायोगानं जर यापुढं ती बरी होऊन उभी राहिली तर एकंदरींत कल्याणच होईल. आपण आतां काय करणार आहां ?"

राखाल म्हणाला, "मी आतां इथून निघून जाणार आहें. वधुराणीच्या जिवाला भय नाहीं एवढं कळलं म्हणजे मी इथून निघून जाणार आहें."

"कुठं जाणार आहां ?"

" तें कांहींच ठरवलं नाहीं. जिकडे दोन डोळे नेतील तिकडे जाईन. "

कनक म्हणाली, " राखालबाबू, माझं एक मागणं — "

" कोणतं मागणं आहे तुझं ? "

" जायच्या पूर्वी माझी एकदां भेट घ्याल का ? "

" कशाला ? "

" तसंच कांहीं कारण आहे. "

" कोणतं कारण ? "

" तें तेव्हांच सांगेन. सध्यां मला सांगायचंय तें एवढंच, कीं पुन्हां माझी भेट घेतल्याशिवाय जर तुम्हीं निघून जाल तर नकळत तुमच्या हातून आणखी एक पाप घडेल. एका माणसाचा सत्यानाश व्हायला तुम्हीं कारणीभूत व्हाल — अन् तें माणूस आहे निर्दोष. जायच्या पूर्वी मला नक्की भेटून जाईन असं वचन द्या. "

क्षणभर थांबून राखाल म्हणाला, " तुझी ही मागणी मोठी रहस्यमय दिसते. मला कांहीं कळत नाहींसं झालंय. ठीक आहे. तुम्हीं एवढं आग्रहानं सागतांहां त्याअर्थी मी तसं वचन देतों. "

कनक उठून उभी राहिली आणि म्हणाली, " तर मग मी आतां येतें. प्रणाम ! "

राखालही उठून उभा राहिला. कनकच्या बरोबर दारापर्यंत जाऊन तो म्हणाला, " आतां गेलांत म्हणजे राणीची प्रकृति कशी आहे तें पाहून रामूबरोबर मला निरोप माठवा. "

होकार देऊन कनक निघून गेली.

थोड्यावेळानें रामू आला. त्यानें सांगितलें, " रात्रीं दोन वाजायच्या सुमाराला राणी शुद्धीवर आली आणि चांगली बोलूं लागली. तिनें थोडेसें दूध घेतलें. आतां तिला पुन्हां झोंप लागली आहे. " तें ऐकून राखालचा जीव खालीं पडला.

आज झालेल्या सर्व प्रसंगाचा तो पुन्हां पुन्हां विचार करीत होता. कनकनें शेवटीं जातांना सांगितलेलें रहस्य कोणतें असावें याचा विचार करीत असतांना रात्र संपायच्या सुमाराला तो झोंपीं गेला.

: ८ :

सकाळीं राखाल जागा झाला. बिछान्यावरून उठून कांहीं वेळ तो गच्चीवर शतपावली करीत होता. थोड्या वेळानें तो परत आला त्यावेळीं त्याला कळून आलें, कीं राणी जागी झाली होती. तिची प्रकृति आतां बरी होती. आतांच तिनें औषध घेतलें होतें. वैद्यबुवांनीं सांगितलें, कीं आतां भीतीचें कारण राहिलें नाहीं.

यानंतर थोड्या वेळानें एक दासी आली आणि थोरल्या राणीसाहेब बोलावताहेत असें तिनें राखालला सांगितलें. राखालनें विचारलें, "राणी काय करतेय?"

दासी म्हणाली, "सरोदिदी बसलीय तिच्याजवळ. तिच्याबरोबर बोलातायत त्या."

सुरबाला नांवाची एक अनाथ ब्राह्मणकन्या येऊन आश्रयाला राहिली होती असें राखालनें ऐकलें होतें, पण यावेळपर्यंत तिला त्यानें मुळींच पाहिलें नव्हतें. सुरबालाही वधुराणीची एक आवडती सोबतीण आहे हें त्याला माहीत होतें.

राखाल अन्तःपुरांत गेला. तो आलेला पहातांच थोरल्या राणीसाहेब म्हणाल्या, "काय रे बाबा हें, काय तुझी दशा झालीय ही? तोंड कसं उतरून गेलंय! डोळे खोल गेलेयत! रात्रीं झोंप आली नाहीं वाटतं?"

राखालनें तिच्या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं. तो खालीं मान घालून उभा होता. त्याच्या डोळ्यांवाटे टपटप आसवें गळत होतीं.

थोरल्या राणीसाहेब म्हणाल्या, "रडूं नकोस भवेन, रडूं नकोस. तुझ्या डोळ्यांत पाणी आलेलं पाहिलं, कीं माझं काळीज फाटून जातं रे बाबा. रात्रीच्या नंतर सूनबाईला फीट आली नाहीं. तेव्हांपासून आतां तिची प्रकृति बरी आहे. भ्यायचं कशाला? आतां कांहीं काळजी करायला नको, असं वैद्यराजांनींच सांगितलं. काल रात्रीं तूं जेवलास कीं उपाशीं होतास, तें पहायला देखील सवड झाली नाहीं मला. जा, स्नान करून ये. मी तुझ्या संध्येपूजेची तयारी करून ठेवतें. आन्हिक उरकून थोडा फराळ कर! — जाणार आहेस का? — सूनबाईला पाह्यला आतांच जाणार आहेस का?"

स्नानसंध्या उरकून फराळ करून राखाल ज्यावेळीं बाहेर आला त्यावेळीं नऊ वाजले होते. बैठकखान्याच्या घराशेजारीं तो आला. पहातो तों व्हरांड्याच्या बाकावर खगेंद्रनाथ बसून राहिला होता. त्यानें साहेबी पोशाख केला होता. त्याच्या माथ्याला सोला हॅट होती. त्यानें आपली बायसिकल व्हरांड्याच्या खालीं ठेवून दिली होती.

राखालला पहातांच तो उठून उभा राहिला. माथ्यावरची टोपी काढून तो म्हणाला, "नमस्कार महाशय."

राखाल म्हणाला. "नमस्कार. अचानक कसे आलांत? कुठून आलांत?"

"कलकत्याहून आलों. तसंच महत्त्वाचं काम आहे आपल्यापाशीं."

"काम आहे का? ठीक, ठीक. स्नानबीन करा, फराळ करा, मग स्वस्थपणें कामाच्या गोष्टी बोलूं."

खगेंद्र म्हणाला, "जी — नाहीं. फार जरूरीचं काम आहे. मला लगेच तीनच्या गाडीनं पुढं गेलं पाहिजे. आतांच काय तें बोलून टाकूं."

त्या माणसाचा एकंदर रुबाब पाहून राखालला मनांतल्या मनांत थोडा राग आला. त्याला वाटलें, याची बहीण आहे नाटकमंडळींतली नटी आणि हा आलाय जसा कांहीं एकादा नबाबच! राखाल म्हणाला, "ठीक आहे. थोडा वेळ थांबा. मला सवड झाली कीं मीं तुम्हांला बोलावणं पाठवतों." असें म्हणून तो जिना चढून वर निघून गेला.

खगेंद्र आपल्याशींच म्हणाला, 'बेटा होता रेल्वेवरचा कारकून — दरमहा २५ रुपयेवाला — आतां नबाब होऊन बसलाय! आतां कशी याची नबाबी उतरतों ती पहा.'

खगेन तिथेंच बसून वाट पहात होता. मधून मधून खिशांतील घड्याळ काढून उघडून पहात होता. अर्धा तास होऊन गेला तरीही बाबूंनीं बोलावणें पाठवलें नाहीं. खगेन चिडला होता. तो आपल्याशींच म्हणाला, 'डॅम! इथं काय म्हणून मीं उमेदवारी करीत बसूं? उमेदवार कोण? मी कीं हा राखाल? आतां स्वतःच जातों. त्याची पर्वा मला कशाला?"

बुटाचा खडखड आवाज करीत खगेन जिना चढून माडीवर गेला.

राखाल आपल्या शेजघरांत खुल्या खिडकीपाशीं एक इझीचेअरवर अंग टाकून आकाशाकडे बघत विचार करीत होता. बुटांचा आवाज कानीं आल्यामुळें त्यानें दचकून दाराकडे पाहिलें.

खगेन्द्र आंत आला आणि खवचटपणें म्हणाला, “ फार कामांत आहां, होय ना ? ”

जवळ असलेली एक खुर्ची ओढून घेऊन तो राखालच्या शेजारीं बसला.

राखालनें चिडून कपाळाला आंठ्या घातल्या. त्यानें खगेनला विचारलें, “ काय हवंय् आपल्याला ? ”

खिशांतला रुमाल बाहेर काढून तो हातानें फिरवीत फिरवीत खगेन म्हणाला, “ थोडे पैसे हवेयत् मला. ”

राखाल म्हणाला, “ मग माझ्याकडे कशाला आलांत ? आपल्या बहिणीच्या पगारांतली कांहीं बाकी येणें असेल तर तिला जाऊन विचारा ना ! दिवाणजी इथं नाहींत. बाहेरगांवीं गेले आहेत. नायब दिवाण आहेत, त्यांना विचारा, म्हणजे ते हिशेब करून देऊन टाकतील. ”

खगेन्द्र आपल्याशींच उद्गारला, ‘ नबाब ! ’ उघड म्हणाला, “ जी — बहिणीच्या पगाराच्या हिशेबांतले नव्हेत. आपल्याकडून मला कांहीं मिळावं अशी अपेक्षा आहे माझी. तसे फारसे नाहींत — आज रोख एक लाख अन् दर महिन्याच्या महिन्याला बेंगाल बॅंकेवर दोन हजारांचा चेक मिळायला हवा मला. एवढं झालं कीं बस्स ! ”

आश्चर्यचकित होऊन राखाल खगेनच्या तोंडाकडे पहात राहिला होता. शेवटीं तो म्हणाला, “ नशापाणी करीत असतां वाटतं ? ”

“ केला असता — पण पैशाच्या अभावीं सध्यां फारशी सवड होत नाहीं. ‘ जॉनी वॉकर ’ ची एक बाटली म्हणजे माझा नाश्ता होता. नशा करून आलों नाहीं कांहीं आपल्यापाशीं. चांगलं डोकं ठिकाणावर ठेवून उघड्या डोळ्यांनीं आलोंय. झटपट रक्कम बाहेर काढा पाहूं ! एक लाखाचे कंपनीचे कागद असले तरी चालतील. त्यांच्यावर ‘ एन्डॉर्स ’ करून दिलंत म्हणजे झालं — किंवा बॅंकेवर चेक लिहून दिलात तरी देखील चालेल. कलकत्त्याला जाऊन मी तो चेक वटावीन. ”

खगेन हो हो करून हंसत म्हणाला, “ मीं आपला भाऊच आहें म्हणाना ! – ” नंतर आवाज खालीं आणून तो म्हणाला, “ आपण सख्खे भाऊ नव्हे, मावसभाऊ आहों म्हणाना. — म्हणजे चोरापोरांतल्या नात्यानं. एवढी मोठी दौलत आपण एकटेच घशाखालीं घालणार आहांत का महाराज ?

मावसभावाला थोडीशी वानगी द्या कीं. अन् मग खुशाल साऱ्या इस्टेटीचा उपभोग घ्या! मीं मागतोंय नुसते रोख एक लाख रुपये अन् दरमहा दोन हजार — तेवढे मिळाले कीं मीं खूष! — आतां ही बंगाली भाषाकळली ना?"

राखालनें विचारलें, "बंगाली भाषा कसली?"

"सांगायचं म्हणजे एवढंच, कीं आपण वस्तुतः भवेंद्र चटर्जी नाहीं. आपण आहांत राखाल भटचार्ज्जी — खुश्रूपूरला खट्कट् करून तारा करीत होतां, सट्सट् तिकिटं देत होतां, आगगाडी आली कीं फाटका बूट फट्फट् वाजवीत ट्रेन पास करण्यासाठीं प्लॅटफॉर्मवर धांवत सुटत होतां! आतां कळलं ना? कीं यापेक्षां अधिक मल्लिनाथी करायला हवी?"

राखाल शांतपणें म्हणाला, "हें सारं कसं काय कळलं आपल्याला?"

खगेन छातीवर हात मारून म्हणाला, "फार परिश्रम करावे लागले! फार पैसा खर्चीं घालावा लागला!"

राखाल तसाच शांतपणें म्हणाला, "आपले सारे श्रम आणि पैसा अगदीं फुकट गेले."

"कारण?"

"कारण हेंच, कीं आपल्याला एक दमडीसुद्धां मिळायची नाहीं."

खगेन्द्रानें पुन्हां दटावून विचारलें "दमडीसुद्धां मिळायची नाहीं?"

"नाहीं."

खगेन्द्र क्षणभर स्तब्ध बसला. शेवटीं तो म्हणाला, "राखालबाबू, आपल्याला कदाचित् वाटत असेल, कीं ही माझी नुसती दमदाटी आहे. नाहीं बरं महाराज! तुम्हांला वाटत असेल कीं मी एवढ्या मोठ्या इस्टेटीचा मालक, हा कुठला कोण, हा माझं असं काय करणार आहे? साक्षीपुरावे याला कुठून मिळणार आहेत? — महाशय, आम्हीं कलकत्त्याचे लोक, तसं कच्चं काम करीत नसतों! अगदीं बळकट साक्षीपुरावा जय्यत तयार आहे. मीं तुमच्या मैनामतीला गेलों होतों, वसंतपूरला गेलों होतों, खुश्रूपूरला गेलों होतों, अन् आपण जिथें मुळींच कांहीं गेला नव्हतां त्या तीनतारिया मठापर्यंतसुद्धां गेलों होतों. खुश्रूपूरचा आपला सिग्नलमन, पाणीवाला भटजी, दोघे हमाल

हे सारे रजा घेऊन आलेयत्. कलकत्त्याला माझ्या घरीं बसून डाळरोटीवर ताव मारताहेत. तेच पुरावा देऊन शाबीत करतील कीं आपण म्हणजेच त्यांचे पूर्वीच छोटेबाबू राखाल भट्टचाजी ! तीनतारिया मठाचे चौघेजण संन्यासीही घेऊन आलोंय्—गोसावी लछमनगीर, भैरवगीर, वामदेवगीर आणि दामोदरगीर ! त्यांच्या गांजाच्या धुरानं माझ्या घरांत राहणं कठीण होऊन बसलंय. आपल्याला पाहिल्याबरोबर ते सांगतील, कीं त्यांचा भूतपूर्व महंत भजनानंद म्हणजे कांहीं तुम्ही नव्हे. पैसे देऊन साक्षी फोडायला आपल्याला वाव दिला नाहीं म्हटलं ! माझ्या घराच्या दरवाजावर चौघे दरवान अष्टौप्रहर पहारा देताहेत. कळलं ? सारं कांहीं ऐकून घेतलंत ना ? चटकन् रक्कम बाहेर काढा पाहूं ! नाहींतर नाहीं म्हणा. आतांच कृष्णनगराला जाऊन पोलीस साहेबांसमोर सारं कांहीं सांगून टाकतों. पीनलकोड आहे का इथं ? नसला तर दिवाणजीच्या कचेरींतून मागवून घ्या आणि ४१९ कलम वाचून पहा."

राखाल खंबचटपणें म्हणाला, "तें कलम मी वाचून पाहिलं आहे."

"पाहिलंयत ना ? तीन वर्षे सरकारी पाहुणचार—कळलं ना ? आतांतरी मन बदललं का आपलं ?"

राखालनें एक जांभई दिली. तो म्हणाला, "नाहीं. आपल्याला एक दमडीसुद्धां मिळायची नाहीं. ही तुमची सारी दमदाटी फुकट गेलीय. मीं कालच वधुराणीला सारं कांहीं सांगून टाकलंय्."

तें ऐकतांच खगेनला जबर धक्का बसला. तो उद्गारला, "ऑः ! सांगून टाकलं ?"

"हो ! सांगून टाकलं. आपल्या—बहिणीला—अगर ती कोण जी असेल तिला म्हणा—त्या कनकलतेला विचारा. ती सारं कांहीं सांगेल तुम्हांला—" असें म्हणून त्यानें नोकराला हांक मारली.

नोकर येतांच राखाल त्याला म्हणाला, "या पाहुण्यांना खालीं घेऊन जा. यांच्या स्नानाफराळाची नीट व्यवस्था कर आणि यांना जर आपल्या बहिणीला भेटायचं असेल तर अंतर्गृहांतल्या दासीला बोलावून थोरल्या राणीसाहेबांकडे वर्दी द्यायला सांग."

: ९ :

जिन्यावरून खालीं उतरून खगेन व्हरांड्यावर आला आणि येऊन धपकन् बाकावर बसला. नोकर तेलाची वाटी घेऊन आला आणि म्हणाला, "बाबू! आपल्यापाशीं कांहीं कापडचोपड आहे कीं कोठींतून आपल्यासाठीं धोतर मागून आणूं?"

खगेन्द्र म्हणाला, "धोतर नकोय मला!"

नोकर म्हणाला, "तर मग स्नान कसं करणार तुम्हीं?"

"मी स्नान करणार नाहीं."

खगेन्द्राची मुद्रा पाहून नोकराला थोडेंसें आश्चर्य वाटलें. थोडीशी भीतिही वाटली. त्यानें कांहीं वेळ थांबून वाट पाहिली आणि नंतर विचारलें, "तरमग फराळाचं घेऊन येऊं का?"

खगेन्द्र त्याच्यावर खेंकसला, "नको!"

नोकराला वाटलें, कीं मालकांनीं या माणसाचा चांगलाच अपमान केला असला पाहिजे, दुसरें कांहीं नाहीं, तें मनाला लागल्यामुळें हा स्नान करीत नाहीं, कीं फराळही करीत नाहीं. त्यानें कांहीं वेळ वाट पाहिली. नंतर त्यानें पुन्हां त्याला दबतदबत विचारलें, "आपल्या भगिनीला तरी भेटायचं आहे का आपल्याला? वर्दी देऊं कां आंत?"

"जा. दे वर्दी!—" असें म्हणून खगेन्द्र तोंड फिरवून स्वस्थ बसला.

आणलेली तेलाची वाटी घेऊन नोकर निघून गेला तेव्हां खगेन्द्रानें कोटाच्या आंतल्या खिशांतून एक चांदीचें फ्लास्क बाहेर काढलें. त्यांत ब्रँडी होती. स्क्रू फिरवून त्यानें त्या फ्लास्कचें तोंड उघडलें आणि तें तोंडाला लावून त्यानें त्या बिनपाण्याच्या दारूचे दोन तीन घोट घशाखालीं घातले. तें फ्लास्क पुन्हां खिशांत ठेवून गालांवर हात घेऊन तो विचार करूं लागला.

केवढी तरी मोठी अपेक्षा मनांत धरून तो आला होता. ती त्याची फार दिवसांची आशा आज अगदीं जमीनदोस्त झाली होती. इकडे ती निराशेची वेदना आणि त्यावर रिकाम्या पोटावर घेतलेली ब्रँडी या दोहोंच्या प्रभावामुळें त्याचें माथें फिरून गेल्यासारखें झालें होतें. राखालनें कोणत्या उद्देशानें सारी हकीकत वधुराणीला सांगून टाकली, त्याचें कारण खगेन्द्राला अंदाजतां येईना.

त्या बाबतींत शांतपणें विचार करण्यास त्याचा मेंदू आतां त्याच्या ताब्यांत नव्हता. त्याच्या नाकाकानांतून जरी आगीचे भपकारे येत होते तरी त्याचें काळीज थंडगार होऊन गोठून गेलें होतें. अर्थात् त्यानें फ्लास्क पुन्हां बाहेर काढून ब्रँडीचे आणखी एक दोन घोट घेतले.

तो अस्वस्थ झाला होता. त्याला वाटलें कचेरीच्या अंगणांत थोडावेळ रपेट करावी किंवा धांवून पहावें. त्याच्या मनांत तसें आलें खरें, पण तें अमलांत आणण्याचें धैर्य त्याला झालें नाहीं. पहाणाऱ्यांनीं त्याचा संशय घेतला असता — तो झिंगला आहे अशी जर कुणाला कल्पना आली तर कुणीही त्याला अन्तःपुरांत जाऊं दिलें नसतें आणि मग कनकची भेट घेणें अशक्य झालें असतें.

अशा प्रकारच्या मनःस्थितींत त्यानें सुमारें २० मिनिटें काढलीं. नोकर पुन्हां आला आणि म्हणाला, " बाबू, यावें. " डळमळत डळमळत खगेन नोकराच्या बरोबर निघाला.

पूर्वी ज्या खोलींत त्यानें कनकची भेट घेतली होती, त्याच खोलींत त्याला नेण्यांत आलें. तिथें कनकलता त्याची वाट पहात होती. तो तिथल्या एका खुर्चीवर बसला आणि वर छपराकडे पहात त्यानें विचारलें, " काय खबर आहे, कनक ? "

कनक साशंक झाली होती. तिनें भीत भीत विचारलें, " काय ? — असं काय झालंय हें तुम्हांला ? असं काय करतांहां ? "

खगेननें विचारलें, " तुला माहीत नाहीं ? "

" नाहीं. "

" तर मग तें सारं खोटंच कीं काय ? मला थापाच दिल्या का त्या बेट्यानं ? "

" कुठल्या बेट्यानं ? "

" दुसरा कोण — तुमचा तो राखाल ! "

" भेट झाली का त्यांची ? काय म्हणाले ते ? "

" मी त्याची गांठ घेतली आणि त्याच्यापाशीं पैसे मागितले. पैसे दिले नाहींस तर सारं कांहीं चव्हाट्यावर मांडतों अशी तंबी दिली त्याला, तेव्हां तो म्हणाला, कीं मी काल वधुराणीला सारं कांहीं सांगून टाकलंय ! — हें खरं आहे कीं खोटं आहे ? "

कनक म्हणाली, “ खरं आहे. ”

खगेननें पुन्हां खिशांतून फ्लास्क काढलें आणि एकदोन घोट घेऊन तो म्हणाला, “ मग तें कळल्यावर इथले लोक काय म्हणाले ? ”

“ इथल्या कुणालाच तें कळलेलं नाहीं. नुसतं वधुराणीला कळलंय् ! — पण तुम्हीं रिकाम्या पोटीं ही अशी दारू कां पितां ? ”

खगेन्द्र म्हणाला, “ दारू माझं जीवन ! — दारू माझी राणी ! — तुला हवीय थोडीशी ? ”

कनक म्हणाली, “ भलतंच कांहींतरी. तुम्हींसुद्धां पिऊं नका ती. गृहस्थाच्या घरांत हें काय चालवलंय ? ”

नुसतें ‘ ऊं: ’ करून खगेन्द्रानें डोळे मिटून घेतले. थोडावेळ गेल्यावर तो आपलें डोकें जोरजोरानें खाजवूं लागला. नंतर ‘ ही ही ’ करीत आपल्याशींच हंसूं लागला.

त्याचें हें ध्यान पाहून कनक म्हणाली, “ हें काय चाललंय ? इथल्या कुणी पाहिलं तर काय वाटेल त्यांना ? ”

खगेन्द्र डोळे मिटून बोलत होता, “ काय वाटेल होय ? पहिल्यानं असं वाटेल, मला बुद्धिभ्रंश झालाय ! हा ऽ ऽ हाः हाः ! — असं पहा, पहिल्यानं राखालनं जेव्हां मला ही गोष्ट सांगितली — हाः हाः — त्यावेळीं — हाः हाः मला वाटलं कीं हा एकदम साधुसंत झालाय ! बरं का कनक, सारं कांहीं सोडून टाकून दौलतीवर लाथ मारून इथून निघून जायच्या विचारांत आहे ! — आतां तूं हें सांगितलंस तेव्हां त्याचं कारस्थान माझ्या ध्यानीं आलं ! हाः हाः — खेळ खेळतोय — छान खेळ खेळतोय ! — ”

कनकनें विचारलें, “ कसला खेळ ? ”

यावेळीं त्याला दारू चांगलीच चढली होती. बोलत असतांना त्याची जीभ आडवी पडत होती. तो म्हणाला, “ तुला माहीत नाहीं कसला खेळ तो ? अजून कळलं नाहीं तुला ? किती झालं तरी तूं स्त्री — तुझी अक्कल कितीशी असायची ? हाः हाः हाः ! त्याला काय वाटलं माहीत आहे ? — वाटलं — आज ना उद्यां माझी ही लबाडी उघडकीला येणारच येणार — तेव्हां काय होईल माझं ? तूं पाहिलंस ना, तुझी वधुराणी त्याच्या प्रेमांत गुंतून पडलीय — प्रेमसागरांत बुड्या मारतेय ! हाः हाः — मासोळी गळाला लागली — आतां

जाणार कुठं? आतां जर तिला कळलं कीं हा भवेन्द्र नव्हे — तरीसुद्धां आतां तुझी वधुराणी त्याला लोटून द्यायची नाहीं. खरं कीं नाहीं कनक? हाः हाः! म्हणून त्यानं ठरवलं, तिला सारं कांहीं सांगून टाकायचं — विधवा-विवाह म्हणा कीं सिव्हिल मॅरेज म्हणा — कांहींतरी एक करून टाकायचं! — हें सारं दाबलं गेलं, बहोत अच्छा! उघडकीला आलं, डॅम केअर! उंः! — काय अक्कल! काय अक्कल! — असें म्हणून खगेन सारखा माना डोलवीत होता.

कनक स्तब्ध होऊन ऐकत होती. खगेन बोलत होता, "अच्छा! अच्छा!! जातो कुठं? वधुराणीला पकडली आहे ना मुठींत! आतां कसली भीति तुरुंगांत जायची? पण कलंक लागेल तो? खरं कीं नाहीं कनक? वधुराणीला कलंक लागेल कीं नाहीं? — " तोच प्रश्न तो कनकला पुन्हां पुन्हां विचारीत होता.

कनक कांहीं उत्तर देत नाहीं असें पाहून तो म्हणाला, "ठीक आहे. मी आतां पुन्हां जातों राखालकडे, जातों अन् सांगतों, तुझा सारा मतलब मला कळलाय. बऱ्या बोलानं पैसे दे नाहींतर सारं चव्हाट्यावर मांडतों — लग्न केलंस म्हणून काय झालं? दर आठवड्याच्या आठवड्याला बंगवासींत असे लेखावर लेख लिहितों, कीं बाप रे बाप! देश सोडून पळून जावं लागेल तुला. असा सहज सोडायचा नाहीं तुला — सहज सोडायचा नाहीं रे बाबा! — " तेंच वाक्य तो पुन्हां पुन्हां बोलत होता.

कनककडे त्याची नजर गेली. ती गंभीर होऊन राहिलेली आहे असें पाहून तो म्हणाला, " पण कनक, तूं बिलकुल निरुपयोगी आहेस. तुझी वधुराणी आतां विधवा-विवाहाला तयार झालीय — माझ्या वतीनं तूं तिला — तूं तिला राजी केली नाहींस! — थूः तुझी!"

त्याची ती बडबड अनावर होत असलेली पाहून कनक घाबरून गेली. त्याच्या खांद्याला धरून त्याला खुबळून ती म्हणाली, "खगेनबाबू — खगेनबाबू! — "

झोंपेंतून जागा झाल्याप्रमाणें डोळे उघडण्याचा प्रयत्न करीत तो म्हणाला, "काय?"

"हें काय चाललंय तुमचं?"

" खाय ?— खाय खेलं मी ? "

" तुम्ही झिंगला आहांत. भलभलतं बडबडतांहां. "

" खाय भलभलतं बडबडतोंय ? ऊं: "

कनक म्हणाली, " ते तुमचे बेत आतां पुरे झाले. आतां पुन्हां राखाल-बाबूकडे जाऊं नका. आतां पैसे मिळायची आशा सोडून द्या. "

" खसलीच — आशा न्हाई ? "

" नाहीं. "

" खां नाहीं ? "

" तो फार मोठा इतिहास आहे. यावेळीं सांगितला तरी तो तुम्हांला कळायचा नाहीं. आपलं डोकं सध्यां ठिकाणावर नाहीं. आतां बाहेर जा, स्नान करा, घांसभर खा आणि झोंप घ्या. जागे होऊन ताळ्यावर आलांत कीं मग आपण बोलूं. "

खगेन्द्र उठून उभा राहिला. तो डळमळत होता. त्याचे डोळे लालभडक झाले होते. ते गरगर फिरत होते. त्यानें पुन्हां विचारलें, " आथां — कसलीच — आशा न्हाई ? "

कनक घाबरून थोडीशी मागें हटली आणि म्हणाली, " नाहीं. "

खगेन्द्र पिसाळल्यासारखा एकदम उडी मारून पुढें झाला आणि त्यानें कनकला एक धक्का दिला. कनक जमिनीवर कोसळून पडली. नाटकांतल्या नटाच्या आवेशानें तो म्हणाला, " पापीयसी, तुला हीच शिक्षा ! "

डळमळत डळमळत तो तिथून बाहेर पडला. जिन्यावरून धडपडत उतरत तो खालीं अंगणांत आला. अंगणाच्या मध्यभागीं उभा राहून दोन्ही हातांनीं डांगोरा पिटल्यासारखें करीत फाटक्या आवाजांत ओरडत म्हणाला, " ढम् ढम् ढम् ढम् ! तेरे ढम्, भाअियों और बेहेनो, कोण कुठं आहांत ते श्रवण करा. हा भवेन्द्र नव्हे — भवेन्द्र नव्हे — भवेन्द्र नव्हे ! हा राखाल आहे — हा राखाल आहे — हा राखाल आहे ! अन् तुमची ही सुरबाला — ही या राखालची बायको आहे ! — " असें ओरडत ओरडत डळमळत डळमळत खगेन्द्र अन्तःपुराच्या अंगणांतून बाहेर आला, तसाच धडपडत वाड्या-बाहेर येऊन तो रस्त्यावर आला.

त्याची ती दशा पाहून रस्त्यावरून जाणारे लोक त्याला वाट देत होते. गांवचीं उनाड पोरें त्याच्या आटोक्याबाहेर राहून टाळ्या वाजवीत म्हणत होतीं, "अरे हा दारुड्या साहेब—पहा हा दारुड्या साहेब !" पण खगेन्द्राचें लक्ष तिकडे नव्हतें. तो बूट घांशीत घांशीत रस्त्यावरची धूळ उडवीत स्टेशनच्या रस्त्यानें चालला होता. त्याची बायसिकल मागें राहिल्याची त्याला आठवणच नव्हती.

: १० :

सकाळीं राणीची प्रकृति पुष्कळच सुधारली होती. तिनें औषध घेतलें, पथ्यार्चेंही घेतलें, पण तिच्या अंतरंगांत ज्या दुःसह यातना होत होत्या, शरमेमुळें जो जीव पिळवटून गेला होता, त्याची एवढीसुद्धां जाणीव तिनें होऊं दिली नाहीं. तिच्या सासूला वाटलें होतें, कीं शारीरीक दुर्बलतेमुळेंच ती अशी मूर्च्छित पडली.

कनक आज मधून मधून राणीबरोबर एकटीच रहात होती खरी, पण तिनें आपणहून तिच्याकडे कसलीच गोष्ट काढली नाहीं. राणीनेंही तिला कोणतीही गोष्ट विचारली नाहीं. पत्र काय झालें, कुणाच्या हातीं पडलें, याबाबतींत तिला यत्किंचितही उत्कंठा नव्हती कीं जिज्ञासा नव्हती, असें कनकला दिसून आलें.

ज्यावेळीं कनक पलिकडल्या एका खोलींत खगेन्द्राबरोबर बोलत होती त्यावेळीं राणी तक्क्याला टेकून बसून दोन्ही हातांनीं मस्तक दाबून धरून नशिबानें केलेल्या विटंबनेबद्दल विचार करीत होती. तिला कुठें कांहींच आधार दिसत नव्हता. तिला असें वाटत होतें, कोणत्या जन्मीं आपण कसलें महापाप केलें म्हणून देवानें आपल्याला ही शिक्षा दिली ? कां हा डाग लागला ? हा कसला कर्मभोग ?

तिचे डोळे कोरडे झाले होते. अंतरांत पेटत असलेल्या खांडववनाच्या आगीनें डोळ्यांतलें पाणी वाळून गेलें होतें.

खगेन्द्र ज्यावेळीं जिन्यावरून उतरत होता, त्यावेळीं धडपडत उतरतांना होणारा त्याच्या बुटांचा आवाज राणीच्या कानीं गेला. तो अपरिचित आवाज

कानीं आल्यामुळें ती दचकून कानोसा घेऊं लागली. हळूहळू तो आवाज ऐकूं येईनासा झाला. त्यानंतर अंगणांत जाऊन त्यानें जी बीभत्स आरडाओरड केली तिचा प्रत्येक शब्द राणीच्या कानीं गेला. त्याचवेळीं वाड्यांत सर्वांची धांवपळ होत असलेलीही तिला जाणवली.

त्या विटंबनेच्या शब्दांचा होणारा परिणाम चोंहोकडून पेटलेल्या आगी-सारखा तिला जाणवूं लागला होता. तिचें मस्तक सणसणूं लागलें. डोळ्यांसमोर अंधेरी आली आणि ती मूर्च्छित होऊन बिछान्यावर पडली. कुणी तें पाहिलें नाहीं — कुणाला तें कळलेंही नाहीं.

इकडे खगेन निघून जातांच अंतःपुरांतील मंडळी अंगणांत गोळा होऊन एकमेकांच्या कानाला लागून चावाचावी करूं लागलीं. देवघरांतून थोरल्या राणीसाहेब अस्ताव्यस्तपणें धांवतच बाहेर आल्या. त्या प्रत्येकाला विचारूं लागल्या, “काय म्हणाला तो ? कनकचा भाऊ काय म्हणत होता आतां ?”

खगेन्द्राच्या तोंडचे शब्द थोरल्या राणीच्या कानीं गेले होते. तिचा आपल्या कानांवर विश्वास बसत नव्हता. असल्या भयंकर बातमीवर कोण बरें विश्वास ठेवील ?

थोरल्या राणीच्या प्रश्नाला कुणीच उत्तर दिलें नाहीं. ती धापा टाकीत ओरडत होती, “कुठं आहे — कनक कुठं आहे ? सुरबाला कुठं आहे ?”

कुणीतरी एका खोलीकडे बोट दाखवून म्हणालें, “या खोलींत आहे सुरबाला.”

थोरली राणी पागल झाल्यासारखी त्या खोलींत धांवतच घुसली. सुरबाला तिथें भिंतीला टेकून रडत राहिली असल्याचें तिला दिसून आलें.

राणीसाहेबांनीं डोळ्यांत जीव आणून तिला विचारलें, “सुरो, सुरो, सुरो,— तो माझा भवेन नव्हे ?”

सुरबालेनें रडत रडत उत्तर दिलें, “नव्हे !”

“तो तुझा नवरा का ?”

“हो !” असें म्हणून सुरबाला फुलून फुलून रडूं लागली. राणीसाहेब तिथून बाहेर पडली. वेड्यासारखी ती इकडे तिकडे पाहूं लागली. धांपा टाकीत टाकीत ती विचारीत होती, “कनक — कनक कुठं आहे ?”

कुणीतरी धांवतच वर गेला आणि त्यानें कनकला बोलावून आणलें. ती नजरेसमोर दिसतांच राणीसाहेब ओरडली, " कनक — कनक तुझा दादा अंगणात उभा राहून काय ओरडत होता ? "

कनक मुकाट्यानें मान खालीं घालून उभी राहिली.

राणीसाहेबांनीं विचारलें, " हा आलाय तो माझा भवेन नव्हे ? "

कनकनें सांगितलें, " नव्हे ! "

" हा सुरबालेचा नवरा ? "

" हो ! "

राणीसाहेबांनीं कपाळावर हात मारून घेतला. त्या उद्गारल्या, " हे जगदीश्वर ! "

कांहीं वेळ त्या थरथरत उभ्या होत्या. पहातां पहातां त्या एकदम खालीं कोसळल्या.

बाहेरच्या वाड्यांत ही बातमी पोंचायला वेळ लागला नाहीं. खगेन्द्र डळमळत डळमळत समोरच्या अंगणांतून रस्त्यावर गेल्यानंतर एक मिनिटानेंच ती बातमी कारकुनांना कळली. नायब दिवाण अजून कचेरींत आले नव्हते. त्यांना बोलावून आणण्यासाठीं एकजण धांवतच तिकडे गेला. नायबबाबू त्यावेळीं जेवायला बसले होते. कसेंबसें भोजन आटोपून ते कोटाचीं बटनें लावीत लावीत धांवतच कचेरींत आले.

कचेरींत पोंचतांच त्यांनीं धापा टाकीत विचारलें, " पळाला का ? "

कारकून म्हणाले, " नाहीं. "

नायबबाबू तेव्हां जमादार हनुमानसिंगाला मोठमोठ्यानें ओरडून हांक मारूं लागले. जमादार येतांच नायबबाबू म्हणाले, " जमादार, ऐ जो आदमी हम लोगका बाबू बनके आया हैं वो बाबू नहीं । — बदमाष है. जितना पाईक बरकंदाज सब लोक जाओ. बैठकखाना बाडीमें पहारा देओ. बाबूके भागने मत देव । "

" जो हुकुम ! " असें म्हणून जमादार तिथून धांवतच निघून गेला.

कपाळावरचा घाम धोतराच्या सोग्यानें पुशीत नायबबाबूंनीं दोन ग्लास पाणी पिऊन घेतलें. ते म्हणत होते, " तेव्हांच मला संशय आला होता — म्हटलं, कशाला बोलून दाखवा ? सोळा वर्षे परागंदा झालेला माणून — तो

काय पुन्हां येतोय ? 'काका, काका,' म्हणतांच दिवाणजी विरघळले ! मी दिवाण असतों तर पाहिलं असतं कशी माझ्या डोळ्यांत धूळ फेंकतो तें. भाग्य आमचं, कीं सध्यां चार्ज माझ्याकडे आहे. हं हं ! अडकवला तर खरा ! पळू तर दिलं नाहीं बेट्याला. दिवाणजी असते तर इतक्यांत तो भिंतीवरून उडी मारून पळूनसुद्धां गेला असता — अरे ए, एक ग्लास पाणी आण आणखी."

एक म्हातारा कारकून म्हणाला, "हें तर झालंच. आतां पुढं काय करायचं ?"

नायबदिवाण पाण्याचा ग्लास खालीं करून म्हणाले, "पोलीसठाण्यावर वर्दी द्यायची."

म्हातारा म्हणाला, "दरोग्यानं जर विचारलं, कीं हा भवेन्द्रबाबू नव्हे, याला पुरावा काय ? — तर काय सांगायचं त्याला ? या दारुड्याच्या बडबडी-वर विसंबून वर्दी द्यायची का पोलीसांत ? बरद्वानच्या तोतया प्रतापसिंगचा खटला आहे ना माहीत ? तोतया म्हणून शाबीत करणं सोपं नाहीं !"

तें ऐकून नायबबाबू ओशाळले. हा दारुड्या जें बोलला तें जर खोटें असेल तर बाबूंच्या चौफेर आपण जो पहारा बसवला आहे, त्याचें बाबूंना काय वाटेल, ही गोष्ट एकदम त्यांच्या ध्यानीं आली. उद्यां आपली नोकरी तर जाणार नाहीं ? ते उघड म्हणाले, "तर मग तो दारुड्या गेला कुठं ? त्याला एकदम बोलावून आणा आणि नीट समज देऊन विचारा. किती वेळ झाला तो जाऊन ?"

एकजण म्हणाला, "फार तर अर्धा घंटा."

पुन्हां नायबबाबूंनीं शिपायांना हांकाहांकी करायची सुरवात केली. ते येतांच दारुड्या बाबूला शोधून आणण्यासाठीं त्यानें हुकूम सोडला.

म्हातारा कारकून म्हणाला, "मला असं वाटतं, एकदां आपण थोरल्या राणीसाहेबांना विचारून पाहिलं तर बरं होईल. किती झालं तरी आपण सारे नोकरच. त्यांचा हुकूम घ्यावा आणि मग काय करायचं तें करावं. त्या ठाण्या-वर खबर द्यायला सांगतात कीं दार्जिलींगला दिवाणजीला तार करायला सांगतात, तें आधीं त्यांना विचारून घ्यावं हें बरं."

नायबबाबू म्हणाले, "तेंच तर मी म्हणतोंय ! थोरल्या राणीसाहेबांना जाऊन विचारायलाच हवं. त्यांना विचारल्याशिवाय का कुठली गोष्ट करतां

येतेय ? कोण आहे रे तिकडे ? जा ना — आंत जाऊन थोरल्या राणीसाहेबांना वर्दी दे, कीं नायबबाबू एकदां प्रणाम करायला येताहेत म्हणून."

राणीसाहेबांकडचा हुकूम यायला बराच विलंब लागला. नायबबाबू अत्यंत अस्वस्थ झाले होते. माणसांमागून माणसें आंत पाठवीत होते. शेवटीं आंतून बोलावणें आलें.

नायबबाबू अन्तःपुरांत गेले तेव्हां त्यांना योग्य जागीं नेऊन बसविण्यांत आलें. राणीसाहेब पडद्याच्या आड होत्या, तिथूनच त्यांना प्रणाम करून नायबबाबू म्हणाले, "आईसाहेब, आतां जें कांहीं कानीं आलं आहे, तें खरं आहे का ?"

पलिकडून राणीसाहेबांच्या वतीनें उत्तर आलें, "खरं आहे."

"तर मग ते आमचे बाबू नव्हेत ?"

"नव्हे."

"तर मग आतां याला उपाय ?"

"उपाय ? — उपाय ईश्वराच्या हातीं !"

"पोलीसठाण्यावर वर्दी देऊं का ? — मी त्यांना नजरबंदींत ठेवलंय."

"ठाण्यावर वर्दी द्यायची जरुरी नाहीं. पाईक बरकंदाज काढून घ्या. कुणी त्याचा अपमान करायचा नाहीं कीं त्याला त्रासही द्यायचा नाहीं. स्वतःच्या इच्छेनं जेव्हां त्याला जायचं असेल तेव्हां जाऊं दे."

"आणखी कांहीं हुकूम आहे ?"

"सूनबाईंची प्रकृति फार बिघडलीय. स्टेशनवर घोडेस्वार दौडत पाठवा अन् कृष्णनगरच्या साहेबडॉक्टरला तार करा. संध्याकाळच्या गाडीनं डॉक्टर इथं आले पाहिजेत. जरूर तेवढे पैसे त्यांना तारेनं पाठवा. संध्याकाळीं गाडी यायच्या वेळीं स्टेशनवर मेणा आणि भोई हजर ठेवा. डॉक्टरसाहेब येतांच त्यांना लगेच घेऊन या."

"आणखी कांहीं हुकूम आहे का ? दिवाणजींना तार करून बोलावूं का ?"

"नको."

प्रणाम करून नायबसाहेब आपल्या कचेरींत आले. राणीसाहेबांचें धोरण पाहून ते थक्क होऊन गेले होते. कचेरींत आल्यावर त्यांनीं पहिल्यानें राणीसाहेबांच्या हुकुमाची तामिली केली.

टक्कल पडलेलें डोकें खाजवीत ते आपल्याशींच म्हणत होते, 'ज्या माणसानं एवढा सत्यानाश केला त्या माणसाला खरं म्हटलं तर कमरेपर्यंत जमिनींत पुरुन शिकारी कुत्र्याकडून फाडून खायला लावलं पाहिजे होतं. त्या या बदमाषावर राणीसाहेब एवढी दया कां दाखवितात ?'

अशी दया दाखवायला तसेंच कारण झालें होतें. कनकलतेनें तें राखालनें लिहिलेलें पत्र नेऊन राणीला दाखवलें होतें. तो दारुडा येऊन अशा रीतीनें स्फोट करणार याची राखालला कल्पनाही नव्हती. आदल्या दिवशींच त्यानें आपणहून वधुराणीला पत्र लिहून सर्व कांहीं कळवलें होतें.

पहिल्यापासूनच राखाल कसा सावधपणें वागला, व्रताचें निमित्त करून त्यानें राणीला स्पर्शसुद्धां कसा केला नाहीं, तिचें पावित्र्य राखण्यासाठीं त्यानें केवढें आत्मसंयमन केलें वगैरे गोष्टी कनकलतेनें राणीसाहेबांना त्यावेळीं समजावून दिल्या. जन्मदरिद्री असूनही या विपुल संपत्तीच्या मोहावर विजय मिळवून त्यानें आपला धर्माचा मार्ग कायम राखला, त्यामुळें तो सर्वांच्या श्रद्धाभक्तीला प्राप्त झाला पाहिजे, आपण त्याच्या या त्यागाबद्दल कृतज्ञच राहिलें पाहिजे, असें कनकलतेनें राणीसाहेबांना समजावून सांगितलें.

## : ११ :

खगेन्द्राची दारूच्या नशेंतील उन्मत्त बडबड ऐकल्यानंतर वधुराणी जी मूर्च्छित झाली ती बराचवेळपर्यंत तशीच पडून राहिली होती. अर्धातास कुणीच तिची चौकशी केली नव्हती. एक दासी कांहींतरी कामासाठीं त्या खोलींत आली म्हणूनच तिनें ती बातमी सर्वांना सांगितली.

बरेच प्रयत्न केल्यानंतर ती शुद्धीवर आली. शुद्धीवर आल्यानंतर थोड्याच-वेळानें तिला सडकून ताप भरला.

संध्याकाळच्या गाडीनें सिव्हिल सर्जन आले. तीन दिवस तापाचा जोर होता. डॉक्टरसाहेबांच्या अविश्रांत चिकित्सेमुळें दोनप्रहर रात्र उलटल्यावर राणीचा ताप कमी झाला. सूर्योदय झाल्यानंतर ती पुन्हां शुद्धीवर आली.

. त्यावेळीं सुरबाला वधुराणीच्या उशाशीं बसून हळूहळू वारा घालीत होती.

शुद्धीवर आल्यावर वधुराणीनें तिच्याकडे पाहिलें आणि अगदीं क्षीण आवाजांत विचारलें, "सारी रात्र तूं बसून राहिली आहेस का इथं ?"

सुरबाला म्हणाली, "नाहीं. तशी फारवेळ बसलेली नाहीं मी. थोरल्या राणीसाहेब अजूनपर्यंत बसल्या होत्या. त्या मला इथं बसवून गंगास्नानाला गेल्या आहेत. दोन दिवसांत त्यांनीं स्नानही केलं नाहीं कीं अन्नही खाल्लं नाहीं."

राणीनें विचारलें, "दोन दिवसांत ? किती दिवस मी अशी शुद्धींत नव्हतें ?"

"आज तीन दिवस झाले ना ? परवां दुपारीं एकदम तुम्हांला मूर्च्छा आली."

तिनें आठवण करायचा प्रयत्न करीत म्हटलें, "परवां ?— दुपारीं ?— अं: !—हो खरंच !"

तिनें पुन्हां डोळे मिटले. त्या मिटलेल्या डोळ्यांच्या कोपऱ्यांतून आंसवाचा एकएक थेंब टपकत होता.

ती रडते आहे असें पाहून सुरबाला घाबरली. काय करावें आणि काय बोलावें हेंच तिला सुचेना. ती एकदम म्हणाली, "डॉक्टरसाहेब काल म्हणाले होते —" असें म्हणून ती थांबली.

राणीनें डोळे उघडले आणि सुरबालेच्या तोंडाकडे पाहिलें. "कोण म्हणालीस ?"

सुरबाला म्हणाली, "डॉक्टरसाहेब !"

"डॉक्टरसाहेब कोण ?"

"कृष्णनगरचे डॉक्टरसाहेब आले आहेत ना ?"

"कृष्णनगरचे डॉक्टरसाहेब आले आहेत होय ? केव्हां आले आहेत ?"

"परवांच्या दिवशीं संध्याकाळीं."

"असं का ?" असें म्हणून राणी तशीच थांबली. सुरबाला म्हणाली, "ते म्हणतायत् कीं तुम्हांला जरा बरं वाटलं कीं हवा बदलायला न्यायला हवं."

राणीच्या डोळ्यांवाटे पाणी येत होतें. ती म्हणाली, "आतां कांहीं जरुरी नाहीं त्याची."

सुरबाला म्हणाली, "कां बरं?"

"सारं ऐकलंस ना तूं?"

"हो, ऐकलं."

"मग? — आतां जगून तरी काय करायचं मी?"

सुरबाला म्हणाली, "आतां तुम्हींच असं कसं बोलतां? एकदां मीच असं बोललें होतें त्यावेळीं तुम्ही मला काय सांगितलं होतं तें आठवतं का तुम्हांला?"

राणीनें एक कांतरा सुस्कारा सोडला. ती म्हणाली, "तुझ्या आणि माझ्या परिस्थितींत फार फरक आहे. माझं जीवन कलंकित झालंय. त्या जीवनाचा जितक्या लवकर शेवट होईल तितकं बरंच नाहीं का?"

सुरबालेनें हातांतला पंखा बाजूला ठेवला आणि मोठ्या लडिवाळपणानें तिचा हात आपल्या हातीं घेऊन ती म्हणाली, "असं कां म्हणतां तुम्हीं? तुमचा कांहींच दोष नाहीं त्यांत."

राणीनें मान हालवून म्हटलें, "जळल्या मेल्या माझ्या अदृष्टाचाच दोष!"

सुरबाला म्हणाली, "तुम्हीं तर आपला पतीच समजून —"

ते शब्द ऐकून राणी अस्वस्थ झाली — उत्तेजित झाली — तिचे दोन्ही डोळे उजळून उठले, ती उद्गारली, "शंभर वेळ तेंच — हजार वेळ तेंच!"

सुरबाला उत्साहित होऊन म्हणाली, "तुमचा देह आणि मन दोन्हीही तर निर्मळ आहेत? कलंकित झालं असं कां म्हणतां? दगडाच्या मूर्तीला ईश्वर समजून माणूस तिची पूजा करतो, ती पूजा ईश्वराला पोंचते, दगडाला नव्हे, होय ना? तशीच तुमची भक्ति होती ती तुमच्या पतीसाठीं — होय ना?"

डोळे मिटून राणी म्हणाली, "बरं, एकदां विचार करतें!"

सुरबाला मोठ्या आतुरतेनें तिच्या तोंडाकडे पहात राहिली होती. राणीच्या डोळ्यांच्या पापण्या सारख्या थरथरत होत्या. उसासेही मधून मधून तसेच थरथरत होते.

थोड्या वेळानें तिनें डोळे उघडले. सुरबालेकडे तिनें ज्या नजरेनें पाहिलें, त्या नजरेंत कृतज्ञता सामावली होती. ती म्हणाली, "होय ग बाई, तूं म्हटलंस तेंच खरं! अगदी खरंच आहे तें!—एक काम करशील का?"

सुरबालेनें विचारलें "कोणतं काम?"

"या आपल्या खोलींतल्या फडताळांतलं डाव्या बाजूचे फडताळ उघड. त्याच्या डाव्या बाजूच्या कोपऱ्यांत सर्वांच्या खालीं एक हस्तिदंताची पेटी आहे, ती घेऊन ये बरं."

सुरबालेनें फडताळ उघडून ती पेटी आणली. ती पेटी मोठ्या प्रेमानें राणीनें आपल्या उराशीं कवटाळून धरली.

सुरबालेनें विचारलें, "काय आहे या पेटींत?"

वधुराणीनें पडल्या पडल्याच ती पेटी उघडली. आंत एक रेशमी रुमालाची लहानशी मोटली होती. ती मोटली तिनें बाहेर काढली. पेटी बाजूला ठेवून देऊन ती मोटली तशीच उरावर घेऊन ती उघडूं लागली. त्यांत कांहीं कवड्या होत्या.

सुरबालेनें विचारलें, "या कसल्या कवड्या हो?"

राणीच्या चेहऱ्यावर थोडेंसें हसूं झळकलें. ती म्हणाली, "लग्नाच्या दुसऱ्या दिवशीं पुष्पशय्येच्या आधीं कवड्या खेळायची आपली रीत आहे ना—त्या वेळच्या खेळांतल्या या कवड्या."

ते तिचे शब्द ऐकून सुरबालेचे डोळे पाण्यानें भरून आले. राणी सुरबालेच्या बाजूला कुशीवर वळली आणि रुमाल बिछान्यावर ठेवून ती त्यांतल्या कवड्या एकएक मोजूं लागली. शेवटची कवडी बाजूला केल्यावर ती बिछान्यावर चांचपून पाहूं लागली. ती उद्गारली, "एक कवडी कमी आहे ग!" सुरबालाही शोधूं लागली. एक कवडी केव्हांतरी त्या मोटलींतून निसटून उशीच्या खालीं जाऊन राहिली होती. सुरबालेनें ती शोधून काढून राणीच्या हातीं दिली.

ती कवडी हातीं घेऊन राणी डोळ्यांत जीव आणून पहात होती. जणुं ती कवडी नव्हती, एक माणिक हरवलें तें सांपडलें होतें जणुं.

राणीनें ती सांपडलेली कवडी रुमालावर ठेवली आणि पुन्हां साऱ्या कवड्या मोजून पाहिल्या. कवड्या मोजून झाल्यावर त्या रुमालांत बांधून तिनें पेटींत

ठेवल्या आणि सुरबालेला म्हटलें, " आतां ही पेटी जिथं होती तिथंच पुन्हां ठेवून दे. "

फडताळ बंद करून सुरबाला आली, त्यावेळीं राणीनें डोळे मिटून घेतले होते. सुरबाला तिच्याशेजारीं बसली त्यावेळीं एक क्षणभरच डोळे उघडून पाहून राणी म्हणाली, " मला झोंप येतेय. "

" तर मग आतां स्वस्थ झोंप घ्या. " असें म्हणून सुरबाला तिला हळूहळू वारा घालूं लागली. राणी थोड्याच वेळांत झोंपी गेली.

सुरबालेला दिसून आलें, कीं त्या झोंपेंत तिच्या मुद्रेवर शांतीची छाया विराजमान झाली होती. गेले कित्येक दिवसानंतरच हें असें झालें होतें.

## : १२ :

अन्तःपुरांत सुरबाला या नांवानें ओळखली गेलेली जी बाई रहात होती ती राखालची पत्नी होती, ही गोष्ट ओरडून सांगून खगेन्द्र गेल्यानंतर कांहीं वेळानें ती राखालच्याही कानीं आली. तें ऐकून त्याला अत्यंत आश्चर्य वाटलें. पांचसहा महिन्यांपूर्वी वसंतपुरांतून लीलावती नवीनचंद्रासह नापत्ता झाली होती. ती कोणत्या घटनाचक्रांत सांपडून या कुटुंबांत येऊनें आश्रय घ्यायला समर्थ झाली, याचा राखालला कांहीं केल्या अंदाज होईना. त्यानें सुरबालेचें नांव वारंवार ऐकलें होतें, पण ती केव्हांच त्याच्या नजरेसमोर आली नव्हती. अर्थात् राखालच्या नजरेसमोर आपण येऊं नये, असा ती बुद्धिपुरस्सर प्रयत्न करीत होती याबद्दल राखालला मुळींच संदेह वाटला नाहीं.

या सर्व गोष्टींवर विचार करतांना त्याची जिज्ञासा जागी होऊं लागली. पण विचारायचें कुणाला ? अन्तःपुराचा दरवाजा आतां त्याला कायमचा बंद झाला होता. अन्तःपुरांतली एकाददुसरी दासी मधून मधून कसल्या तरी कामाच्या निमित्तानें त्याच्यापाशीं येत असे, पण तिला कोणत्याही बाबतींत कांहीं विचारावें असें राखालला वाटलें नव्हतें.

कनकलतेबरोबर जें शेवटीं भाषण झालें तें राखालला आठवलें. इथून निघून जाण्यापूर्वी एकदां आपली भेट घ्यावी असें कनकलतेनें जें निक्षून

सांगितलें, तें त्यावेळीं त्याला हिशेबीं घेण्याजोगें वाटलें नव्हतें. आतां त्याला वाटलें, कीं या साऱ्या भानगडीशीं तिच्या त्या मागणीचा कांहींतरी धागादोरा असावा.

वधुराणीच्या प्रकृतीला आतां कांहीं धोका नाहीं, असें कळेपर्यंत राखाल वाट पहात होता. आतां तसें कळलें तरीही त्याला निघून जाववत नव्हतें. लीलावतीबरोबर पुन्हां भेट होईल अशी त्याची अपेक्षा नव्हती. त्यानें जें कांहीं ऐकलें होतें आणि ह्या बाबतींत त्याचा जो विश्वास बसला होता, त्यावरून तिच्या पुनर्मीलनाची त्याला जरुरी वाटत नव्हती. पण देवाब्राह्मणाच्या साक्षीनें जिचें पाणिग्रहण केलें, जिच्याशी कांहीं दिवसपर्यंत संसार केला, तिचें काय झालें आणि पुढें काय होणार, हें जाणून घेण्यासाठीं राखाल एकप्रकारें उत्सुक झाला होता. कनकलतेची भेट कशी होईल हें त्याला कळत नव्हतें. तिची भेट झाल्याशिवाय निघून जायला मनही घेत नव्हतें. अशा दुहेरी ओढीच्या कैचींत तो सांपडला होता.

असेच दोन दिवस गेले. तिसऱ्या दिवशीं सकाळीं त्याला कळलें, कीं दिवाणजींना दार्जीलिंगला तार केल्याप्रमाणें तें उद्यां इथें येऊन पोंचणार आहेत. थोरल्या राणीसाहेब आणि वधुराणी तीर्थयात्रेला जायच्या तयारीला लागल्या आहेत आणि निघण्याचा दिवसही निश्चित झाला आहे. तें ऐकून राखालला वाटलें, कीं आपण अजून जात नसल्यामुळें तीं हीं अशी घाईघाईनें जायला उद्युक्त झालीं आहेत.

अर्थात् त्यानें ठरवलें, कीं आतां उगाच वेळ घालवायचा नाहीं. दुपारच्या गाडीनें निघून जायचें असें त्यानें ठरविलें. थोरल्या राणीसाहेब त्याच्या बाबतींत अगदींच निष्ठुर झाल्या नव्हत्या. त्यांच्याच हुकूमानें त्याच्यावरची नजरबंदी उठली होती. कोणत्याही प्रकारें त्याचा अपमान व्हायचें टळलें होतें आणि त्यांच्याच कृपेमुळें पोलिसांच्या हातकड्या हातीं पडण्यापासून तो बचावला होता.

म्हणूनच त्याला वाटलें, कीं जातांना एकदां त्यांच्या पायांवर डोकें ठेवावें आणि त्याचवेळीं कनकलतेची भेट करून देण्याची त्यांना विनंति करावी.

स्नानसंध्या उरकल्यावर त्यानें अन्तःपुरांत वर्दी दिली आणि लगेच थोरल्या राणीसाहेबांनीं त्याला बोलावून घेतलें. तो तेथें जाऊन बसल्यानंतर थोड्या वेळानें राणीसाहेब आल्या. राखालनें पाहिलें, त्यांनीं मान खालीं घातली

होती. त्यांची मुद्रा अत्यंत गंभीर झाली होती. त्यांना बसण्यासाठीं तिथें आसन होतें, पण त्या बसल्या नव्हत्या. एक एक पाऊल टाकीत राखाल त्यांच्यासमोर आला. कोणत्या शब्दानें त्यांना हांक मारावी तें त्याला सुचेना. 'आई' म्हणून हांक मारण्याचा अधिकार आपल्याला मिळेल असें त्याला वाटलें नव्हतें. हळूहळू त्यानें गुडघे टेकले, जमिनीवर डोकें टेकलें आणि तिला प्रणाम केला. डोळ्यांतून येणारी आसवें मोठ्या कष्टानें आवरून तो म्हणाला, "माझ्या साऱ्या अपराधांची मला क्षमा करा."

डोळ्यांत जीव आणून तो त्यांच्या तोंडाकडे आतुरतेनें पहात राहिला होता. राणीसाहेबांच्या डोळ्यांतून सारखीं आंसवें पाझरत आहेत असें पाहून त्याच्याही हृदयाचा बांध कोसळला. त्याला दरदरून उमाळा आला. दाटलेल्या कंठानें तो म्हणाला, "आपल्याला 'आई' म्हणून हांक मारायला मी पात्र नाहीं. महापापी आहें मी! आपण अनुमति दिलीत तर एकदां आपली पायधूळ घेईन आणि मी इथून कायमचा निघून जाईन."

राणीसाहेबांचे ओठ थरथरले. ती उद्‌गारली, "बाबा—बाबा—" पुढें तिच्या तोंडून शब्द निघेना. आसवांच्या उमाळ्यांत तिचे पुढले शब्द वाहून गेले. पदरानें तोंड झांकून घेऊन ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली.

राखाल म्हणाला, "मला वाटलं होतं मीं मोठा दुर्भागी आहें, पण आतां तसं नाहीं वाटत. पुत्र संबोधून मला तुम्ही हांक मारलीत. आई म्हणायचा अधिकार मला मिळाला——आई, आतां येतों तर." असें म्हणून राखालनें पुन्हां जमिनीवर मस्तक ठेवून तिला प्रणाम केला.

डोळ्यावर धरलेला पदर दूर करून राणीसाहेब म्हणाल्या, "ये बाबा, ये, माझा आशीर्वाद आहे तुला——धर्मावर तुझी निष्ठा अचल राहो. पुन्हां सुखी हो बाबा." असें म्हणून ती दारापाशीं जायला निघाली, दाराजवळ पोंचतांच ती एकदम थांबली आणि म्हणाली, "जरा थांब, कनक तुला भेटायला येतेय——" राखाल मात्र कनकला भेटायची गोष्ट विसरून गेला होता.

तो चारपांच मिनिटें तियेंच थांबला होता. इतक्यांत कनकलता त्या खोलींत आली. राखाल एका खुर्चीवर बसला होता. कनक थोडीशी अंतरावर येऊन उभी राहिली. राखालनें तिला बसायला सांगितलें तरीही ती बसली नाहीं.

कनकनें त्याला हंसून विचारलें, "आजच निघालां का तुम्ही?"

राखाल म्हणाला, " दुपारच्या गाडीनें जातोंय. वधुराणीची प्रकृति कशी आहे आतां ? "

कनक म्हणाली, " आपली प्रकृति आतां फार चांगली आहे असं लोकांना दाखवायचा ती आव आणते आहे, पण माझा त्याच्यावर विश्वास बसत नाहीं."

राखाल म्हणाला, " परवां ती तीर्थयात्रेला जाणार म्हणून ऐकलं — प्रकृति अशी असतांना घाई करून जाणं बरं का ? "

" हेंच सांगून आम्हीं सारीं थकलों. पण कांहीं केल्या त्या ऐकत नाहींत. कांहीं झालं तरी आतां इथं राह्यचं नाहीं असा निश्चय झालाय त्यांचा. "

" कुठं जायचं ठरलंय् ? "

" काशीला. तुम्हीं आतां कुठं जाणार आहांत ? "

राखाल म्हणाला " सध्यां मी कलकत्त्याला जातोंय. त्यानंतर तिथून दुसऱ्या कुठंतरी निघून जाईन. "

कनक म्हणाली, " लीलावती इथं आहे तें कळलंय ना तुम्हांला ? "

राखाल म्हणाला, " हो — कळलंय् — "

" तिची काय व्यवस्था करणार आहां ? "

" तिची व्यवस्था तिनं स्वतःच केलीय. आतां मी अधिक काय करणार आहें ? तुम्हांस सारं माहीतच आहे."

" मला माहीत आहे, पण तुम्हांला माहीत नाहीं ! लीलावतीच्या बाबतींत आपण फार गैरसमज करून घेतलाय !"

तें ऐकून राखाल दचकला. तो म्हणाला, " कां बरं ? मी कसला गैरसमज करून घेतला असं वाटतं तुम्हांला ? "

कनक म्हणाली, " आपली पत्नी सतीसाध्वी आहे ! थोडीशी भोळसट आहे एवढंच. या भोळसटपणाच्या पायींच या साऱ्या भानगडी झाल्या. "

राखाल उत्सुक होऊन म्हणाला, " तें कसं काय ? काय झालंय् ? "

कनकनें राखालला लीलावतीचा सारा इतिहास स्पष्ट करून सांगितला. तो ऐकल्यावर राखाल कांहींवेळ स्तब्ध होऊन राहिला होता. शेवटीं तो म्हणाला, " हें तुम्हीं तिच्याकडूनच ऐकलं असेल — होय ना ? तिच्या

विश्वास कां ठेवायचा — स्वतःचा दोष झांकण्यासाठीं तिनं हें बनवून सांगितलं नसेल कशावरून ?"

कनक म्हणाली, "ही हकीकत पहिल्यानं मी तिच्या तोंडून ऐकली नाहीं राखालबाबू !"

"तर मग पहिल्यानं कुणी सांगितलं हें तुम्हांला ?"

"आपल्या एका दोस्तानं."

"माझा दोस्त ? कोण तो ?"

"तोच तो दारुड्या खगेन्द्रबाबू. केवळ आपल्याघरच्या अकृत्रिम स्नेहाच्या पायीं ज्यानं आपल्या जीवनचरित्रांतली सारी माहिती गोळा केली तो— त्याच वेळीं त्याला ही सारी हकीकत कळून आली."

राखाल कनकच्या तोंडाकडे नुसताच पाहात राहिला. लीलावतीबद्दल वाटत असलेल्या सहानुभूतीमुळें तिच्या कल्याणासाठीं कनक खोटाच बनाव करून सांगत आहे, अशी त्याला शंका आली.

कनक म्हणाली, "असं काय पहातां ? माझं बोलणं खरं वाटत नाहीं तुम्हांला ?"

राखाल म्हणाला, "तुमचं हें बोलणं खरं आहे असं म्हणायला प्रमाण काय ?

कनक म्हणाली, "पहिलं प्रमाण हें, कीं मीं तुम्हांला खोटं कां सांगेन ? यांत मला काय लाभ ?"

"लीलावती तुमची मैत्रीण — त्या मैत्रिणीवर उपकार करण्यासाठीं."

"लीलावती माझी मैत्रीण नव्हे !"

"तर मग — संकटांत सांपडलेल्या माणसावर उपकार करण्यासाठीं ?"

कनक हंसली. ती म्हणाली, "माझ्या कुंडलींत कुणावर उपकार करायचं भविष्य वर्तवलेलं नाहीं राखालबाबू ! तसं कांहींच नव्हे — नव्हे, उपकाराचा प्रश्नच नाहीं. तुम्हांला प्रमाणच जर पाहिजे असेल तर बिनतोड प्रमाण मीं तुम्हांला दाखवून देईन."

राखालनें विचारलें. "कोणतं प्रमाण ?"

कनक म्हणाली, "आपल्या जीवजान दोस्ताचं हस्ताक्षर!" ती एकदम निघून गेली. थोड्याच वेळानें ती परत आली आणि तिनें राखालच्या हातीं कांहीं पत्रें दिलीं. राखालनें तीं सारीं पत्रें वाचून पाहिलीं. त्यांचीं कव्हरेंही उलटून पालटून पाहिलीं. त्यांच्यावरचे पोस्टाचे शिक्के तपासले. शेवटीं एक मोठा सुस्कारा सोडून तो शून्य दृष्टीनें पहात राहिला.

कनक म्हणाली, "विचार कसला करतांहां! अजूनही लीलावतीच्या बाबतींत आपल्याला संशय वाटतो का?"

राखालनें विचारलें, "थोरल्या राणीसाहेबांना हें सारं माहीत आहे का?"

"आतां त्यांना सारं कांहीं कळून चुकलंय."

"या बाबतींत त्यांचं मत काय आहे?"

कनक म्हणाली, "आत्तांच त्याचा अंदाज आला नाहीं का तुम्हांला? काय सांगितलं त्यांनीं?"

राखालला आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, "कां बरं? काय सांगितलं त्यांनीं?"

कनक म्हणाली, "माझी भेट घ्यायला त्यांनींच सांगितलं ना तुम्हांला?"

"हो, हो — खरंच! बरं, राणीसाहेबांचं काय म्हणणं आहे कनक?"

"त्यांनीं सारं कांहीं ऐकलं, हीं सारीं पत्रं वाचलीं आणि त्यानंतर तुमच्या पत्नीच्या प्रसंगावधानाबद्दल त्या तारीफ करूं लागल्या."

राखाल उतावीळ होऊन म्हणाला, "लीलावतीचा मी स्वीकार करण्याच्या बाबतींत त्या कांहीं बोलल्या का?"

कनक म्हणाली, "हो, तेंच तर त्यांनीं सांगितलं. त्या म्हणाल्या, आपल्या विवाहित पत्नीचा निष्कारण त्याग करायचा अधर्म राखाल कधींही करणार नाहीं."

राखाल मान खालीं घालून बसला होता. त्याला 'पुन्हां सुखी हो' असा त्यांनीं जो आशीर्वाद दिला, त्यांतलें इंगित आतां त्याच्या ध्यानीं आलें. कनक म्हणाली, "लीलेला इथं पाठवून देऊं का?"

राखाल म्हणाला, "नको — आतांच नको — ती माझ्याच बरोबर जाईल. तिला तयार रहायला सांग. आतां मी तुमचा निरोप घेतों. या जन्मीं मी तुमचे उपकार विसरणार नाहीं."

त्या दिवशीं दुपारनंतर राखाल आणि लीलावती यांना घेऊन दोन मेणे वाड्याबाहेर पडले.

कलकत्त्यास पोंचल्यावर राखालनें तिथें एक छोटेसें घर घेऊन महिनाभर मुक्काम केला. तो नोकरीच्या प्रयत्नांत होता. थोरल्या राणीसाहेबांनीं लीलावतीला जें कांहीं दिलें होतें त्यांत, कष्टानें का होईना, राखालचा तोंवर चरितार्थ चालला. एक महिना पायपीट केल्यानंतर बंगाल–नागपूर रेल्वेच्या एका छोट्या स्टेशनवर त्याला छोटेबाबूची म्हणजे असिस्टंटस्टेशन-मास्तरची नोकरी मिळाली.

आणखी दोन महिने गेले. एके दिवशीं लीलावतीला कनकलतेकडून एक पत्र आलें. थोरल्या राणीसाहेबांच्या हातींपायीं पडून ती त्यांच्याबरोबर काशीला गेली होती.

काशीला गेल्यानंतर वधुराणीची प्रकृति अधिकाधिक बिघडत चालली. रासपौर्णिमेच्या दिवशीं वधुराणी कैलासवासी झाली होती.

मृत्यूच्या पूर्वी दोन दिवस वधुराणीनें त्या कवड्या आपल्या पदराच्या गांठीला बांधून ठेवल्या होत्या. तिच्या शेवटच्या इच्छेप्रमाणें त्या कवड्या तिच्या पार्थिव देहाबरोबर चितेवर भस्मसात् झाल्या.

